# काळांतील निवडक निबंध

भाग सहावा

शिवराम महादेव परांजपे

प्रस्तावना लेखक :

त्र्यं. र. देवगिरीकर

पुनर्मुद्रण : २७ सप्टेंबर १९४६

साधी बांधणी ४ रुपये ] [ कापडी बांधणी ४॥ रुपये

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

कै. शिवरामपंत परांजपे यांचे 'काळांतील निवडक निबंध' इतक्या वर्षांच्या बंदीवासांतून मुक्त झालें ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे. हा दिवस पाहण्यास शिवरामपंत आपल्यांत नाहींत व त्यांना हा आनंद उपभोगण्यास सांपडत नाहीं, ही गोष्ट मनांत आली म्हणजे क्षणभर वाईट वाटतें. शिवरामपंताचे निबंध कोणी मुक्त केले ? ज्या नोकरशाहीनें ते निबंध अक्षेपार्ह ठरविले तिनेंच कां ते मुक्त केले ? नोकरशाहीला असें वाटले कां, कीं आतां परिस्थिति बदललीं आहे, आतां वातावरण स्वच्छ व निर्मळ झालें आहे, तेव्हां ते निबंध बंधनांत ठेवण्याची जरूरी नाहीं ! नोकरशाहीला तसें बिलकुल वांटलें नाहीं. नोकरशाहीला असेंच वाटत होतें कीं, या निबंधांत स्फोटक दारू इतकी भरलेली आहे कीं, आपण जर लोकांच्या स्वाधीन ते निबंध केले तर त्या स्फोटक दारूच्या धडाक्यानें ब्रिटिश साम्राज्याचें सिंहासन गदगदा हलूं लागेल व कदाचित् डळमळून पडेलहि. तेव्हां त्यांनीं ते निबंध तसेंच अटकेंत ठेवले होते. नोकरशाहीनें त्या निबंधांच्या मुक्ततेचें श्रेय घेतलें नाहीं.

मग कोणी ते निबंध मुक्त केले ? कॉंग्रेस मंत्रिमंडळानें का मुक्त केले ? छे, त्यांनींहि मुक्त केले नाहींत, स्वतःच्या मुक्ततेकरतां जर त्या निबंधांना दुसऱ्याच्या कृपेची याचना करावी लागली असती तर त्या निबंधाची थोरवी ती काय ? दया मागणें, याचना करणें असल्या गोष्टी क्षुद्र व्यक्ति करतात, तसें त्या निबंधाचें झाले नाहीं. कै. शिवरामपंतांच्या लेखणींत जें ओज होतें, जें तेज होतें, जी स्फूर्ती होती, त्या ओजानें, त्या तेजानें व त्या स्फूर्तीनेंच त्या निबंधांची मुक्तता केली. कॉंग्रेस मंत्रीमंडळाला आम्ही त्याचें श्रेय देत नाहीं याबद्दल कांहींना आश्चर्य वाटेल. कॉंग्रेस मंत्रीमंडळ ते निबंध मुक्त करण्यास निमित्त मात्र झालें ही गोष्ट खरी आहे. पण कॉंग्रेस मंत्रीमंडळ स्थापन होण्यास तरी काय कारणें झालीं ? नोकरशाहीच्या हातून हिंदी जनतेच्या हातांत सत्ता येण्याइतकी परिस्थिति कशी निर्माण झाली ? रात्रीचा दिवस व्हावा, घड्याळ्यांत सहा वाजल्यानंतर सात वाजावेत, आठ वाजावेत, अशा ठरलेल्या क्रमाप्रमाणें

काँग्रेस सत्तारूढ झाली नाहीं. काँग्रेसला ही सत्ता मिळविण्याकरतां अनेक कष्ट पडले, अनेक त्याग करावे लागले. नोकरशाही व सरकारबरोबर अखंड झगडत राहावें लागलें. त्या झगड्यांतूनच काँग्रेसला सत्ता मिळाली. ह्या लढ्या करतां जी मनोवृत्ती तयार व्हावी लागते ती मनोवृत्ती कोणी तयार केली ? आपल्याला झाडाला लागलेली सुपक्व, मधुर, रसरशीत, फळें दिसतात, आपल्याला झाडावरील मोहक, रंगीबेरंगी, सुगंधीत पुलें दिसतात. पण त्या फळांना आणि फुलांना परिणतावस्थेस पोंहोचविणारा बागवान दिसत नाहीं. त्यांनीं जर बागेची जोपासना केली नसती, जमिनींतले कांटेकुटे आणि तण खुरपून काढून टाकलें नसतें, जमिनींत खतपाणी घातलें नसतें, तर त्या माळ्याची बाग आणि त्या बागेंतली फळझाडें व फुलझाडें अशीं टवटवीत झाली असती का आणि त्या झाडांना फळांचा व फुलांचा बहर आला असतां का ?

कै. शिवरामपंतासारख्यांच्या तडफदार लेखांनीं लोकांच्या हृदयाचा ठाव घेतला. जेथें त्यांचें लिखाण जाऊन पोहोंचावयास पाहिजे होतें तेथें तें जाऊन पोहोंचलें. त्या लिखाणामुळें अंतःकरणें हदरूं लागलीं, धडधडूं लागलीं व स्वातंत्र्य प्राप्तीकरतां खवळून उठली. लोकशक्तीच्या उत्थापनाचें हें कार्य सतत व अविरत करणाऱ्या लेखांना कोण बंदित ठेवणार ! ते लेख बंदित ठेवलें असें म्हणणें मूर्खपणाचें आहे. जे बंदित ठेवले गेले होते त्या चिंध्या होत्या, ती शाई होती. त्यांतील चैतन्य हें केव्हांच जनतेच्या हृदयांत विराजमान झालें होते. शिवरामपंतांच्या लिखाणांत जर असलें चैतन्य नसतें तर ते जप्त तरी कां झालें असतें ? चैतन्यहिन लिखाण कोणी जप्त करीत नाहीं. तें लिखाण वाण्याच्या दुकानांत रद्दी म्हणून मिठाच्या आणि तिखटाच्या पुड्या बांधण्याकरतां जातें. कचरा जमिनीवर पडूं देतात, रसरसलेले अग्नीचे स्फुल्लींग आगीच्या भयानें कोणी रस्त्यावर पडूं देत नाहींत. ह्या स्फुलिंगांनीं अधिक अंतःकरणें पेटूं नयेत म्हणूनच सरकारनें त्यांना बंदित ठेवलें. पण त्या स्फुलिंगानीं आधींच आपलें कार्य केलें होतें, अंतःकरणें पेटविली होतीं, ह्या पेटलेल्या अंतःकरणानींच ब्रिटिश राज्यसत्ता जाळण्याचा सपाटा लावला आणि त्या जळून गेलेल्या रानांतच काँग्रेसच्या सत्तेचें वृक्ष जोमानें व डौलानें वाढूं लागले. तेव्हां शिवरामपंतांच्या लेखांनीं जागृत झालेली शक्ति, प्रभावी झाली व प्रभावी झालेली ही शक्तीच अंशतः सत्तारुढ झाली, हें सत्तेचें आक्रमण पुरें झालें नाहीं. त्यामुळेंच

आतां अशा प्रेरणीची जरूरी नाहीं असें म्हणतां येत नाहीं. ज्या सुप्तशक्तीला शिवरामपंतांसारख्यांच्या लेखणीनें जागृत केलें, तीच शक्ति आज त्यांचें लिखाण बंधमुक्त करीत आहे. नोकरशाही ही बंधमुक्तता करीत नाहीं व तिनें केली नाहीं हें सद्भाग्यच आहे.

शिवरामपंत आपलें लिखाण बंधमुक्त झालेलें पाहण्यास हयात नाहींत याबद्दल आम्हांला तितकेंसें वाईट वाटत नाहीं, पण आज त्यांनीं प्रेरणा दिलेली शक्ती अंशतः तरी सत्तारूढ झालेली पहाण्यास ते हयात नाहींत याचें आम्हाला वाईट वाटतें. आज त्यांचे लेख हे कदाचित् स्फूर्ति देऊहि शकणार नाहींत. आजचा काळ वेगळा आहे, तो काळ वेगळा होता. स्फूर्ति देणारा व स्फूर्ति घेणारा हे दोघेहि समकालीन असावे लागतात. आज शिवरामपंत असते तर त्यांनीं स्फूर्तीप्रद वाङ्मय लिहिलें असतें. तसेंच त्या काळच्या जनतेला आजच्या घोषणा पचायला जड गेल्या असत्या. नव्या काळाला नव्या घोषणा लागतात.

त्या दृष्टीनें विचार केला तर आपण शिवरामपंतांचे हे लेख स्फूर्तीचे झरे तेव्हां कसे वाहत होते याच दृष्टीनें वाचूं. अर्थात हें खरेंच आहे कीं, दागिनें बदलले म्हणून सोनें बदलत नाहीं. सोनें एकच असते; पण बदलत्या काळाप्रमाणें दागिन्यांचीं घडण बदलत जाते. तेव्हां हे लेख जुने झाले एवढ्याचकरितां आपण त्यांत स्फूर्ती स्फुलिंग पाहूं शकणार नाहीं असें नाहीं. सोनें जुनें होत नाहीं, दागिनें जुनें होतात आणि जुनें दागिनें कोणी झाले तरी सोन्याकरतांच जवळ आणण्याचा प्रयत्न करतात.

आज आपण राजकारणाचा पहाड बराच चढून आलों आहोंत, आतां जरा मोकळें मोकळें वाटत आहे. स्वच्छ व शुद्ध हवा आपल्याला लागूं लागली आहे. मनाला उत्साह वाटत आहे. व दमलेलें शरीर थोडेसें ताजेतवानें झाले आहे. शिखर दृष्टीपथांत आलें आहे. एक दोन तासांत आपण बालेकिल्ला गाठूं अशी खात्री वाटत आहे. अशा वेळीं आपण खालीं जर पाहूं लागलों तर आपल्याला काय दिसेल ? खालीं असणारी माणसें, झाडें, ही किती खुजी खुरटी आहेत असें आपल्याला वाटत असेल. पण त्या दृष्टीनें आपण गत कालाकडे पाहतां कामा नये. राजकीय ध्येयाच्या उंचीवर पोहोंचलेल्यांनीं आपण मोठे झालों आहोत अशी समज करून घेऊं नये. उंच झाडावर चढलेल्या माणसाची उंची वाढत नाहीं. झाडाची उंची ही आपली

उंची नव्हे. शेवटचा घण खडकावर घालणारानें माझ्याच घणानें खडक फुटला हे म्हणणें कितीसें युक्त आहे? शेवटच्या घासानें पोट भरलें हें कसे बरोबर ठरेल?

तेव्हां आजच्या परिस्थितींतल्या राजकीय लेखकांनीं व वाचकांनीं पूर्वींच्या लेखकांकडे आजच्या दृष्टीनें पाहणें व ते कसें खुजे खुरटे होते हें म्हणणें मिथ्याप्रौढीचे ठरेल. एक पिढी किंवा एक व्यक्ति क्रांति करीत नाहीं. सामान्य व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या विकासाला काळाचे वारे लागावे लागतात. मनुष्य हा काळानें घडविलेला एक जीव आहे. आणि काळ हीं अनेक घटकांनीं युक्त असलेली एक प्रक्रिया आहे. ज्यांच्या जिवनांत ती काळाची घडण नसते किंवा जास्त असते ते त्या काळांत ठाकठीक बसूं शकत नाहींत. सामान्य मनुष्यास आपल्याबरोबर नेऊं शकेल तोच पुढारी. त्याचें असामान्यत्व तो सरासरी माणसांच्या बराचसा पुढें असतो यांतच असते. जे समाजाच्या फार पुढें गेलेले असतात, त्यांच्याबरोबर सामान्य माणूस चालूं शकत नाहीं. तसेंच जे समाजाच्या फार मागें असतात त्यांचाही समाजास उपयोग नसतो. ज्याला आपण प्रगती म्हणतो, क्रांति म्हणतो, ती प्रगति व क्रांति मंद मंद गतीनें होत असते व ती प्रगति करण्यास दूर दृष्टीचे, समाजाच्या सुख दुःखाशीं तद्रूप झालेले असेच पुढारी लागत असतात.

तेव्हां समाज हा हळूहळू प्रगती करीत असल्यामुळें आपण थोडेंसें पुढें आलों म्हणून मागचे कार्यकर्ते हे मागासलेले होते हें म्हणणें बरोबर नाहीं. आजच्या पुढाऱ्यांचें वैशिष्टय जर कशांत असेल तर तें समाजाच्या खालच्या तळापर्यंत जाऊन पोहोंचलें यांतच आहे. त्यांनीं राष्ट्राची सर्व उपलब्ध शक्ति जागृत व कार्यप्रवण केली म्हणून राष्ट्र पुढें पुढें जात चाललें.

शिवरामपंतांचें किंवा त्या काळच्या इतर पुढाऱ्यांचें लेख, हे वरच्या थराच्या लोकांकरतांच होते. जे स्वतःला बुद्धिमान म्हणवत होते, त्यांच्या बुद्धींत व विचारांत क्रांति करणें हें तेव्हां महत्त्वाचें काम होतें. ह्या बुद्धिमान वर्गाच्या आशा विचारांत क्रांतिःझाल्याशिवाय त्या क्रांतीची धग खाल-पर्यंत पोंहोचणें शक्य नव्हते. पाण्यांत टाकलेला खडा हा प्रथम एक वर्तुळ निर्माण करतो व मग तें वर्तुळ मोठमोठें होत जाऊन सारा पाण्याचा पृष्ठभाग व्यापला जातो. साधा फटाका जरी उडावावयाचा असला तरी प्रथम त्या

फटाक्याची वात अग्नीनें पेटवावी लागते. वात पेटली म्हणजे ती फटाक्यांत असलेल्या स्फोटक द्रव्याप्रर्यंत जाऊन पोहोंचते आणि मग फटाक्यांतील सुप्त शक्ती मुक्त होते, कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, रानडे, टिळक, कै. परांजपे वगैरे अग्रगामी लेखकांनीं फटाक्याची वात शिलगावण्याचा प्रयत्न केला.

ही वात पेटविण्यास तेव्हां स्वातंत्र्य कुठें होतें? भाषणावर व लेखनावर जबरदस्त पहारा होता. १२४ अ व १५३ हीं कलमें तेव्हां सरकारनें नुकतीच हातांत घेतली होतीं, लोकजागृतीचें कार्य करणें हें त्यामुळेंच अत्यंत कठीण होतें. कायद्याच्या कचाट्यांत तर सांपडूं नये पण लोकांना पारतंत्र्याबद्दल तिरस्कार वाटायला लावावा. असें हे तारेवरील नाचाचें काम तेव्हां तोल न सुटतां करावें लागे. त्या वेंळीं तुरुंगाची वाट ही जरा भयंकरच भासे. लोक-मान्यांनीं प्रथम पाऊल वाट पाडिली आणि आज त्या पाऊल वाटेचा राजरस्ता झाला.

आज कोणालाच तुरुंगाचें भय वाटत नाहीं; १९३० नंतर सरकारही एखा-द्यानें राजद्रोही लेख लिहिले किंवा भाषणें केली म्हणून त्याला सहजासहजी तुरुंगांत टाकीत नाहींसें झाले. जनता कायदे पाळण्यापेक्षां कायदे मोडण्याकडे जास्त कलली, जनतेंत निर्भयता, प्रतिकार, त्याग वगैरेचें वारें चांगलेंच भरलें. १९२० सालीं म. गांधी राजकारणांत आले व त्यांनींच ही सत्या-ग्रहाची मनोवृत्ति निर्माण केली.

पण ३०–४० वर्षांपूर्वी सरकारविरुद्ध लिहिणें व बोलणें हें तुरुंगांत जाण्याचें एक साधन झालें होतें. अशा या कठीण कालांत ज्यांनीं लोकांच्या अंतःकरणांत स्वातंत्र्याची आग चेतवली त्यांचें कौतुक करावें तेंवढें थोडेंच आहे. अर्थात १९२० नंतर म. गांधी हे जसे सरकारच्या तुरुंगापुढें दंड थोपटून उभे राहिले व माझ्या स्वासोच्छवासांत राजद्रोह भरला आहे. असें म्हणूं लागले तशी तेव्हां म्हणण्याची तयारी नव्हती व तसें म्हणावयास शिकवणारा पुढारीही नव्हता. म्हणूनच स्वतःच्या मर्यादा, जनतेची तयारी, सरकारची वृत्ति इतकीं बंधनें राजकीय कार्यकर्त्यांना पाळावी लागत. तीं न पाळणारे तेव्हां कांहीं अतिजहाल लोक नव्हते असें नाहीं. ते गुप्त कट करीत व दहशतवादी बनत.

कै. लोकमान्य टिळक किंवा कै. शिवरामपंत परांजपे हे ह्या अतिजहाल वर्गापैकीं नव्हते. त्यांना राज्यक्रांति हवी होती. हिंसा अहिंसेचा प्रश्नच त्यांच्या पुढें नव्हता. पण दहशतवाद व सशस्त्र क्रांति ही समाजाला झेपेल असें त्यांना वाटत नव्हते. कोणी जर सैन्यांत बंड करून ब्रिटिशांना येथून हांकून दिले असते तर त्यांनीं ह्या प्रयत्नाबद्दल नापसंती व्यक्त केली असती असें नाहीं. वैयक्तिक अत्याचार, गुप्तकट आणि दहशतवाद यांत हे कार्यकर्ते प्रत्यक्ष भाग घेत नव्हते तरी त्यांची सहानुभूती या प्रयत्नवाद्यांकडे नव्हती असें नाहीं पण ती सहानुभूती कधीं व्यक्त झाली नव्हती.

"ऊन लागले असतां सांवलींत जावें, आणि थंडी वाजू लागली तर उन्हांत जावें ह्याच्याप्रमाणेंच आपल्या हक्कासाठीं वाटेल तो प्रयत्न करावा हाही एक ईश्वरदत्त हक्कच आहे. — चळवळ"

एकीकडे हा दहशतवाद जसा पसरत होता, तशी दुसरीकडे काँग्रेसमध्यें निष्क्रियता वाढत होती. काँग्रेस ही सामर्थ्यवान व्हावी व तिनें सनदशीर मार्गानें राज्यशासनाचें हक्क जनतेला मिळवून द्यावेत म्हणूनच हे राजकीय लेखक तेव्हां आपल्या लेखण्या झिजवीत होते. तेव्हांची काँग्रेस ही सरकारी नोकरांची किंवा सरकारशीं लागाबांधा असणारांची संस्था होती. शिवराम-पंतांच्या लिखाणांत त्या वेळच्या काँग्रेसचे त्यांनीं चांगलेच वाभाडे काढले आहेत. ह्यूमसाहेब व रानडे यांच्यावर त्यांनीं चांगलीच आग पाखडली आहे.

'हिंदुस्थानांतील सुशिक्षित मुलें आपल्याला खरोखरीचा घोडा पाहिजे म्हणून हट्ट धरून बसली होतीं. इतक्यांत एक धूर्त दाई पुढें सरसावली. तिनें चिंध्या, काटक्या, शेण, वगैरे जिनसांचा एक घोडा बनवून त्या मुलापुढें आणिला आणि 'बाळांनों, रडूं नका, हा घ्या मी तुम्हांला घोडा आणला आहे' अशी त्यांची समजूत घालून त्यांच्या हातांत तिनें हा शेणाचा घोडा दिला. आणि तेव्हांपासून आपल्याला काँग्रेस मिळाली व त्यामुळें खऱ्या घोड्याचे स्वरुप मनांतून नाहीसें होऊन हिंदुस्थानांतील सुशिक्षित मुलें ह्याच शेणाच्या चित्राबरोबर आज अठरा वर्षें खेळत आहेत.

ही काँग्रेस स्थापण्यांत ह्युमसाहेबांनीं जनतेचें अनहित केलें असें त्यांचें स्पष्ट मत त्यांनीं दिलें आहे. काँग्रेस जर स्थापन झाली नसती 'तर जनतेच्या असंतोषाची ज्वाळा चहूंकडे पसरली असती व तिनें कशाकशाची रक्षा करून

टाकली असती ह्याची कल्पना तरी करणें शक्य आहे काय?' असा प्रश्न त्यांनीं विचारला आहे.

काँग्रेसमध्यें पुढारी नाहींत, त्यामुळें काँग्रेसचें काम होत नाहीं. अशी १९०३–१९०४ सालीं तक्रार होती. न्यायमूर्ति रानडे हे जर ह्यूमसाहेबानंतर काँग्रेसची गादी सांभाळतील तर काँग्रेस कार्यप्रवण होईल अशी अनेकांची कल्पना. न्यायमूर्ति रानडयांबद्दल व त्यांच्या निमित्तानें सरकारी नोकर वर्गावर शिवरामपंतांनीं फारच जबर कोरडे ओढले आहेत. 'न्यायमूर्ति रानडयांसारखे गृहस्थदेखील हायकोर्टांतील जज्जाच्या पगाराच्या पाशांत गुतून स्वदेशहित साधण्याच्या हेतूनें केलेला निश्चय आणि दिलेलीं आश्वासनें विसरून जातात, इतकीं जेथें धनलोलुपता भरली आहे तेथील देशांतील लोकांना चांगले पुढारी मिळत नाहींत आणि तेथें सरकारला मात्र चांगले नोकर मिळतात ह्याबद्दल कोणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं......हा इंग्रजांच्या रुपयाचा लोभ फार दुर्धर आहे. त्यांनीं भारून दिलेला रुपया ज्याच्या हातांत पडला, त्याचा हात खऱ्या स्वदेशहिताच्या कामीं मोडलाच म्हणून समजावें. अशा प्रकारचे रुपये ज्यांच्या पोटांत शिरले ते लोकांचें पुढारी काय होणार? आणि त्यांच्यापासून काँग्रेससारख्या संस्थांचें काय हित होणार?" अशा या पुढारीपणाखालीं काँग्रेसला सरकारांत मान मिळत चालला आहे असें शिवरामपंत 'आनंदाची खबर. तिबेट आपल्यासारखें होत आहे.' या लेखांत म्हणतात. वास्तविक काँग्रेसची ही थट्टा आहे. ही थट्टा परांजपे यांनीं इतक्या बेमालूमपणानें केली आहे कीं, काँग्रेस कार्यकर्त्यांनीं लाजेनें खालींच माना घालाव्या. 'वायव्येकडील सरहद्दीकडे जाऊं नका, असें काँग्रेस म्हणते आहे ना? तर तिकडे जावयाचें नाहीं, अशा बारकाईनें आणि कसोशीनें सरकार काँग्रेसचें म्हणणें ऐकत आहे! आणि हा काँग्रेसनें मिळविलेला विजय कांहीं लहानसहान आहे, असें नव्हे!'

शिवरामपंतांचा राग काँग्रेसवर आहे, पण त्याहिपेक्षां जास्त राग सामाजिक परिषदेवर आहे. तो राग त्यांनीं इतक्या उपरोधानें व्यक्त केला आहे कीं, त्यांच्या लिखाणाची बरोबरी करणारा एकही लेखक सांपडणार नाहीं. 'सगळेच नरसू' हा त्यांचा लेख, तसेंच 'स्वयंवर व संकुल युद्ध' या लेखांतील कोकीळाबाईचें लग्न, आणि तिबेटसंबंधींचा लेख यांत त्यांनीं सामाजिक सुधारकांची उडवलेली रेवडी ही वाङ्मयांत चिरकाल राहील. ह्या लेखांतील

उतारे देणेंच कठीण आहे. ते लेख समग्रच वाचले पाहिजेत. शिवरामपंतांनीं सामाजिक सुधारकांवर केलेली टीका ही ढोंगी सुधारकांवर केलेली टीका आहे. जे दुसऱ्यांना सुधारक होण्याचा उपदेश करीत व स्वतः मात्र सुधारक होण्यापासून अलिप्त राहात त्यांची शिवरामपंतांनीं हजेरी घेतली आहे. त्यांच्या टीकेचा रोख कै. न्यायमूर्ति रानडे यांच्यावर विशेष होता असें दिसतें. राजकीय व सामाजिक सुधारक यांच्यावर टिकास्त्र सोडणें एवढेंच शिवरामपंतांचें ध्येय नव्हते. हिंदुस्थानच्या पारतंत्र्याबद्दल आंतमध्यें सळसळणारा राग व्यक्त करा-वयास त्यांनीं व्याजोक्ती, वक्रोक्ती वगैरेंचा आश्रय घेतला. मनांतल्या मनांत सारा राग जाळून तोंडावर हास्य आणणें हें जितकें कठीण तितकेंच इंग्रजांच्या बद्दलचा क्रोधाग्नी हा विझवून टाकून त्यांच्या राज्याची तारीफ करणें व ही तारीफ करीत असतांना वाचकांना हंसवत ठेवून कमालीचा तिरस्कार निर्माण करणें हें कठीण आहे. ही कला आजवरच्या लेखनांत एकट्या शिवरामपंतांनाच साधली होती. त्यांच्या ह्या कलेंत जवळपास फिरकूं शकेल असा उल्लेखनीय लेखकहि नाहीं. 'सेंट डोमिंगोमधील एक रात्र' हा लेख लिहितांना लेखकाच्या भावना काय असतील हें सांगावयाचें धाडस करवत नाहीं. त्या बेटांतील ६०००० निग्रो रहिवाशांनीं एका रात्रीं साऱ्या आठशें घरांतील गोऱ्या लोकांची कत्तल दोन चार तासांत करून टाकली. ही कत्तल कां केली? तर ते गोरे फ्रेंच राज्यकर्ते निग्रो लोकांचा अनन्वित छळ करीत म्हणून. शिवरामपंत लिहितात 'ज्या अंतःकरणांमध्यें निव्वळ पेंढाच भरला आहे, तें अंतःकरण जुलमी लोकांच्या असल्या उपायानें भयग्रस्त होईल; परंतु समान हक्क व स्वतंत्रता यांचीं हीं तत्त्वें ज्या अंतःकरणांत एकदां ठसलीं, तीं अंतःकरणें त्यांच्यापुढें जुलमाचा ब्रह्मराक्षसही मूर्तिमंत येऊन उभा राहिला तरी एक पाऊलभरसुद्धां मागें हटणार नाहींत.' हिंदुस्थाननें गोऱ्या लोकांचें जुलूम व अन्याय सहन करूं नयेत हेंच सेंट डोमिंगो बेटाचा हा इतिहास सांगणाऱ्या शिवरामपंतांचें सांगणें होतें. असेच लेख या संग्रहांत असल्यामुळें त्यावर जप्तीचा प्रसंग आला असला पाहिजे.

रशियाची स्वारी हिंदुस्थानवर झाली 'तर आपण काय करावें?' या संबं-धींचा लेख या संग्रहांत आहे. विलायतेहून ब्रिटिश सैन्य आलें नाहीं आणि हिंदी सैन्य जर फितूर झालें तर काय? शिवरामपंत म्हणतात, "जेव्हां ज्याला

फुरसत सांपडेल तेव्हां त्यानें या प्रश्नाचा आपल्याशीं व आपल्या मित्रमंडळींशीं ऊहापोह करावा इतक्या महत्त्वाचा हा प्रश्न आहे. " हिंदुस्थानच्या बुद्धिवानांना हें शिफारपत्र नव्हे काय? ते म्हणतात, "आपण कांहींही केलें तरी तें स्वराज्यनिष्ठेच्या पायावर केले पाहिजे." इंग्रजी राज्यावर संकट आलें असतां काय करावें याचें उत्तर शिवरामपंत देऊं शकत नव्हते असें नाहीं. बाकीची सारी चर्चा करून उत्तर देण्याचें टाळणारा लेखक मोठा वस्ताद तरी असला पाहिजे किंवा निर्बुद्ध तरी असला पाहिजे. शिवरामपंत निर्बुद्ध नव्हते. त्यांनीं राजनिष्ठ राहावें असें म्हटलें आहे. तें खरें कां खोटें हें न समजण्याइतकें वाचक मूर्ख नव्हते. लेखकाच्या मनांत असलेल्या आशयापेक्षां जास्त आशय समजणारे वाचक असतात आणि सरकारबद्दल तर बोलावयास नको.

'आपल्या वडील बंधूंची मातृभक्ति' याही लेखांत अमेरिका, इंग्लंड राजनिष्ठ बिलकूल नाहीं हें जरी खरें असलें व वसाहतींतहि ही राजनिष्ठा डळमळीत झाली असली, तरी इंग्लंडबद्दल 'आपल्याला राजनिष्ठा वाटूं लागली आहे' असें शिवरामपंत लिहितात. हें खरें होतें कां? किंवा तें खरें ठरावें अशी लेखकाची इच्छा होती कां? शिवरामपंतांचें अंतःकरण हें क्रांतीकारकांचें होतें. त्यांना जुन्या ऐतिहासिक स्वातंत्र्याचें वैभव दिसत होतें. तो इतिहास आणि ते वैभव कधीं वर्णन करावें, कधीं जगांत चाललेल्या स्वातत्र्याच्या स्फूर्तिप्रद लढयाचें वर्णन करावें, कधीं आपल्याच निष्क्रीय पुढाऱ्यावर टीका करून त्यांना हास्यास्पद ठरवावे, तर कधीं इंग्रजांच्या प्रजाहित विरोधी राज्यावर आणि त्यामुळें पसरलेल्या दुष्काळ, दारिद्रय वगैरे आपत्तींवर मोठया सहृदयतेनें लिहून या आपत्ती म्हणजे एक ईश्वरी कृपाच आहेत असें सांगावें आणि सुबुद्ध जनतेंत खळबळ उडवावी असें त्यांच्या लिखाणाचे उद्दिष्ट होतें. ते विद्वान होते, साहित्यिक होते आणि अभ्यासू होते. त्यांच्यावर सरस्वतीची तर अमुप कृपा होती. जणूं काय त्यांची लेखणी भारलेलीच होती असें त्यांचे लेख आजहि वाचतांना वाटते.

हिंदुस्थानवर जी पारतंत्र्याची आपत्ती आली आहे ती ईश्वरी अवकृपेमुळेंच आली आहे असेंहि कधीं कधीं मनांत येऊन ते परमेश्वराची करुणा भाकतांना दिसतात. पूर्वी हिंदुस्थानची एकदां अशीच वाईट स्थिति झाली होती. हिंदुस्थान गुलामगिरींत सांपडला होता. मुसलमानांनीं अनन्वीत छळ चालविले

होते. त्या वेळीं 'प्रत्यक्ष परमेश्वराला ह्या भरतखंडाची करुणा आली.' कृष्णावतारामध्यें जे भगवद्भक्त कृष्णाच्या सहवासांत होते, त्यांनांहि गहिंवर आला. त्या सर्वांनीं भरतभूमीला उद्धारण्याचें ठरविले असें शिवरामपंत म्हणतात. त्या वेळीं कोणी कोणते अवतार घेतले हे पंत सांगतात ' उद्धव नामदेव झाले, शुक्राचार्य कबिर झाले, वाल्मिकि तुळशीदास झाले, व्यास जयदेव झाले, दारुक कृष्णभक्त रामदास झाले, शंकर नरसी मेहता झाले, ब्रह्मदेव सोपान, सदाशिव निवृत्ती, आदिमाता मुक्ताबाई, आणि भगवान श्रीकृष्ण आपल्याच गहन गीतेचा अर्थ आणि त्या गीतेंतील मर्म व रहस्य सकल जनांना सुलभ करून देण्यासाठीं ज्ञानदेवाच्या रूपानें प्रकट झाले." "मारुती रामदास, श्रीमंगलमूर्ती मोरया गोसावी, पांडुरंग तुकाराम झाले. अशा भगवद्भक्तांनीं भरतभूमीला हातांत धरल्यानंतर मग तिचें दुःखविमोचन होण्याला कितीसा उशीर लागणार?" शिवरामपंतांच्या कल्पना शक्तीची भरारी किती उंच होती हें आपल्याला दिसतें. जनतेंत धार्मिक श्रद्धा उत्पन्न करावी हाहि त्यांत हेतु असेल आणि कर्मवादही त्यांत आला असेल. ईश्वर मनांत आणील तर आपण चटकन स्वतंत्र होऊं असें सांगण्याचा व निष्क्रिय बनविण्याचा लेखकाचा हेतु नव्हता. पण 'हे साधुसंत आतां कोठें गेले?' असें शिवरामपंत विचारतात. तो प्रश्न इतका सुंदर भाषेंत, सुंदर कल्पनेंत व इतक्या बालसुलभ लडीवाळपणानें मांडला आहे कीं, शिवरामपंतांच्या लेखणीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच. तुकाराम, नामदेव वगैरे साधूसंतांच्या विठोबाशीं चाललेल्या प्रेमालयाची त्यांत आठवण होते 'पण हे संतजनहो, तुम्ही कोठें आहां? त्या वेळीं सर्व जण एकदम आलां आणि आतां सगळेंच जण कोणीकडे नाहींसे झाला? त्या वेळेलाच तुम्ही जे सगळे आला, ते या वेळेला कांहीं शिल्लक राहिला असतां तर चालले नसतें काय? त्या वेळचे लोक इतके पुण्यवान होते काय कीं, तुम्ही सगळेच त्यांच्याच वाटणीला जावेत; आणि हल्लींचे लोक इतके पापी आहेत काय कीं, त्यांच्या वांटणीला तुमच्यापैकीं कोणीहि येऊं नये?... हिंदुस्थान हा देश तुमचाच नव्हे काय? हिंदुधर्म हा तुमचाच धर्म नव्हे काय? आणि हिंदुस्थानांतील लोक हे तुमचेच देशबांधव नव्हतें काय? मग त्यांच्यावर अशी निष्ठुरता तुम्ही काय म्हणून करावी? जे रंजलेले आणि गांजलेले असतील त्यांच्यावर निरपेक्ष कृपा करावी हा तुमचा पूर्वीचा धर्म तुम्ही विसरलां काय? तुमचा देश, तुमचा

धर्म, आणि तुमचे देशबांधव तुमची वाट पाहात आहेत. तुमच्या ध्वजापताकांकडे त्यांचे डोळे लागलेले आहेत. आणि तुमच्या नामगजराचा ध्वनी ऐकण्यासाठीं त्यांचें कर्ण तृषित झालेले आहेत. त्यांची इच्छा तुम्ही केव्हां परिपूर्ण करणार ? ”

ह्या हिंदुस्थानचें तें पूर्वींचें सुख कुठें गेलें ? इंग्रजांनीं आपल्याभोंवतीं इतक्या सुखसोई निर्माण केल्या आहेत पण आपण सुखी नाहीं. त्याचें वर्णन वाचतांना आपण काव्य वाचीत आहों असें वाटतें.

“ मानस सरोवरांमध्यें आकंठ बुडालेले असून आपण तृषाक्रांत झालेले आहोंत. कल्पवृक्षाच्या झाडाखालीं बसलेले असतांही आपण प्रत्यही हताश होत आहों. अन्नपूर्णेच्या सन्निध असून आपण उपाशीं मरत आहों. सूर्याची आपल्यावर कृपादृष्टि असतांनाही आपण थंडीनें कुडकुडत आहों. अश्विनी कुमार आपल्याला अनुकूल असूनही आपण व्याधिग्रस्त झालों आहों. आणि अमृताच्या डोहांत पोहत असतांनाही आपण मरणोन्मुख झालों आहों. अशी आपल्या राष्ट्राची स्थिति कोणी केली ? तें आपले सुख काय झालें ? तें आपलें पूर्वींचें सुख आपल्याला फिरून मिळेल काय ? ” पण एवढया वर्णनानें त्यांचे समाधान झालेलें दिसत नाहीं.

“ गंगेच्या कांठीं, सरस्वतीच्या कांठीं, हिमालयाच्या शिखरावर, विंध्याचलाच्या गुहेंत, नर्मदेच्या पाण्यांत, कावेरीच्या लाटांत, रामेश्वराच्या सेतुबंधनांत, गंगोत्रीच्या पहाडांत, प्रतिष्ठान शहरांत, धारा नगरांत, काशी विश्वेशराच्या पुरींत, लाहोरांत, अयोध्येंत, पाटलीपुत्रांत, नागपुरांत, पुण्यनगरींत, सातार्‍यांत, रायगडावर, विजयनगरांत, जिंजीच्या किल्ल्यांत, तंजावरच्या शहरांत आणि तिरुमल नाईकाच्या राज्यांत, आपल्या पूर्वजांच्या आनंदाचे डोह भरलेले होते.—तेथील आनंद कोणीकडे गेला ! ” या लेखाच्या शेवटीं कौंट टॉल्स्टायची गोष्ट देऊन सैतानांनीं तो आनंद नेला असेंच शिवरामपंतांना सांगावयाचें आहे. पण ते प्रत्यक्ष तसें न सांगता कौंट टॉल्स्टायच्या तोंडून सांगतात. म. गांधी ब्रिटिश सत्तेला सैतानी म्हणतात पण शिवरामपंत लोकांनीं ती समस्यापूर्ती करावी असें व्यंजनेनें सांगतात. हे कालाचे व परिस्थितीचें बंधन शिवरामपंतांना कवी व काव्यालंकाराची लेणीं घडविण्यास लावतें. सरकारला अशा लिखाणाबद्दल खटले करतां येत नाहींत म्हणूनच असलें लिखाण जप्त केलें जातें.

पूर्वीच्या वैभवाची मनावर पडलेली ही छाप आणखी दोन तीन लेखांत त्यांनीं प्रकट केली आहे. 'उच्च पर्वताच्या उच्च शिखरावर' हा लेख तर बहारीचा आहे. अत्यंत हळुवारपणें स्वदेश, स्वातंत्र्याबद्दल प्रेम कसें निर्माण करावें हें या लेखांत शिकावयास सांपडते. पितृतर्पण, एका खेडेगांवच्या मनुष्याचे विचार, वगैरे लेख उत्कृष्ठ आहेत.

अशा प्रकारें शिवरामपंतांनीं त्या काळीं आपल्या लेखनद्वारां स्वदेशप्रिती जागृत करण्याचें जें महापाप केलें, त्यामुळेंच त्यांचे लेख जप्त झाले. आजहि ते लेख वाचतांना एक प्रकारचा आल्हाद वाटतो. त्या लेखनांत नुसते जर साहित्य असतें तर त्या लेखावर जप्त होण्याची पाळी आली नसती. त्यांच्या लेखांत राजकारण आहे पण तें राजकारण अशा सुंदर भाषेंत मांडलें आहे कीं, कित्येक वेळा प्रतिपाद्य विषयापेक्षां प्रतिपादन शैलीनेंच वाचक वाहवत जातो. भाषा हें विषयाचें लेणें आहे. एखादा विषय ओबडधोबड, खडबडीत शब्दांत मांडता येतो आणि तोच काव्यमय, लालित्य पूर्ण अशा भाषेंतही मांडतां येतो. कांहींच्या लिखाणांत विचारांचा एवढा प्रचंड खळबळाट असतो कीं, भाषेचीं बंधनें तुटून फुटून जातात. भाषा ही विचारामागें धांवत येते. ते विचार स्वतःला साजेसे शब्द शोधत असतात. पावसाळ्यांत वाहणाऱ्या ओढयांना आणि नद्यांना आपण आपल्या ठराविक पात्रांतून वाहिले पाहिजे असें भान अगर ज्ञान कधीं असतें का? लोंढयामागून लोंढे येतात आणि ते आसमंतातला भूप्रदेश जलमय करून टाकतात.

शिवरामपंताचें लिखाण हे पर्जन्य काळांतील ओढया नद्याप्रमाणें नव्हते. नदीला बांध घालून तिचें पाणी जसें बागेंतल्या पुष्करिणीमध्यें आणि कारंजामध्यें खेळवावे आणि तें पाणी सहस्र जलधारांतून थुईथुई नाचत असावे, त्या पुष्करिणींत शतदलें उमटलीं असावींत आणि पक्ष्यांची क्रिडा चालली असावी तसें हें लिखाण आहे. शिवरामपंत आपल्या लेखांतील प्रत्येक शब्द अत्यंत काळजीपूर्वक लिहीत. त्यांच्या लिखाणांत कलाकार पहावयास सांपडतो. शिवाजीचें चित्र असो किंवा एखाद्या ललनेचें चित्र असो, कलाकार आपल्या कलेचा आविष्कार त्यांत केल्याशिवाय राहत नाहीं. तसें शिवरामपंतांचे आहे. पण शिवरामपंत हे नुसते कलाकार किंवा नुसतें साहित्यिक नव्हते. त्यांनीं आपली कला आपल्या विषयाचें महत्त्व पटविण्याकरतां व वाचकांच्या अंतःकर-

णांत क्षोभ निर्माण करण्याकरतां उपयोगांत आणलीं हेंच त्यांचें वैशिष्ट्य. राजकारण आणि कला यांचा संगम क्वचितच घडून येतो. सामान्यतः राजकारण हा कलेचा विषय नसून तो एक रुक्ष विषय आहे अशी सार्वत्रिक समज आहे. किंबहुना राजकीय लेखांना साहित्याची भाषा ही वर्ज आहे असेंहि समजलें जाते. राजकारणाला दणदणीत शब्द, ठसठशीत विचार आणि खणखणीत आवाज हा अवश्य मानला जातो. राजकारणांत लालित्य आणणारा हा नाटकी, ढोंगी, कृत्रीम असेंहि समजलें जातें. पण ते बरोबर नाहीं असें कै. शिवरामपंतांनीं दाखवून दिलें.

राजकीय निर्बंधामुळें शिवरामपंतांची भाषा अलंकारिक झाली कां मुळच्याच अलंकारिक भाषेनें राजकारणाला नटविले हाहि प्रश्न कांही जण विचारतील. तुरुंगाच्या कचाटींतून सुटण्याकरतां चोरून छपून लिहिणें एवढेंच जर शिवरामपंतांना साधावयाचें असतें व आपली दुर्बलता झाकून प्रतिष्टित पुढारी म्हणून मिरवावयाचें असते तर ते आजन्म राजकारणांत जें राहिले तें राहिलेंच नसते. पहिला तुरुंगाचा हिसका बसतां क्षणींच त्यांनीं राजकारणाला रामराम ठोकला असता. पण त्यांनीं तसें केले नाहीं. मौजेखातर राजकारणावर लिहिणारे आपल्या विचारांत आपलें अतःकरण ओतूं शकत नाहींत. त्यांची भाषा जशी नटवी, तसे त्यांचे विचारही नटवेच असतात. वाचकांवर आपल्या लेखनाचा परिणाम होण्याकरतां लेखक हा अंतःकरणाचा धडा लागतो. ज्याच्या लेखणीची व अंतःकरणाची फारकत झालेली असते तें राजकारणांत फार दिवस टिकूं शकत नाहींत. शिवरामपंतांचें हृदय हें शूराचें, पराक्रमी पुरुषाचें होतें. त्या हृदयांत जीं स्वातंत्र्याचीं आंदोलनें होत, तीं त्यांच्या विचारांच्या द्वारां लेखांत उमटत.

तो काळ अत्यंत कष्टतर होता. भींतीला कान आहेत इतकी भीति लोकांना राजकारणाविषयीं बोलतांना वाटे. अशा काळांत ज्यांनीं आपले विचार जनतेला बोलून व लिहून दाखविले त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें हें आपलें कर्तव्य आहे.

शिवरामपंत हे रसिक होते, ते नुसते राजकारणी नव्हते. त्यांच्या लेखणीला राजकारणाव्यतिरिक्त अन्य क्षेत्रें होतीं. ते नाटककार, कादंबरीकार लघुकथा लेखक होतेच होते. पण त्या शिवाय तर्कसंग्रहासारख्या किंवा पाणीनीच्या

सूत्रासारख्या अत्यंत रुक्ष विषयावरहि त्यांनीं लिहिले आहे. इतिहासाचा त्यांचा अभ्यासही मोठा होता. त्यावरही त्यांनीं ग्रंथ लिहिले.

लोकमान्य टिळक, शिवरामपंत परांजपे हे दोघे दिवंगत पुढारी त्या वेळीं कसें लिहीत व कोणते विचार प्रकट करीत, लोकांच्या भावना कशा प्रदिप्त करीत, जुन्या विचारांना कसे धक्के देत आणि नव्या विचारांचे बीजारोपण कसें करीत हे त्यांच्या लेखावरून पाहावयास सांपडते. महाराष्ट्रांतल्या जनतेनें लोकमान्य टिळकांच्या लेखांचा भरपूर परिचय करून घेतला आहेच. कै. शिवरामपंताच्या राजकीय लेखांचा परिचय करून घेण्याची सुसंधी आज आपल्याला मिळत आहे. आमची खात्री आहे कीं, मराठी वाचक शिवरामपंतांच्या लेखाचे योग्य तें चीज करतील व राष्ट्रीय विचाराचे हे भांडवल मनसोक्त लुटतील.

पुणें
ता. १।९।४६

—त्र्यं. र. देवगिरीकर

एकंदर चालू महर्गतेमुळें **काळांतील निवडक निबंधाची पुस्तकें** जितक्या स्वस्त किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती तितकी देतां आली नाहींत. या करितां काळांतील निवडक निबंधाचे **पहिले भागांत एक सवलतीचें "कूपन" टाकलें आहे.** सवलतीची समग्र माहितीही त्याच भागांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा फायदा घ्यावा. अशी विनंति आहे.

**व्यवस्थापक**

**य. गो. जोशी प्रकाशन कार्यालय**

**सदाशिव पेठ, पुणें २.**

## ते साधुसंत गेले कोठें ? : : १

हल्लीं जशी हिंदुस्थानची सर्वतोपरी वाईट स्थिति झालेली आहे, तशीच पूर्वीं एकदां झालेली होती. काश्मीरपासून रामेश्वरापर्यंत सर्व मुलूख मुसलमानांच्या ताब्यांत होता. लोकांच्या अंगांतील शौर्य, धैर्य, हे गुण मावळून गेले होते. राजकीय सत्ता परकीयांच्या हातांत गेलेली होती. देवळांचे उच्छेद होत होते. ब्राह्मणांचीं जानवीं तोडलीं जात होतीं, आणि हिंदूंच्या डोळ्यांदेखत गाईंच्या रक्ताचे पूर वाहत होते. ज्या रजपूत राजांनीं स्वतंत्रपणें हुकमती चालवाव्या ते मुसलमान बादशहांचे दास होऊन, ते बादशहा स्वतंत्रतेचा बींमोड करण्याच्या ज्या मोहिमेवर पाठवितील तिजवर ते जात असत; आणि रजपुतांच्या स्त्रिया–वीरपत्न्या–ज्यांनीं वीरपुत्रांना जन्म द्यावा त्या आग्र्यास आणि दिल्लीस मुसलमानांच्या लग्नाच्या बायका होऊन राहिल्या होत्या. मोंगल बादशहांच्या जुलुमांनीं आणि तैमुरलंग, नादिरशहा इत्यादिकांच्या लुटालुटींनीं सर्व देश हैराण झाला होता. सुलतानांचे जबरदस्त कर आणि अस्मानच्या कोपामुळें पडलेले दुष्काळ, ह्यांनीं सर्व देश उजाड झाला होता. वसुलाचा तगादा, तापलेले तवे, राखेचे तोबरे, डोकीवर द्यावयाचे दगड, वेठीचा कहर, इत्यादि जुलमी राजांच्या छळणुकीच्या साधनांनीं हिंदुस्थानांतील सर्व लोकांना त्राहि भगवन् असें होऊन गेलें होतें. ही जशी राजकीय बाबतींत स्थिति होती तशीच धार्मिक बाबतींतही झालेली होती. देवळाच्यावर कळस नाहीं आणि देवळाच्या आंत देव नाहीं, अशी भयंकर अवस्था त्या वेळीं झालेली होती. हिंदूंचे मुसलमान, संध्येचा निमाज आणि देवळांच्या मशिदी, याप्रमाणें जिकडे तिकडे स्थित्यंतर झालेलें होतें. हल्लीं खिस्ती लोक फक्त माणसांनाच बाटवितात; परंतु पूर्वीं मुसलमान लोक देवांनाही बाटवीत असत. राजसत्तेची आणि धर्माची

अशी धूळधाण झाल्यामुळें बाकीच्याही संस्थांमधून कांहीं जीव राहिलेला नव्हता सर्व समाजबंधनें विस्खलित झालेलीं होतीं. मिथ्याज्ञानाचा गर्व फार वाढलेला होता. रिकाम्या दांभिकपणाचा अभिमान अतिशय झाला होता. हलक्या जातींतील लोकांच्या अंगामध्यें कोणतेही गुण असले तरी त्यांच्या हीन जातीमुळें त्या गुणांची किंमत होत नसे. असे सर्वतोपरी संकटाचे दिवस एकदां हिंदुस्थानवर येऊन कोसळले होते.

परंतु त्या सर्व संकटांतून हिंदुस्थानची त्या वेळीं सुटका झाली. अशीच स्थिति कायम राहिली आणि अविंधांचे जुलूम असेच अप्रतिहत राहिले तर भरतखंडांत अनर्थ होतील, श्रेष्ठ धर्माचा उच्छेद होईल आणि समाजाचीं बंधनें अव्यवस्थित होतील; इतके परिणाम झाल्यावांचून चुकावयाचे नाहींत, येथपर्यंत स्थिति येऊन पोंहोचली होती. त्या वेळीं दुष्ट इतके माजलेले होते आणि सज्जनांचा इतका छळ होत होता कीं, ती झोटिंग पादशाही पुढें चालूं न देणें हें एक अवश्य कर्तव्यकर्मच होतें. व तें कर्तव्यकर्म करण्यासाठीं त्या वेळीं हिंदुस्थानच्या सर्व भागांतून योग्य माणसें पुढें आलीं. प्रत्यक्ष परमेश्वराला ह्या भरतखंडाची करुणा आली. कृष्णावतारामध्यें कृष्णाच्या सहवासामध्यें जे भगवद्भक्त पृथ्वीतलावर संचार करीत होते आणि आपल्या संचारानें सर्वत्र स्वास्थ्य सुरक्षित राखीत होते त्यांच्याही मनामध्यें आपल्या पूर्वीच्या जन्मभूमीबद्दल आणि तिच्या विपत्तीबद्दल गहिंवर आला. आणि त्या सर्वांनीं ह्या भरतखंडाच्या पुण्यभूमीला उद्धरण्यासाठीं परिश्रम आरंभिले. महाभगवद्भक्त उद्धव हे नामदेवाच्या स्वरूपानें ह्या पृथ्वीतलावर अवतीर्ण झाले. शुकाचार्यांनीं कबीराचा अवतार धारण केला. दिल्लींतील एका कनोजा ब्राह्मणाच्या उदरीं प्रत्यक्ष वाल्मीकिऋषि तुळशीदास होऊन आले. व्यासांनीं जयदेवाचें रूप धारण केलें. दारुकानें द्वारकेच्या प्रसिद्ध कृष्णभक्त रामदासाची भूमिका घेतली. शंकर नरसीमेहता झाले. ब्रह्मदेवानें सोपानाचें शरीर धारण केलें. सदाशिव निवृत्ति झाले. जगद्वंद्य आदिमाता मुक्ताबाईच्या रूपानें प्रकट झाली. आणि प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण आपल्याच गहन गीतेचा अर्थ आणि त्या गीतेंतील मर्म व रहस्य सकल जनांना सुलभ करून देण्यासाठीं ज्ञानदेवाच्या रूपानें प्रकट झाले. मारुती रामदास झाले. श्रीमंगलमूर्ति मोरया गोसावी झाले. आणि प्रत्यक्ष पांडुरंग तुकारामबोवा झाले. अशा रीतीनें भगवान् श्रीकृष्ण परमात्म्यासारख्या देवता, व्यासवाल्मीकि यांच्यासारखे महर्षि,

आणि शुक, उद्धव इत्यादिकांसारखे भगवद्भक्त यांनींच या भरतभूमीला हातीं धरल्यानंतर मग तिचें दुःखविमोचन होण्याला कितीसा उशीर लागणार ! भगवान् आणि त्या भगवंताचे भक्त यांच्यापुढें अविंध राजे, त्यांची अविंध सेना आणि त्यांचा अविद्ध जुलूम यांचा काय पाड लागणार ! भगवद्भक्तांनीं ज्या देशाला तारावयाचें असें मनांत आणिलें त्या देशाला कोणत्या राजाचा जुलूम तुडवूं शकणार ! साधुपुरुषांनीं ज्या देशाला स्वतंत्र करून सोडावयाचें म्हणून संकल्प केला, त्या देशाला गुलामगिरीच्या बंधनामध्यें कोणत्या राजाचें सामर्थ्य अडकवून ठेवूं शकणार आहे ! आणि विरक्त, विदेही, निरभिमानी आणि निष्कलंक सतमंडळानें ज्या देशांतील लोकस्थिति सुधारण्याचा हेतु मनांत धरिला त्या देशांतील लोकांच्या हातून कोणतीं पुण्याईचीं, शौर्याचीं, वीरश्रीचीं, देशाभिमानाचीं, आणि धर्मजागृतीचीं कर्में घडणें अशक्य आहे ! त्या वेळीं हिंदुस्थानांतील लोक जितके निमकहराम, स्वदेशद्रोही आणि स्वधर्मद्रोही झाले होते त्याच्याहून शंभर पटीनें जास्त झाले असते तरीदेखील अशा साधु मंडळींनीं हातीं धरल्यानंतर त्यांना स्वराजनिष्ठ, स्वदेशभक्त, आणि स्वधर्मनिष्ठ व्हावयाला पाहिजेच होतें. इतका ह्या भगवद्भक्तांच्या भक्तीमध्यें विलक्षण जोर होता.

यांनीं हिंदुस्थानचें पुनरुज्जीवन करावयाचें मनांत आणिल्यानंतर, चोर जसे एखाद्या घरांत तें धुऊन काढण्यासाठीं चारी दारांनीं शिरतात, त्याप्रमाणें हे साधु हिंदुस्थानांतील खळमळ धुऊन काढण्यासाठीं सर्व वाटांनीं आंत घुसले जेथें पाहावें तेथें भगवद्भक्त आहेतच, जेथें ऐकावें तेथें टाळविण्याचा नाद ऐकूं येतोच आहे. जेथें पाहावें तेथें कटीवर हात देऊन विटेवर उभा राहिलेला विठोबा दर्शन देतच आहे, जिकडे दृष्टि फेंकावी तिकडे ध्वजापताका नाचतच आहेत, अशी त्या वेळीं हिंदुस्थानांत स्थिति होऊन गेली होती. त्या वेळचा हिंदुस्थानचा धार्मिक नकाशा आपण तयार केला, तर हिंदुस्थानच्या बहुतेक मोठ्या शहरांतून आणि लहान खेड्यांतून कोणी तरी साधुपुरुष अवतीर्ण झालेलेच होते, असें आपल्याला दिसून येतें. ज्ञानदेवानें आळंदी पवित्र केली होती. तुकारामबोवांनीं देहूमध्यें आपली देहधारणा केली होती. तुळशीदासांनीं दिल्लीच्या किल्ल्यावर आपल्या भगवद्भक्तीचें निशाण लाविलें होतें. चांगदेवांनीं पुणतांबें पुण्यवंत केलें होतें. जयदेवांनीं जगन्नाथाला जयशाली केलें होतें. जुनागड येथें नरसीमेहतानें भक्तांचा नवा गड उभारला होता. कबीरांनीं

काशीला आपल्या वास्तव्यानें अधिक पुण्यपावन केली होती. नामदेवाच्या नाम-गजरानें पंढरी शहर शोभिवंत झालें होतें. एकनाथ, जनार्दन, भानुदास, बहिरंभट या मंडळींनीं प्रतिष्ठान शहरीं हिंदुधर्माच्या उत्कर्षाची आणि हिंदुस्थान देशाच्या स्वातंत्र्याची प्राणप्रतिष्ठा करण्याला सुरुवात केली होती. मिराबाईनें उदेपूरचा अभ्युदय केला. दामाजीपंत, कान्हुपात्रा वगैरे संतमंडळींनीं मंगळवेढयाला सुमंगल अशा भगवद्भजनाचा वेढा दिला होता. ह्याशिवाय सूरदासाची मथुरा, रामदासांची परळी, मोरयागोसाव्यांचें चिंचवड, बोधलेबोवांचें धामणगांव, सांवता माळ्याचें लहुळें, जगमित्र जागा याचें परळीवैजनाथ, व संतोबा पोवाराचें रांजणगांव हीं गांवेंही हिंदुस्थानच्या धार्मिक नकाशांतील कमी महत्त्वाचीं ठिकाणें आहेत असें नाहीं. हीं जरी ऐहिक दृष्टीनें खेडेगांवें असलीं तरी ह्या भगवद्भक्तीच्या राजधान्या होत. वर दिलेलीं ठिकाणें हिंदुस्थानचा नकाशांत जेथल्या तेथें मांडून त्या नकाशाकडे पाहिलें तर भगवद्भक्तीचा आणि हिंदुस्थानच्या पुनरुज्जीवनाचा किती दूरवर फैलाव झालेला झालेला होता याची कल्पना आपल्याला बरोबर येईल. पुढें शिवाजी, पहिले बाजीराव, सदाशिवराव, रघुनाथराव आणि महादजी शिंदे यांनीं हिंदुस्थानचा जो विस्तीर्ण राजकीय नकाशा बनविला तो या धार्मिक नकाशाचेंच फळ होय. व त्या राजकीय नकाशामध्यें अटकेपासून दिल्लीपर्यंत आणि गुजराथेपासून बंगाल्यापर्यंत जिकडे तिकडे हिंदुधर्माच्या उज्ज्वल स्वरूपाचीं, स्वदेशभक्तीच्या अचाट कृत्यांचीं आणि स्वतंत्रतेच्या अनिवार्य अभिरुचीचीं जीं चिन्हें दिसतात, तींही सर्व ह्याच धार्मिक चळवळीचा परिणाम होत.

जसें एखादें मोठें सैन्य एखाद्या राज्यावर हल्ला करण्याकरितां निघालें म्हणजे त्यांतील सेनापति कामें वाटून घेतात, आणि अमुकानें अमुक बाजूनें अमुक वेळां यावें, आणि दुसऱ्यांनीं त्याला अमुक वेळीं भेटून अमुक हल्ला करावा असें ठरवून त्याप्रमाणें ते आपलें हल्ल्याचें काम चोहोंकडून एकदम चालवितात, त्याप्रमाणें ह्या साधु मंडळीच्या सैन्यानें क्रम चालविला होता. ह्यांच्या सैन्यांत सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश केला जात होता. शिंपी, कोळी, माळी, कुंभार, चांभार, महार, गुजर, न्हावी, सोनार, मराठे, ब्राह्मण वगैरे सर्व जाती आपला जातिभेद क्षणैक बाजूला ठेवून अत्यंत सलोख्यानें एकमेकांत मिसळत होते. स्त्री आणि पुरुष हाही भेद यांनीं मनांत आणला नव्हता. जनाबाई, मिराबाई,

मुक्ताबाई, निराबाई अशांसारख्या पुष्कळ स्त्रिया ह्यामध्यें प्रमुखत्व पावलेल्या होत्या. अशा रीतीची ही विलक्षण सेना—जातिभेद विसरून, रोहिदास चांभार आणि ज्ञानदेव ब्राह्मण हे ज्यांत एकत्र झाले आहेत अशी ही विलक्षण सेना—तयार होऊन, मुसलमानी जुलमावर चारी बाजूंनीं भगवद्भक्तीचे हल्ले करूं लागल्याबरोबर म्लेंच्छांचें राज्य डळमळूं लागलें. मराठे लोकांत स्फुरण आलें. शिवाजी, संताजी, एसाजी, तान्हाजी वगैरे अनेक शूर पुरुष निर्माण झाले आणि त्यांनीं हिंदुपद पादशाहीचा पाया घातला व थोरल्या बाजीरावानें त्याजवर अति भव्य अशी इमारत बांधली. तेव्हां धर्माला स्वराज्य मिळालें, स्वराज्यानें डोकें वर काढलें, आणि लोकांमध्यें आबादानी झाली.

ह्याप्रमाणें ज्यांनीं हिंदुस्थान देशाचें पुनरुज्जीवन केलें, आणि धर्माच्या पाटाचें पाणी खुलें करून स्वराज्य, समाजसुव्यवस्था, राष्ट्रीय उत्कर्ष, इत्यादि फुलझाडांना टवटवीतपणा आणिला, त्या महासाधुपुरुषांची आज हिंदुस्थानाला फार अपेक्षा आहे. आपल्या देशाला आज ते पाहिजे आहेत. आज आपल्या लोकांमध्यें अनेक प्रकारचे दोष आणि दुर्गुण शिरलेले आहेत. ते घालवून टाकण्याला ते साधुपुरुष जर आपल्यामध्यें फिरून येतील तर आपल्याला ऊर्जितदशा येण्याला अवकाश लागणार नाहीं. तुळसीदासासारखे संसाराला विटून श्रीरामचरणीं लागलेले साधु आपल्याला आज पाहिजे आहेत. ज्या तुळशीदासाचें चरित्र प्रत्यक्ष रामानें लिहून ठेविलें, आणि ज्याच्या हातचा नैवेद्य प्रत्यक्ष नंदीनें भक्षण केला, इतकी ज्यांची पुण्याई, असे साधु जर हल्लींच्या काळांत अवतीर्ण झाले तर ते काय करणार नाहींत ? हल्लीं पुष्कळ राजे आणि पुष्कळ लोक दुराग्रही आणि नास्तिक झालेले आहेत. त्यांची खात्री करून देण्याला तुळशीदासासारखेच विरक्त आणि निःस्पृही महापुरुष पाहिजेत. तुळशीदासाजवळ एकदां अकबर बादशहानें, मला राम प्रत्यक्ष दाखीव, नाहीं तर तुला जाण्याला प्रतिबंध करीन, असें सांगितलें. तुळशीदासानें बारा वर्षेंपर्यंत कडकडीत तपश्चर्या केली त्या वेळीं त्याला श्रीरामाचें दर्शन झालें; तें दर्शन बादशहाला त्याच्या हुकमावरून कसें व्हावें ? तें काय वाटेवर पडलें आहे ? परंतु बादशहाचा त्रास होऊं लागला म्हणून तुळशीदासानें आपल्या प्रभावानें त्या वेळीं रामाची दहासहस्र वानरसेना दिल्ली शहरामध्यें निर्माण केली. दहा हजार वानर दिल्ली शहरांत येऊन उतरतांक्षणीं तेथें फारच गोंधळ उडून गेला. दिल्ली हें अविंधां-

च्या राजधानीचें शहर असल्यामुळें, तेथें अनेक अविचारी आणि दुर्व्यसनी लोक होतेच. त्या सर्वांचा समाचार घेण्याला त्या वानरांनीं सुरुवात केली. 'श्रीराम-भजनीं विमुख जन । विष्णुभक्तांचें करिती छळण । त्यांसी अकस्मात उचलून । कुत्सित न्हाणींत टाकिती ॥ शेट सावकार दुर्जन । कदा न करिती अन्नदान । त्यांचीं भांडारें फोडून । जाती घेवोनी वानर ॥ हाहाकार मांडिला थोर । मग प्रवेशिलें राजमंदिर । नाक कान तोडिती वानर । आकांत थोर मांडिला ॥ राज-स्त्रिया पांचशत । नाटकशाळेंत बैसल्या समस्त । वानर येऊनि अकस्मात । त्यां-वरी करिती दीर्घशंका ॥ चोर जार कुटिल दुर्जन । यांसी अकस्मात उचलून । राममंदिरांत नेऊन । देतात टाकून उर्ध्वपंथें ॥ वस्त्रेंभूषणें हिरून घेती । गगन-मार्गें उडोनी जाती । दीन गरीब जे अन्नार्थी । त्यांसी देती संतोषें ॥ दरिद्री केले भाग्यवंत । व्यवहारी नागविले समस्त । असत्य वचन जे बोलत । वानर ताडिती तयांसी ॥ ' नास्तिक आणि सुधारलेल्या मतांच्या लोकांचें समाधान कांहीं केल्यानेंही व्हावयाचें नाहीं. परंतु ह्या वानरांनीं घातलेल्या समजुतीनें त्यांचीं तोंडें तत्काळ बंद झालीं. आपल्या तिजोरींत लक्षावधि रुपये पडलेले असले आणि रस्त्यावर लक्षावधि माणसें दुष्काळानें मरणोन्मुख होऊन पडत असलीं तरी देखील कोणी सुखासमाधानानें त्यांतील एक पैसुद्धां गरिबांना देणार नाहीं. पण त्या वेळीं वानरांनीं दिल्लींतील श्रीमंतांकडून गरिबांना पुष्कळ दानधर्म करविला. यूरोप खंडामध्यें सोशियालिस्ट म्हणून जे एका मताचे लोक आहेत त्यांचें मात्र असें म्हणणें आहे कीं, श्रीमंतांच्याजवळ जें अन्न आणि वस्त्र आहे त्याची सारखी वांटणी केली तर गरीब लोक कधींही उपाशी मरावयाचे नाहींत किंवा थंडीनें कुडकुडत पडावयाचे नाहींत; पण ह्या मताची अम्मलबजावणी त्यांना अजूनपर्यंत कधींही करितां आली नाहीं. परंतु ह्या वेळीं दिल्लीमध्यें वानरांनीं सोशियालिझमच्या ह्या तत्त्वाचा गरीब लोकांना पूर्णपणें अनुभव आणून दिला होता. सुधारणेच्या काळांत सुधारलेल्या लोकांना सुधारलेलें खोटें बोलण्याचा इतका कांहीं प्रसंग येतो कीं, ती खोड जाणें फार दुरापास्त होतें. पण वानरांनीं दिल्लीमध्यें असत्य भाषणावर एक वस्ताद औषध देऊन तें अगदीं बंद केलें होतें. अशा रीतीनें दिल्ली शहरांत त्यांनीं थोडक्या वेळांत बरीच नैतिक सुधारणा घडवून आणिली. तों इतक्यांत बादशहाला ही बातमी कळली. तेव्हां त्यानें ' हें काय ?' म्हणून तुळशीदासाला विचारलें. तुळशीदासानें

सांगितलें, 'तुम्हांला श्रीरामाचें दर्शन पाहिजे आहेना ? त्यांचें हें सैन्य पुढें आलें आहे. तें फक्त दहा हजारच आहे. याच्या पाठीमागून अठरा पद्में वानर यावयाचे आहेत. आणि त्याच्यामागून श्रीरामचंद्र येतील. महाराज, अशा रीतीनें आपल्या सैन्यासहवर्तमान रघुपति आपल्या दर्शनाला दिल्लीस येत आहेत. तेव्हां आपण किती मोठे आहां!' बादशहा मनांत म्हणाला, हें दहा हजार सैन्य आलें नाहीं तोंच माझ्या शहराची ही दशा उडून गेली; मग ते अठरा पद्में वानर आले तर काय अवस्था करतील ! असा विचार मनांत आणून माझी रामदर्शनाची इच्छा परिपूर्ण झाली, असें बादशहानें तुळशीदासाला सांगितलें. ते तुळशीदास आज पाहिजे आहेत; ते जर आपल्या दहा हजार वानरांना हल्लीं हाका मारतील तर त्या वानरांना किती तरी दिवस पुरेल असें नैतिक सुधारणेचें काम आज आपल्या देशामध्यें आहे ! नुसते नास्तिक सुधारकच त्या वानरांचीं कित्येक वर्षें खाऊन बसतील! ह्याशिवाय गरिबांना अन्नदान न करणाऱ्या किती तरी तिजोऱ्या त्यांना फोडाव्या लागतील ! आणि चोर, जार, कुटिल, दुर्जन आणि असत्यवादी यांची समजूत घालतां घालतां तर वानर टेकीस येतील. तरी पण त्यांची आज आवश्यकता आहे. पुष्कळ सभा, भाषणें, आणि ठराव करून पाहिले, पण अजून आपली नैतिक सुधारणा होत नाहीं. तुळशीदास कृपा करतील तर मात्र तसें तात्बडतोब होण्याचा संभव आहे.

नामदेवासारखे भगवद्भक्तही आपल्याला आज पाहिजे आहेत. जे प्रत्यक्ष उद्धवाचा अवतार आहेत आणि अयोनिजत्वामुळें ज्यांना एका शिंपींत घालून भीमरथीच्या प्रवाहामधून दामाशेटीच्या हातीं समर्पण करणें ईश्वराला भाग पडलें, त्या नामदेवासारखे साधुपुरुष फिरून फिरून निर्माण होऊन जर ते हल्लींची स्थिति पाहतील तर खात्रीनें त्यांना आपली दया आल्यावांचून राहणार नाहीं. नामदेव कीर्तन करीत असतांना यवनांनीं कीर्तनांत गाईचा वध केला. त्या गाईला नामदेवानें उठविलें. अशा प्रकारचे आमच्या मारलेल्या गाई फिरून आम्हांला देणारे नामदेव आज आपल्याला किती तरी पाहिजे आहेत ! पूर्वी अशा रीतीनें गाई थोडया मारल्या जात होत्या, आणि त्या जिवंत करणारे मात्र पुष्कळ होते. आतां गाई मात्र सडकून मारल्या जातात, आणि त्यांना जिवंत करणारा कोणी नाहीं ! प्रत्येक 'स्लॉटर हाउस' वर दहा दहा नामदेव ठेविले तरी त्यांच्यानें काम पुरें होईल किंवा नाहीं याच्याबद्दल शंका आहे. इतकी नाम-

देवाची आज आपल्याला उणीव आहे. पण नामदेव हल्लींच्या काळीं आणखीही एक कार्य करावयाला पाहिजे आहेत. नामदेवाच्या बायकोनें एक परीस आणलेला त्याच्या हातीं लागला. तो घेऊन त्यानें चंद्रभागेमध्यें फेंकून दिला. अशा द्रव्याविषयींची निरपेक्षता शिकविण्याला आपल्याला नामदेव पाहिजे आहेत. त्या परिसाचा मालक रागावूं लागला, तेव्हां नामदेवांनीं चंद्रभागेंतील रेती बाहेर काढून तुझा ह्यांतला कोणता परीस असेल तो ओळखून घे, असें त्याला सांगितलें. ते रेतीचे खडे दिसत होते. पण त्यांतील एक घेऊन लोखंडाला लावल्याबरोबर त्या लोखंडाचें सुवर्ण झालें. भगवद्भक्ति आणि स्वतःचे परिश्रम हेंच धन होय, आणि हाच परीस होय. हा परीस जेथें न्यावा तेथें द्रव्याला काय तोटा ? हें तत्त्व शिकविण्याला आपल्यामध्यें आज नामदेव पाहिजे आहेत.

गोरा कुंभार याच्यासारखा महाज्ञानी आणि चांगला परीक्षक साधुही कोणी तरी आज अवश्य पाहिजे आहे. एकदां बरीच संतमंडळी एकत्र बसली असतां गोरा कुंभार मडकीं थापटण्याचें एक लांकडाचें थापटणें हातांत घेऊन तेथें आला. त्या वेळीं ज्ञानदेवांनीं तेथें बसलेल्या मंडळींच्या डोक्यांना अनुलक्षून गोरा कुंभाराला म्हटलें कीं, येथें पुष्कळ मडकीं आहेत, ह्यांतून, गोऱ्या कुंभारा, कच्चे घट कोणते आणि पक्के कोणते आहेत ह्याची परीक्षा कर पाहूं. तेव्हां ज्ञानदेवाचा अर्थ समजून गोरा कुंभार आपल्या हातांतील लांकडाच्या थापटण्यानें प्रत्येक साधूचें डोकें ठोकून पाहूं लागला. अशा प्रकारचे परीक्षक आज पाहिजे आहेत. हल्लीं देशहित साधणारे, धर्माची उन्नति करणारे, व्यापार वाढवीत असणारे, जुन्या कलांस उत्तेजन देणारे, कौन्सिलांतून भांडणारे आणि बंगल्यांतून गोड बोलणारे अनेक कार्यसाधू साधु मी मी म्हणून पुढें येत आहेत. या सगळ्यांचीं डोकीं लांकडाच्या थापटण्यानें ठोकून पाहून त्यांतील कच्चे घट कोणते हें पाहावयाला पाहिजे आहे. यदाकदाचित् गोरा कुंभार हातांत थापटणें घेऊन आलाच तर हल्लींच्या पक्क्या म्हणून मानलेल्या जाणाऱ्या घटांपैकीं बहुतेक घट कच्चे ठरतील !

नागनाथासारखे साधु पुरुष आज निर्माण होतील तर त्यांचे जगावर किती तरी उपकार होणार आहेत ! धर्मांतरासाठीं आज जे अनर्थ होत आहेत ते टाळण्याला नागनाथावांचून दुसरा कोणीही समर्थ आहे असें दिसत नाहीं. पूर्वीं पैठण शहरांत बहिरंभट या नांवाचा एक ब्राह्मण राहत असे. तो पुढें

यवन झाला व यवनाचा फिरून ब्राह्मण झाला. पूर्वीचा हिंदु म्हणून कान टोचलेले होते व नंतरचा मुसलमान म्हणून सुंता केलेली होती. तेव्हां त्याला व इतर लोकांना प्रश्न उत्पन्न झाला कीं, हा हिंदु कीं यवन ? परंतु बहिरंभटाचा देह कुटून व नवा करून नागनाथांनीं कान टोंचण्यावर किंवा सुंता करण्यावर धर्म अवलंबून नाहीं हें सर्व लोकांना सिद्ध करून दाखविलें. पाणी शिंपडून अज्ञान मुलांना ख्रिस्ती करणाऱ्या मिशनरी लोकांना असा एखादा नागनाथ भेटेल तर किती तरी अनाथालयांचें काम वांचेल.

कबीरासारख्या साधूंचीही आपल्याला फार आवश्यकता आहे. ध्यानस्थ योगी एकाग्र चित्तानें वैकुंठलोकीं भगवंताला शोधीत असतां, ज्या कबीराचे शेले विणण्याकरितां गेल्यामुळें, वैकुंठांत तो कोठें त्यांना सांपडेना, त्या कबीरासारखे साधु जर हल्लीं अवतीर्ण होतील तर त्यांना काय अशक्य आहे ? कबीर एक दिवस रस्त्यानें चालला असतां कोणी एक वाणीण दळीत बसली होती. तें पाहून कबीर तेथेंच उभा राहिला आणि दीर्घ स्वरानें रुदन करूं लागला. वाटेनें जाणारे लोक त्याला हंसूं लागले, परंतु त्याचें रडणें थांबेना. अखेरीस त्या रस्त्यानें निपटनिरंजन हे साधु आले. तेव्हां हे योग्य पुरुष आहेत असें जाणून कबीरानें आपल्या रडण्याचें कारण त्यांना सांगितलें. कबीर म्हणाला, 'जातें फिरतां देखिलें जाण । त्यामाजीं पीठ होताति कण । तैशीच गती मजकारण । भवचक्रांत पडिलिया ॥' सध्यांची आपली स्थिति अशाच प्रकारची आहे. आपण जात्याच्या दोन तळ्यांमध्यें सांपडून त्यांमध्यें आपलें पीठ होत चाललें आहे. आपण शेंकडों जातीं धान्याचें पीठ करतांना पाहिलीं असतील. पण त्या जात्यामध्यें आपण आपली स्थिति अजून कधींही पाहिली नाहीं. आपणही जात्याखालीं चिरडले जात आहों व अखड गेलेले पीठ होऊन बाहेर पडत आहों, तरी पण आपले डोळे उघडत नाहींत; आणि कबीराला अनुताप झाला तसा आपल्याला अजून होत नाहीं. तो अनुताप कसा करून घ्यावा हें शिकविण्यासाठीं कबीर आज आपल्यामध्यें पाहिजे होते !

कबीर काय, सर्वच साधु आपल्यामध्यें आज पाहिजे होते. रेड्याकडून वेद बोलविणारे ज्ञानेश्वर, देहावरील कातडीच्या आंतमध्यें आपलें यज्ञोपवीत लपवून ठेवणारे रोहिदासासारखे चांभार, सूरदास आणि दामाजीपंत यांच्यासारखे कोठारें फोडून दुष्काळांतील लोकांना अन्न देणारे परोपकारी पुरुष,

भानुदासासारखे खरी किंमत सांगणारे दुकानदार, आपल्या शेतांतील कणसें तोडून गरीब वारकऱ्यांना देणारे बोधलेबोवा, हे सर्व साधुपुरुष आपल्याला पाहिजे आहेत. जिचे अभंग प्रत्यक्ष देव लिहीत होता त्या जनाबाईसारख्या स्त्रिया आणि मिराबाईसारख्या राजकन्या आपल्याला पाहिजेत. त्या सर्व संतमंडळीची आज आपल्याला अत्यंत आवश्यकता आहे.

पण हे संतजनहो, तुम्ही कोठें आहां? त्या वेळीं सर्वजण एकदम आलां, आणि आतां सगळेचजण कोणीकडे नाहींसे झालां? हल्लीं तुमच्यापैकीं कोणीही दिसत नाहीं, असे तुम्ही गेलां तरी कोठें? त्या वेळेलाच तुम्ही जे सगळे आलां, तें या वेळेला कांही शिल्लक राहिलां असतां तर चाललें नसतें काय? त्या वेळचे लोक इतके पुण्यवान् होते काय कीं, तुम्ही सगळे त्यांच्याच वांटणीला जावेत; आणि हल्लींचे लोक इतके पापी आहेत काय कीं, त्यांच्या वांटणीला तुमच्यापैकीं कोणीही येऊं नये? हिंदुस्थान देशाच्या पुनरुज्जीवनासाठीं तुम्ही पूर्वीं जसे धांवत आलां तसे आतां कां येत नाहीं? हिंदुस्थान हा देश तुमचाच देश नव्हे काय? हिंदुधर्म हा तुमचाच धर्म नव्हे काय? आणि हिंदुस्थानांतील लोक हे तुमचेच देशबांधव नव्हेत काय? मग त्यांच्यावर अशी निष्ठुरता तुम्हीं काय म्हणून करावी? जे रंजलेले आणि गांजलेले असतील त्यांच्यावर निरपेक्ष रीतीनें कृपा करावी हा तुमचा पूर्वीचा धर्म तुम्ही विसरलां काय? तुमचा देश, तुमचा धर्म आणि तुमचे देशबांधव तुमची वाट पाहत आहेत. तुमच्या ध्वजापताकांकडे त्यांचे डोळे लागलेले आहेत. आणि तुमच्या नामगजराचा ध्वनि ऐकण्यासाठीं त्यांचे कर्ण तृषित झालेले आहेत. त्यांची इच्छा तुम्ही केव्हां परिपूर्ण करणार?

---

# परधर्मीय अम्मल झुगारून देण्याला धर्मभेद हें योग्य कारण आहे काय ? : : २

यूरोप खंडाचा पूर्वेकडील कांहीं भाग टर्कीच्या सुलतानाच्या अमलाखालीं आहे. सुलतान मुसलमानी धर्माचा आहे, हें तर प्रसिद्धच आहे. व यूरोपच्या पूर्व भागांतील त्याच्या अमलाखालील प्रांतांतील कांहीं लोक खिरस्ती धर्मानुयायी आहेत. सुलतानाची राज्यपद्धति यूरोपांतील इतर खिरस्ती राजांच्या राज्यपद्धतीप्रमाणें सुधारलेली नसेल, तरी पण त्याच्या अमलाखालीं प्रजेला पुष्कळ सुख आहे. असें असूनही त्या प्रजेपैकीं खिरस्ती धर्मातील लोक टर्कीच्या अमलापासून स्वतंत्र होण्याचा आज कित्येक वर्षेंपर्यंत प्रयत्न करीत आहेत. व यूरोपांतील इतर खिरस्ती लोक त्यांच्या प्रयत्नांना साह्य करीत आहेत. सुलतानाच्या अमलापासून स्वतंत्र होण्याकरितां हे लोक जीं कारणें प्रतिपादन करीत आहेत त्यांमध्येंच असेंही एक कारण त्यांच्याकडून पुढें आणण्यांत येतें कीं, मुसलमानी धर्माच्या सुलतानाच्या जुलुमाखालीं खिरस्ती धर्मातील लोकांनीं राहणें बरोबर नाहीं; व म्हणून इतर स्वतंत्र खिरस्ती लोकांनीं आपल्या धर्मबांधवांना मदत करून त्यांना मुसलमानी जुलमांतून सोडविणें फार अगत्याचें आहे. बल्गेरियन आणि मॅसिडोनियन लोकांना स्वतंत्र होण्याला दुसरीं कोणतींही कारणें असोत, पण हें वर दिलेलें कारण मात्र भयंकर आहे. ह्या धर्मभेदाच्या कारणाठींच जर मॅसिडोनियन लोकांनीं मुसलमानी जुलमापासून स्वतंत्र झालें पाहिजे असें असेल, तर जगांतील किती तरी दुसऱ्या लोकांनीं तसेंच स्वतंत्र झालें पाहिजे, असें प्राप्त होतें. तुर्की साम्राज्यामध्यें मुसलमानी अमलाखालील जर खिरस्ती लोकांनीं राहूं नये, तर मग ब्रिटिश साम्राज्यामध्यें तरी इंग्लिशांच्या अमलाखालीं मुसलमानांनीं कां राहावें ? मॅसिडोनियांतील खिरस्ती लोकांना साह्य

करण्याला जसे इतर स्वतंत्र देशांतील ख्रिस्ती लोक आहेत, तसेच हिंदुस्थानांतील मुसलमान लोकांना साह्य करण्याला इराण, अफगाणिस्थान, टर्की वगैरे स्वतंत्र देशांत मुसलमान लोक नाहींत असें नाहीं. आणि असें जर झालें आणि ही जी एक केवळ कल्पना आहे तिला वास्तविकत्व आलें, तर ती गोष्ट ख्रिस्ती लोकांना कितपतशी रुचेल ? धर्माच्या तत्त्वावर राज्याची वांटणी करण्याचें तत्त्व स्वीकारलें तर हल्लींची युरोपियन साम्राज्यें हिंदुस्थानांतील दुष्काळग्रस्त माणसां-प्रमाणें अगदीं रोड आणि मरणोन्मुख होऊन जातील. विस्तीर्ण ब्रिटिश साम्राज्याची लांबीरुंदी फक्त इंग्लंड आणि स्कॉटलंडच्या लांबीरुंदी इतकीच होईल. व फ्रान्सला आफ्रिकेंतील दरवेशी लोकांवर आणि जर्मनीला चीनमधील बौद्ध धर्मानुयायी लोकांवर साम्राज्य गाजवितां येणार नाहीं. धर्माच्या तत्त्वावर राज्याची मर्यादा ठरवावयाची झाली तर, हिंदुस्थानांत साहेबांपासून महारणींच्या पोटीं झालेल्या हिंदुस्थानच्या नागरिकांवरच काय तो फक्त इंग्लंडला अंमल बजावितां येईल. आणि बाकीच्या सर्व लोकांना आपल्या राजकीय बंधनांतून इंग्लंडनें मोकळें करणें प्राप्त होईल. परंतु असले परिणाम कोणत्याही युरोपियन राष्ट्राला इष्ट नाहींत. तर मग ज्या धर्मतत्त्वाचे परिणाम आपल्याला कबूल नाहींत तें धर्माचें तत्त्व ह्या ख्रिस्ती लोकांनीं मुसलमानांच्या राज्याला तरी काय म्हणून लावावें ? ख्रिस्ती राजे जर हिंदु, मुसलमान, बौद्ध, जैन, ज्यू, पार्शी, निग्रो, काफीर, हॉटेंटॉट, रेड इंडियन, मोंगोलियन वगैरे सर्व धर्मांच्या आणि जातीच्या लोकांवर राज्य करण्याला चालतात, तर मुसलमान राजा ख्रिस्ती लोकांवर राज्य करण्याला कां चालूं नये ? आणि ख्रिस्ती लोकांना मुसलमान राजा चालत नसेल तर मग इतर लोकांना तरी ख्रिस्ती राजा काय म्हणून चालावा ?

वास्तविक पाहिलें तर, राजा कोणत्याही धर्माचा असला तरी तो जोंपर्यंत नीतीनें राज्य करितो आहे, तोंपर्यंत त्याच्या अमलाखालीं दुबळ्या लोकांना राहण्याला कांहीं हरकत नाहीं. पण असलीं तत्त्वें हिंदुस्थानसारख्या पूर्वेकडील सात्त्विक देशांतून मान्य असलीं तरी तीं पश्चिमेकडील तमोगुणी आणि रजो-गुणी ख्रिस्ती लोकांना कधींही पसंत पडावयाचीं नाहींत. मुसलमानांच्या अमला-पासून स्वतंत्र होण्याविषयींचे ख्रिस्ती लोकांचे प्रयत्न कित्येक वर्षे चाललेले आहेत. त्या प्रयत्नांनीं सर्व्हिया, मॉंटिनिग्रो वगैरे कांहीं प्रांत आधींच स्वतंत्र

झालेले आहेत; व हल्लीं मॅसिडोनियाची स्वतंत्र होण्याची खटपट जारीनें सुरू आहे. पूर्वी ह्या लोकांचे प्रयत्न बऱ्याच सौम्य दिशेनें चालले होते. आपल्या स्वतःच्या शाळा काढणें, आपल्या धर्ममताची नवीन स्थापना करणें, शेतकरी लोकांचीं मनें आपल्याकडे शांततेनें हळूहळू वळवून घेणें, इत्यादि कोंवट उपाय मॅसिडोनियन लोक पूर्वी योजीत होते. परंतु असल्या उपायांमध्यें विनाकारण पैसे आणि श्रम मात्र खर्च होतात, आणि त्यांपासून निष्पन्न कांहीं एक होत नाहीं, असें त्यांना आढळून आल्यापासून त्यांनीं तो मार्ग सोडून देऊन दुसऱ्या मार्गाचें अवलंबन केलें आहे. त्यासाठीं त्यांनीं एक मॅसिडोनियन कमिटी स्थापन केली आहे. ह्या कमिटीचे काय उद्देश आहेत आणि ते कशा रीतीनें परिपूर्ण करण्यांत येत आहेत, याबद्दलची कल्पना पुढें दिलेल्या त्यांच्या नियमांतील कांहीं भागावरून कोणाच्याही मनामध्यें सहज येण्यासारखी आहे. ह्या मॅसिडोनियन कमिटीच्या गुप्त कायद्यांतील कांहीं कांहीं गोष्टी येणेंप्रमाणें आहेत :—प्रत्येक जिल्ह्यांतील बल्गेरियन लोकांची एक एक टोळी असावी, व कमिटीचे अध्यक्ष जो हुकूम सोडतील तो त्यांनीं अमलांत आणावा. ह्या टोळींतील लोकांना कमिटीकडून हत्यारांचा पुरवठा करण्यांत येईल. प्रत्येक जिल्ह्यांतील राज्यक्रांतिकारक मंडळीच्या कमिटीकडून ह्या टोळ्या तयार करण्यांत येतील, आणि जें लष्करी शिक्षण अवश्य असेल तें त्यांना देण्याची तजवीज करण्यांत येईल. ह्या लोकांनीं आपला दारूगोळा आपण मिळवावा व तो त्यांनीं दडवून ठेवावा. राजाच्या विरुद्ध कांहीं कट करावयाचा असेल तेव्हां चोहोंकडे फिरून आणि तपासणी करून मुख्य कमिटीच्या आज्ञा बरोबर पाळल्या जात आहेत किंवा नाहीं हें ठिकठिकाणच्या राज्यक्रांतिकारक मंडळीच्या कमिट्यांनीं पाहिलें पाहिजे. ज्या ठिकाणीं राज्यक्रांतिकारक लोक नाहींत तेथील नेटिव लोकांना उठविण्याकरितां आणि तेथें हत्यारबंद टोळी बनविण्याकरितां प्रयत्न केले पाहिजेत. ठिकठिकाणच्या कमिट्यांनीं आपल्या भाषणांनीं आणि आशाजनक अभिवचनांनीं लोकांच्या मनामध्यें राज्यक्रांतीच्या कल्पना जास्त फैलावतील अशी तजवीज केली पाहिजे. हत्यारबंद टोळ्यांतील लोकांनीं नवीन माणसांना मन वळवून किंवा भीति घालून आपल्यामध्यें आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अधिकाऱ्यांच्या दृष्टीस न पडतील अशा रीतीनें हत्यारें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं छपवून नेतां आलीं पाहिजेत. सोफिया येथील मुख्य

कमिटीच्या प्रेसिडेंटचा हुकूम होईल तेव्हां, प्रत्येक ठिकाणच्या टोळीनें बंडाचें निशाण उभारण्याला तयार असलें पाहिजे. टोळींतील लोकांनीं इतर लोकांशीं नेहमीं चांगल्या रीतीनें वागत असावें; म्हणजे प्रसंग येईल तेव्हां वाटेल तीं झीज सोसण्याला ते लोक तयार होतील. राज्यक्रांतीपासून चांगले परिणाम झालेच पाहिजेत असें लोकांच्या मनामध्यें नेहमीं भरवीत असावें; म्हणजे ह्या उपायांनीं लोकांचीं मनें तयार होऊन ते योग्य वेळीं उठण्याला मागें घ्यावयाचे नाहींत. देशांतील डोंगर, खिंडी आणि आश्रयाच्या जागा या सर्वांची माहिती करून घेतलेली असली पाहिजे; व प्रत्येक खेडयामध्यें जें कांहीं कमीजास्त होईल त्याची माहिती तेथील लोकांकडून आपल्याला मिळेल, अशी तजवीज झाली पाहिजे. कमिटीचे हेतु सिद्धीस नेण्याच्या मार्गांत जे कोणी अडथळा आणीत असतील त्यांना दूर करून तसें केल्याबद्दलची वर्दी सोफिया येथील कमिटीकडे टोळींतील लोकांनीं दिली पाहिजे. टोळींतील लोकांना मिळालेले हुकूम गुप्त ठेवण्यांत आले पाहिजेत. लांच देऊन सरकारी अधिकाऱ्यांकडून करून घेतलेलीं कामें पट्कर्णी होतां उपयोगी नाहींत. कमिटी आणि टोळींतील लोक यांच्यामध्यें बातमी पोंचविण्याकरितां इन्स्पेक्टर्स असावेत. ह्या कामापैकीं कोणतीही गोष्ट बायका आणि मुलें यांच्या कानावर जातां उपयोगी नाहीं. कारण यांच्यापासून गुप्त बातमी काढून घेण्यासाठीं सरकार त्यांना जी शिक्षा देईल किंवा त्यांचा जो छळ करील तो सहन करण्याचें त्यांच्या अंगामध्यें सामर्थ्य नसतें. नवीन लोक टोळीमध्यें येऊन सामील झाले तर त्यांनीं भलभलते खोलांतील प्रश्न विचारू नयेत व त्यांना ते सांगूंही नयेत. कमिटीच्या अध्यक्षांचा हुकूम मिळाला तर विशेष कारणासाठीं दोन टोळ्यांतील लोकांनीं एकत्र व्हावें. कोणत्याही टोळीचा सरकारी सैन्य पाठलाग करीत असल्यावांचून किंवा अशाच कांहीं विशेष कारणावांचून त्या टोळीनें आपल्या जिल्ह्याची हद्द सोडून पलीकडे जाऊं नये. टोळींतील लोकांनीं आपसांत एकमेकांचा सूड घेऊं नये, किंवा कोणत्याही खेडयावर हल्ला करूं नये. प्रत्येक पोटकमिटीनें आपण काय काय काम केलें याबद्दलचा रिपोर्ट महिनाअखेर सोफिया येथील मुख्य कमिटीकडे पाठविला पाहिजे. प्रत्येक कमिटीच्या अध्यक्षानें आपल्या हाताखालील लोकांना कपडे, शस्त्रें आणि अन्नसामग्री यांचा पुरवठा केला पाहिजे व दडून बसण्याचा प्रसंग आला तर अशा जागा कोठें आहेत हें त्या अध्यक्षानें टोळींतील लोकांना

सांगितलें पाहिजे. टोळींतील लोकांनीं आपल्या अंगावर कोणत्याही प्रकारचे कागद ठेवितां कामा नये. आपसांतील तंट्यांचा शेवटचा निकाल सोफिया येथील कमिटी करील तो मान्य केला पाहिजे. प्रत्येक टोळीमध्यें एक अध्यक्ष आणि एक त्याचा सेक्रेटरी असावा. टोळींतील सर्व लोक तरुण आणि शूर असून डोंगराळ मुलखांत दिवस काढण्याची त्यांना संवय असावी. जो हुकूम होईल तो बजावण्यासाठीं टोळींतील लोक हुशार आणि उत्सुक असावे. आपल्या जबरदस्त मागण्यांनीं खेड्यांतील लोक त्रासून जातील असें कधींही न करतां त्यांचा आपल्यावर विश्वास बसेल अशा रीतीनें शांतपणानें त्यांच्याशीं टोळीं-तील लोकांनीं वागलें पाहिजे, जो आपल्या स्वतःच्याच फायद्याकडे पाहील आणि लढाईचे वेळीं पळून जाईल त्याला परत घेतला जाणार नाहीं. टोळ्यांमधील सर्व लोकांचा हक्क सारखा मानला जाईल. स्थानिक अध्यक्षांच्या हुकुमावांचून ह्या लोकांनीं आपल्या नातेवाइकांना किंवा मित्रांना भेटावयाला जातां कामा नये. आपण कोठून आलों आणि आपलें नांव काय वगैरे गोष्टी त्यांनीं नेहमीं गुप्त ठेविल्या पाहिजेत. दुसऱ्या टोळींत जाऊन मिळण्याच्या मिषानें कोणालाही आपली पहिली टोळी सोडतां यावयाची नाहीं. कमिटीचे गुप्त हेतु कोणी बाहेर फोडील किंवा स्वतःच्या फायद्यासाठीं कोणी निमकहराम-पणा करील किंवा लढाई चालली असतां कोणी पळून जाईल तर त्याला जागच्या जागीं देहान्त प्रायश्चित्त दिलें जाईल. अशा रीतीची रचना करून मॅसिडोनियन लोकांनीं टर्कीच्या सुलतानाच्या जुलमापासून स्वतंत्र होण्याची तयारी चालविली आहे. व पुढें जें बंड करावयाचें आहे, त्या बंडाचा कर सर्व लोकांवर बसवून कमिटीचे लोक आपल्यापाशीं पुष्कळ पैसे जमवून ठेवीत आहेत. व कोठून तरी गुप्त रीतीनें बंदुका पैदा करून ते आपल्या शेतकऱ्यांना त्या विकत घ्यावयाला लावीत आहेत. स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं, कोणत्याही उपायानें का होईना, परंतु पैसा मिळवावयाचा, अशा धोरणावर मॅसिडोनियन कमिटी आपलें काम चालवीत आहे. ह्या ख्रिस्ती लोकांवर मुसलमान लोकांचा जसा अम्मल आहे, तसाच पूर्वीं हिंदुस्थानांतील हिंदूंवर मुसलमानांचा जुलूम चालला होता. त्या जुलमा-पासून आपला देश स्वतंत्र करण्याकरितां शिवाजीनें जे प्रयत्न केले त्यांची या मॅसिडोनियन कमिटीच्या प्रयत्नांशीं तुलना केली, तर शेतकरी लोकांच्या टोळ्या करून त्यांच्याकडून मुसलमान सरकारला त्रास द्यावयाचा, इत्यादि गोष्टींमध्यें

असलेलें साम्य कोणाच्याही सहज लक्षांत येईल. परंतु आपला इष्ट हेतु घडवून आणण्यासाठीं मॅसिडोनियन लोकांइतके अत्याचार शिवाजीच्या हातून कधींही झालेले नाहींत. एखादा श्रीमंत व्यापारी पाहून त्याला पकडून न्यावयाचें, आणि त्यानें आपल्या सुटकेसाठीं पुष्कळ रक्कम देण्याचें कबूल केल्यावांचून त्याला सोडावयाचें नाहीं, अशा प्रकारचीं कृत्यें मॅसिडोनियन कमिटीमार्फत प्रत्यहीं चाललीं आहेत. अशा प्रकारचें शिवाजीचें वर्तन नव्हतें. तरी पण शिवाजी-संबंधानें लिहितांना किंवा बोलतांना ख्रिस्ती लोक त्याला लुटारूंच्या आणि दरवडेखोरांच्या कोटीमध्यें घालण्याला कधींही कमी करीत नाहींत. पण ख्रिस्ती लोकांचीं हीं वर दिलेलीं कृत्यें पाहिलीं म्हणजे त्यांच्या मानानें शिवाजी हा साधुपुरुष होता असें म्हणावें लागतें. या ख्रिस्ती लोकांचीं स्वतःचीं कर्में अशीं असून हे दुसऱ्यांना दरवडेखोर म्हणतात. अशा लोकांना आपण जीभ दिल्या-बद्दल परमेश्वरालादेखील पश्चात्ताप होत असेल !

मॅसिडोनियन कमिटींतील ख्रिस्ती लोकांची अशा रीतीनें तयारी झाल्यानंतर पुढें त्यांचें जें धोरण आहे, तेंही वरच्यासारखेंच अन्यायमूलक आहे. सुलताना-च्या अमलाखालील मुसलमानी धर्माच्या प्रजेला त्रास द्यावयाचा, त्यांच्या देवळांत निषिद्ध पदार्थ टाकून त्यांना चिडवावयाचें, अशा रीतीनें त्यांचें डोकें खवळून जाऊन रागाच्या आवेशांत त्यांनीं कोठें तरी ख्रिस्ती लोकांची कत्तल केली म्हणजे ‘ हे पहा मुसलमान लोक आमची क्रूरपणें कत्तल करीत आहेत ! तुमच्या धर्मबांधवांची तुम्हांला कांहीं करुणा येऊ द्या’, असें म्हणून युरोपांतील इतर ख्रिस्ती राष्ट्रांचीं मनें क्षुब्ध करावयाचीं आणि अशा उपायांनीं त्या राष्ट्रांना मध्यें पडावयाला लावून त्यांच्या साह्यानें आपली स्वतंत्रता साधून घ्यावयाची, असें मॅसिडोनियन कमिटीचें एकंदर धोरण आहे. युरोपांतील ख्रिस्ती लोकांना आढेवेढे घेऊन अन्याय करण्याची फार संवय आहे. ते सरळ अन्याय कधींही करावयाचे नाहींत. जर या भांडणांत पडून त्यांना आपल्या धर्मबांधवांना मदत करावयाची आहे, तर ती उघडपणें करावयाला काय हरकत आहे ? पहिल्यानें आगळीक करून त्याचा सूड घेण्याकरितां मुसलमानांनीं कत्तल केली, म्हणजे मग न्यायाच्या आणि निःपक्षपाताच्या पताका घेऊन भांडण भांडण्याकरितां हे जे पुढें येणार त्यांच्यांत न्याय कसला राहणार ? हा ढळढळीत अन्यायच होय. युरोपियन राष्ट्रांनीं याच्यावर न्यायाचा शिक्का मारला तरी देवाच्या घरीं हा अन्याय म्हणूनच समजला जाणार.

शिवाय आपल्या धर्मबांधवांना ते आणि आपण एका धर्माचे आहों म्हणून परधर्मीय लोकांच्या अमलांतून सोडविण्याचें जें तत्त्व या ठिकाणीं युरोपियन लोक उपयोगांत आणूं पाहत आहेत, तें फार भयंकर तत्त्व आहे. त्याच्या भयंकरपणाची कल्पना युरोपियन लोकांना आज कदाचित् नसेल. पण हें त्यांचेंच तत्त्व पुढेमागें त्यांना जाचल्यावांचून राहणार नाहीं. जर ख्रिस्ती राष्ट्रें आपल्या ख्रिस्ती बांधवांना दुसऱ्यांच्या अमलाखालून सोडविण्यासाठीं एकत्र होतात, तर इतर धर्मांच्या राष्ट्रांनाही आपल्या धर्मबांधवांना दुसऱ्याच्या अमलांतून सोडविण्याकरितां एकत्र होण्याची कल्पना सुचल्यावांचून कधींही राहावयाची नाहीं. कित्येक युरोपियन लोकांचें यावर असें एक म्हणणें आहे कीं, सर्व्हिया, बोस्निया, मॉन्टिनिग्रो, बल्गेरिया वगैरे मुलूख हे मूळचे तुर्की लोकांचे नसून त्यांत ते बळजबरीनें घुसले आहेत, म्हणून ख्रिस्ती लोकांनीं त्यांना तेथून हांकलून लावण्याला कांहीं एक हरकत नाहीं. परंतु हा युक्तिवादही ख्रिस्ती लोकांच्या गळ्यांत येण्यासारखा आहे. कारण ख्रिस्ती लोक कोठें घुसलेले नाहींत ? हल्लीं जेथें जेथें यांचीं राज्यें दिसतात, तेथें तेथें ती त्यांच्या बापजाद्यांनींच स्थापन केलेली असतील ! तुर्की लोक बल्गेरियामध्यें नवीन घुसले म्हणून जर त्यांना तेथून हांकलून द्यावयाचे असतील, तर ख्रिस्ती लोकांना जगाच्या किती तरी भागांतून हांकलून द्यावें लागणार आहे. या सगळ्या गोष्टींचा विचार करून व त्यांचा आपल्या स्वतःवर परिणाम होऊं लागला तर आपली कशी स्थिति होईल हें लक्षांत आणून, मग असलीं तत्त्वें उपयोगांत आणण्याला ख्रिस्ती लोकांनीं धजावें हें बरें. ख्रिस्ती राष्ट्रें एकमेकांच्या संरक्षणासाठीं कशीं धांवतात हें पाहून आपणही एकमेकांसाठीं तसें धांवलें पाहिजे, ही कल्पना इतर धर्मांच्या लोकांच्या डोक्यांत केव्हां ना केव्हांतरी आल्यावांचून राहावयाची नाहीं. आणि असें झालें तर मग आपलें कसें होईल, याचा विचार करून ख्रिस्ती राष्ट्रांनीं आपल्या धर्मबांधवांच्या संरक्षणाला जावें हें बरें. कारण ‘ Do unto others as you wish to be done to yourself ’ ही ख्रिस्ती लोकांचीच म्हण आहे !

---

## आपण काय करावें ? : : ३

आतांपर्यंतचा हिंदुस्थानचा एकंदर इतिहास पाहिला तर हिंदुस्थानावर आजपर्यंत जीं परचक्रें आलीं, तीं फक्त दोनच मार्गांनीं आलीं, असें दिसून येतें. एक हिंदुकुश पर्वताच्या खिंडीमधून आणि दुसरें हिंदी महासागराच्या लाटांवरून. ह्यांपैकीं पहिली वाट अहमदशहा अबदालीच्या स्वारीनंतर बहुतेक बुजाल्यासारखी झालेली होती. अलीकडे हिंदुस्थानावर जे परचक्राचे भोंवरे फिरले ते बहुतेक जलमार्गानेंच आलेले होते. परंतु हल्लीं हिंदुकुश पर्वतांतील बुजालेली वाट फिरून सुरू होते कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. रशियाचा हिंदुस्थानावर पुष्कळ दिवसांपासून डोळा आहे व त्यासाठीं रशियाचे अनेक प्रयत्नही चालू आहेत. हल्लींच्या दिवसांत नाटकवाल्यांनीं गावयाचें, म्हणजे त्यांना जशी बाजाची पेटी जवळ पाहिजे, त्याचप्रमाणें युरोपियन शिपायांनीं लढावयाचें म्हणजे त्यांना आगगाडी आणि तारायंत्र जवळ पाहिजे. सोमलीलँडमध्यें लढाई सुरू झाली तेव्हां तेथें आगगाडी कोठची ? त्यामुळें इंग्रजी शिपायांचे हातपाय मोडले, व कांहीं दिवसपर्यंत लढाई बंद ठेवून आधीं आगगाडी बांधावी आणि मग लढाई करावी, अशाही सूचना होऊं लागल्या होत्या. ह्यावरून युरोपियन सोजिरांचे पाय आगगाडीवांचून किती लंगडे आहेत, हें कोणाच्याही लक्षांत येईल. त्याप्रमाणें रशियानें हिंदुस्थानच्या जितकी जवळ आगगाडी आणून ठेवतां येईल, तितकी ठेविली आहे. व्यापाराच्या मिषानें रशियानें बहुतेक इराण देश व्यापून टाकिला आहे. आणि तितक्या सगळ्या गोष्टी झाल्यानंतर मागचे सर्व तह गुंडाळून ठेवून आपला स्वतंत्र वकील काबूलच्या दरबारामध्यें ठेवण्याची चळवळ रशियानें सुरू केली आहे. याप्रमाणें रशियाची तयारी हिंदुस्थानावर स्वारी करण्याकरितां इतक्या मजलेपर्यंत येऊन पोंचली आहे.

आतां येऊन जाऊन रशियाची महत्त्वाकांक्षा आणि हिंदुस्थानचें राज्य ह्यांच्यामध्यें पातळ पडदा म्हटला म्हणजे काय तो अफगाणिस्थानचाच होय. रशियाच्या अस्वलाची टक्कर आली तर ती एकदम आपल्या कपाळावर आपटून टेंगूळ येऊं नये, म्हणून इंग्रजांनीं मुद्दाम अफगाणिस्थान आपल्या कपाळापुढें ठेविलें आहे. या शिरस्त्राणाबद्दल इंग्रजांना बराच खर्च सोसावा लागत आहे. हिंदुस्थानच्या तिजोरींतून इंग्लंड अमिराला पुष्कळ खंडणी देतें. परंतु तिचा कांहीं उपयोग होतो किंवा नाहीं, ह्याच्याबद्दल शंकाच आहे. इंग्रजांच्या खंडणीचे पैसे घेऊन त्याचा विनियोग हत्यारें घेण्याकडे काबूलचा अमीर करीत आहे. आतां या हत्यारांचा उपयोग अमीर कोणाकडे करितो, हें मात्र पाहावयाचें उरलें आहे. अमीर रशियाकडचा आहे, असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं. परंतु तो इंग्लिशांकडचा आहे, असें म्हणण्यालाही फारसा भक्कम पुरावा नाहीं. इंग्रजांचे पैसे घेण्यापुरता तूर्त तो इंग्रजांकडचा आहे एवढें मात्र खरें. हिंदुस्थानांत नुकताच दिल्ली दरबार झाला व त्याला सर्व ठिकाणचे राजे आले होते; परंतु इंग्रजांकडून खंडणी घेणारा आणि इंग्रजांचा दोस्त म्हणविणारा काबूलचा अमीर आला नाहीं. त्यानंतर अमीर आणि कर्झनसाहेबांची मुलाखत होणार म्हणून एक बातमी उठली होती, परंतु तोही योग जुळून आल्याचें दिसून येत नाहीं. या सगळ्यांवरून अमिराचें इंग्रजांशीं फारसें सूत असेल असें दिसत नाहीं. परंतु अमीर आणि इंग्लिश यांच्यामध्यें खरा मित्रभाव नाहीं, असें मानण्याला नुकतीच आणखीही एक गोष्ट कारणीभूत झालेली आहे.

हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान यांच्या दरम्यानच्या सरहद्दीवर लष्करी अधिकारी कर्नल येट यांना कांहीं अफगाण शिपायांनीं कैद करून अटकेंत ठेविलें आहे. ही गोष्ट झाल्याला बरेच दिवस झाले, तरी अद्यापि कर्नल येट यांच्या सुटकेचें कांहींएक चिन्ह दिसत नाहीं. अफगाणिस्थानचा वकील कर्नल इस्माएल हा येऊन, फॉरिन ऑफिस आणि कर्नल इस्माएल यांच्या दरम्यान कर्नल येट यांना कां अटकेंत ठेविलें आहे, त्याच्याबद्दलचा खुलासा व्हावयाचा आहे. कर्नल येट यांच्या अटकेसंबंधाचें इंडिया सरकारकडील पत्र कंदाहारच्या गव्हर्नरला पोंचलें आहे, एवढीच काय ती तूर्त खबर आहे. परंतु या प्रकरणांत अमिराचा सल्ला घेतल्यावांचून कोणतीही गोष्ट निकालाला लागावयाची नाहीं हें उघड दिसत आहे. व काबूलकडील अशी एक बातमी आहे कीं, अमीर

तर शिकारीसाठीं कोहिस्थानकडे निघून गेला असून तिकडे त्याला सुमारें पंधरा दिवस लागतील; म्हणजे तेथपर्यंत येटसाहेबांना अटकेंत रखडत बसलें पाहिजे, हें उघडच आहे. इतकी सगळी मानखंडना इंग्रज सरकार मुकाट्यानें सहन करीत आहेत, यावरून कर्नल येट यांच्या हातून कांहीं तरी अतिक्रमण झालें असावें असा तर्क करण्याला पुष्कळ जागा सांपडते. एरवीं आपल्या ऑफिसरला कैदेंत टाकल्याबद्दल इंग्लिशांनीं आकाशपाताळ एक करून सोडलें असतें. परंतु कर्नल येट हे अपराधी असोत किंवा नसोत ते हल्लीं ज्या स्थितींत आहेत त्यावरून अमिराचा आणि इंग्लिशांचा आंतून फारसा स्नेहभाव असेल असें बिलकुल वाटत नाहीं.

वायव्येकडील सरहद्दीवर प्रथमतः तोंडाशींच असणारा अमीर याची मनोवृत्ति अशा प्रकारची; आणि त्याचेमागें छपून असलेला जो रशिया त्याची तर हिंदुस्थानवर स्वारी करण्याबद्दलची जय्यत तयारी झालेली! इंग्लिश आणि रशियन यांची अफगाणिस्थानांत किंवा हिंदुस्थानांत लढाई जुंपल्याबरोबर इंग्लिशांना विलायतेहून हिंदुस्थानांत नवीन सैन्य आणतां येऊ नये, म्हणून रशियानें फ्रान्सला तहानें अनुकूल करून ठेवलें आहे. त्यामुळें विलायतेचें सैन्य हिंदुस्थानांत येऊं लागलें तर त्याला फरेंच गलबतें अडथळा केल्यावांचून कधींही सोडावयाचीं नाहींत. हिंदुस्थानांत आहे तेवढें सैन्य रशियाशीं तोंड देण्याला पुरेसें व्हावयाचें नाहीं; आणि विलायतेंतून नवीन सैन्य येण्याला जागा उरावयाची नाहीं. अशा स्थितींत इंग्लिशांच्या पक्षाची फारच तारांबळ उडून जाण्याचा संभव आहे. विलायतेहून नवीन सैन्याची कुमक आली नाहीं, आणि फक्त लढाईचा सर्व भार हिंदुस्थानांत असलेल्या सैन्यावरच पडला तर, त्याच्या हातून कितपत निभाव लागेल याची शंकाच आहे. अफगाणिस्थानांतील काळ्या लोकांशीं लढावयाचें असलें तर हिंदुस्थानांतील काळें सैन्य उपयोगीं पडेल हें खरें. परंतु रशियन आणि इंग्लिश यांचीच खुद्द लढाई जुंपली तर व ट्रान्सवालच्याप्रमाणें हिंदुस्थानांतदेखील युरोपियनांच्याविरुद्ध युरोपियनांनींच लढावें, इतरांनीं लढतां कामा नये, हें दिव्य तत्त्व उत्पन्न झालें तर हिंदुस्थानांत नेटिव सैन्य पुष्कळ असूनही तें निरुपयोगी होणार; व त्याला जागच्या जागींच बसावयाला लागणार. फार झालें तर हिंदुस्थानांतील किल्ल्यांची वगैरे रखवाली करण्याचें काम त्यांच्याकडे सोपविण्यांत येईल; व लढाईचें जें मुख्य काम तें करण्याची पाळी फक्त हिंदुस्थानांत

असलेल्या साठ सत्तर हजार सोजिरांवरच येऊन पडेल. पण रशिया जो सैन्याचा समुद्र आणून हिंदुस्थानावर ओतील, त्याच्यापुढें या मूठभर वाळूच्या कणांचें काय चालणार ? हिंदुस्थानांतील नेटिव सैन्य वर लिहिल्या कारणानें निरुपयोगी झालें नाहीं तर त्यासंबंधानें दुसरी एक भीति आहे. रशियासारखा बलाढ्य रिपु हिंदुस्थान जिंकावयाला आला तर तो केवळ लढाईनेंच हिंदुस्थान जिंकू पाहील असें नाहीं. जो देश जिंकावयाचा त्या देशांत चोंहोकडे सडकून फंदफितुर उत्पन्न करावयाचें, ही तर रशियाची मोठी खुबी आहे. या मार्गाचें अवलंबन करण्याचें रशियानें मनांत आणिलें तर, त्याला हिंदुस्थानांतील नेटिव सैन्य आणि नेटिव राजे यांच्यासारखी पोकळ जागा दुसऱ्या कोठेंही मिळावयाची नाहीं. रशियामध्येंही कोणी तरी इतिहासज्ञ असतीलच. जो रशिया हिंदुस्थानावर स्वारी करण्याला येणार त्यानें हिंदुस्थानच्या पूर्वेतिहासाचें परीक्षण केलेलें असलेंच पाहिजे. अठराशें सत्तावन सालचें बंड हिंदुस्थानांत कोणी केलें, तें कां झालें, आणि तें झालें त्या वेळीं इंग्रजी राज्याचा सुरक्षितपणा कितपत संभवनीय दिसत होता, वगैरे गोष्टींबद्दलची माहिती रशियाला मिळून त्यानें जर तिचा उपयोग केला, तर नेटिव पलटणींमधून १८५७ सालापेक्षां हल्लीं असंतोषाचीं कारणें कमी आहेत असें नाहीं. विलायतेंतून नवीन सैन्य नाहीं, आणि हिंदुस्थानांतील नेटिव सैन्य फितुर झालेलें अशी जर भयंकर स्थिति झाली तर सुखवस्तूपणें हिंदुस्थानांत नेटिव अस्वलांची शिकार करीत, आणि नेटिव पंखेवाल्यांकडून हलविल्या जाणाऱ्या पंख्यांखालीं बसून उपहार सुखाचा अनुभव घेत कालक्रमण करणाऱ्या गोऱ्या सोजिरांच्या हातून काय व्हावयाचें आहे हें दिसतेंच आहे.

अशी संकटस्थिति प्राप्त झाली तरी, ज्या इंग्लंडचें साम्राज्य इतकें विस्तीर्ण आहे, त्याला यांतून पार पाडण्याला फारशी पंचाईत मुळींच येणार नाहीं, असें कोणाला वाटेल; व पंचाईत न पडावी हेंच आपलें सर्वांचे ईश्वरापाशीं मागणें आहे. परंतु भावी स्थितीचें पारडें कसें फिरेल याचा बरोबर अंदाज करणें हें आपलें प्रस्तुतचें काम आहे, व त्या दृष्टीनें पाहतां ब्रिटिश साम्राज्याचा विस्तीर्ण पसारा अशा वेळीं फारसा उपयोगीं पडेल असें चिन्ह दिसत नाहीं. विस्तीर्ण साम्राज्य म्हणजे राखेखालच्या निखाऱ्याप्रमाणें झाकलेल्या शत्रूंचा अफाट विस्तार होय. हे झाकलेले निखारे शांततेच्या वेळीं शांत असलेले दिसतात. पण एकदां भयंकर आणि मोठमोठ्या भयाचें वादळ सुरू झालें म्हणजे त्यांच्यावर

असलेली राख उडून नाहींशी होते; आणि ते इंगळासारखे लाल होऊन त्यांचें खरें स्वरूप दृग्गोचर होऊं लागतें. आयर्लंड, ट्रान्सवाल, ऑरेंज फ्रीस्टेट, केप कॉलनी, वगैरे ब्रिटिश साम्राज्यांतील ठिकाणें हीं राखेनें झाकलेल्या निखाऱ्यांप्रमाणें आहेत. इंग्लंडचें सर्व सामर्थ्य हिंदुस्थानच्या सरहद्दीवर गुंतलेलें आहे, अशी संधि सांपडली तर आयरिश लोक, बोअर लोक आणि आफ्रिकँडर बॉन्डमधील लोक हे इतके कृतज्ञ नाहींत कीं, ते इंग्लंडच्या फायद्यासाठीं आपल्या स्वातंत्र्याची सुसंधि फुकट दवडतील. इंग्लंड रशियाशीं झगडण्यांत गुंतलें आहे, अशी वेळ आली असतां हातीं पायीं पडून आयरिश लोक जो होमरूलचा कायदा मागत आहेत, त्यांतील सार जें स्वातंत्र्य तेंच प्रत्यक्ष मिळवून घेण्याची आलेली संधि आयरिश लोक फुकट कां दवडतील? आणि तीन वर्षें लढाई करून प्रे० क्रूगरच्या देशभक्तीला जी वश झाली नाहीं, जनरल बोथाच्या पराक्रमानें जी जिंकली गेली नाहीं, आणि जनरल डिवेटच्या गनिमी काव्याला जी सांपडली नाहीं, ती स्वतंत्रता आपण होऊनच बोअर लोक कोठें आहेत म्हणून शोधीत आली, तर तिचा अंगीकार बोअर लोक, चेंबरलेनसाहेबांनीं एकांत एक दुवे अडकवून घट्ट केलेल्या गुलामगिरीच्या सांखळीची मुरवत धरून, करणार नाहींत असें कधीं तरी होईल काय? ऑस्ट्रेलिया आणि कानडा यांना ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवापेक्षां स्वतःच्या वैभवाची जास्त आकांक्षा असली तर तें मनुष्यस्वभावाच्या फारसें विरुद्ध आहे असें नाहीं. विस्तीर्ण ब्रिटिश साम्राज्य असें एकदम म्हटलें म्हणजे कोणाच्याही मनांत सहज मोठा बाऊ उत्पन्न होतो. पण वर दर्शित केलेल्या दृष्टीनें पाहिलें असतां ब्रिटिश साम्राज्यांत काय आहे? प्रत्येक अवयव नाखुष आणि बळजबरीनें साम्राज्यांत कोंबलेला, व त्यांतून मी केव्हां सुटेन अशी वाट पाहत बसलेला! अशा घटकावयवांनीं बनविलेलें साम्राज्य हें लहान मुली खेळण्याकरितां गुंजवला म्हणून एक वस्तु तयार करीत असतात, त्याच्यासारखें होय. थंडाईच्या दिवसांत हा गुंजवला दगडासारखा टणक बनून सर्व घटकावय मिळून एक अनिर्भेद्य गोळा झालेला दिसतो. पण त्याला थोडी आंच लागली म्हणजे त्यांतील मेण वितळून जातें, आणि सर्व गुंजा वेगवेगळ्या व स्वतंत्र होतात. तशा प्रकारची या साम्राज्याची स्थिति आहे. या साम्राज्यावर दुर्धर प्रसंग आला असतां, आयर्लंड स्वतंत्र होण्याच्या आणि आफ्रिकॅन्डर बॉन्डचे लोक दक्षिण आफ्रिकेंतील स्वतंत्र

संस्थानें स्थापन करण्याच्या कामांत गुंतून जातील, आणि कानडा व ऑस्ट्रेलिया आपापलें वैभव आणि व्यापार वृद्धिंगत करण्यांत गर्क होतील व इंग्लंडच्या मदतीसाठीं थांबण्याला कोणीही जाग्यावर शिल्लक उरणार नाहीं.

इंग्लडचें सैन्य हिंदुस्थानांत येण्याची भूमध्य समुद्रांतील वाट फरान्सनें रोखून ठेविलेली, हिंदुस्थानांतील सोजीर हिंदुस्थानांतील पैशावर चाललेल्या चैनीनें सुखाला सवकलेले आणि लढाईला विसरलेले, हिंदुस्थानांतील नेटिव सैन्य युरोपियनांविरुद्ध लढण्यापासून परावृत्त केलेलें किंवा स्वाभाविक असंतोष आणि रशियाचे फितुरीनें अतोनात विथरलेलें; साम्राज्यांतील घटकावयव स्वतःच्या पोळीवर निखारे ओढण्यामध्यें गुंग झालेले, अशी स्थिति प्राप्त झाली असतां आपण काय करावें, हा प्रश्न हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याच्या मनांत उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. वर वर्णन केल्याप्रमाणें स्थिति होणें अशक्य आहे असें नाहीं. आणि कर्मधर्मसंयोगानें तसें झालेंच, तर इंग्लंडला स्वतःचेंच संरक्षण करतां करतां मारामार पडेल. अशा वेळीं एकटें इंग्लंड काय काय करणार? लहानशी ट्रान्सवालची लढाई झाली तोंच इंग्लंडची कोण तारांबळ उडून गेली! मग हिंदुस्थानसारख्या सर्व साम्राज्याच्या आधारस्तंभावरच पाळी येऊन बेतली, तर इंग्लंडची काय अस्वस्थ होईल याची कल्पनाही करणें कठीण आहे. इंग्लंडांत हिंदुस्थानपासून धान्याचा आणि पैशाचा पुष्कळ पुरवठा होत असतो, तो रशियानें स्वारी केल्यापासून सहजच बंद पडणार. त्या योगानें विलायतेंतील कित्येक कुटुंबांत हिंदुस्थानांतील दुष्काळ कसा काय असतो याचा अनुभव येऊं लागेल; कित्येकांचीं पेन्शनें मिळेनाशीं होतील; व्यापाऱ्यांचीं भांडवलें नफे परत आणीत नाहींशीं होतील; आणि हिंदुस्थानांत सांपडलेल्या प्रत्येक गोऱ्या इसमासाठीं विलायतेंतील दहा माणसें काळजी करीत बसतील. हुंडणावळीचे भाव वाढतील, आणि नोटांची किंमत कमी होईल, पेढयांची दिवाळीं निघतील, आणि सरकारी खजिने उन्हाळ्यांतील विहिरीप्रमाणें कोरडे पडतील. अशी अनर्थपरंपरा इंग्लडवर येऊन कोसळली तर त्या स्थितींत आपण काय करावें? जी स्थिति येणार नाहीं तिच्याबद्दल विचार कशाला पाहिजे हें एकाअर्थी खरें आहे, पण येथील टाइम्सनेंच पुढील उद्गार काढले आहेतः—

"No man knows on the Indian frontier what a day may bring forth, but though there is every cause for

hoping that no untoward event will arise this year, the situation in a Afganistan suggests that within the next two or three years India may be involved in external difficulties which Loid Cu zon has been spared so far.” हिंदुस्थानच्हा सरहद्दीवर केव्हां काय होईल याचा कांहीं नेम नाहीं. आतां यंदाच जरी अशी कांहीं गोष्ट झाली नाहीं तरी पण अफगाणिस्थानांतील स्थितीवरून तेथें पुढल्या दोन तीन वर्षांत कांहीं तरी झाल्यावांचून राहत नाहीं हें खास आहे, असा टाइम्सकारांचा तर्क आहे. यावरून वर काढलेलें चित्र हें केवळ कल्पनासृष्टींतील नसून त्याला वरील टाइम्सचेच उद्गार कारणीभूत झालेले आहेत. आणि त्यापासूनच असा विचार मनांत येतो कीं, दुर्दैवानें इंग्लंडवर आणि हिंदुस्थानावर असा प्रसंग आलाच तर आपण काय करावें? अशा प्रसंगीं आपलें कर्तव्य काय? हिंदुकुश पर्वताच्या खडकांवर सिंधु नदीच्या वाळवंटावर सिंह आणि अस्वल यांची झुंज चालली असतां आपण काय करावें? ‘आपण’ या शब्दांत हिंदुस्थानांतील सर्व लोकांचा समावेश होतो. हिंदुस्थानांतील महाराजे, राजे, नबाब, सरदार, अमीर, उमराव, जहागिरदार, इनामदार, शिपाई, व्यापारी, वृद्ध, तरुण, स्त्रिया, पुरुष, मुलें, हिंदु, मुसलमान, नेटिव ख्रिस्चन, पारशी या सगळ्यांनीं ह्या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. असा प्रसंग आला असतां आपल्या मनांत अनेक तरंग उभे राहतील, त्यांपैकीं आपण कोणत्या तरंगाचें ऐकलें पाहिजे? त्या वेळची हिंदुस्थानांतील अंतर्गत व्यवस्था पार बदलून जाईल. ठिकठिकाणीं असलेलें सर्व सैन्य लढाईच्या तोंडीं दिलें जाईल व कांहीं राजांचींही सैन्यें वायव्य दिशेकडे रवाना केलीं जातील. नवीन लोक जे हातीं लागतील ते लष्करी खात्यांत चाकरीस ठेविले जातील. लष्करी माणसांच्या कमतरतेमुळें पोलिसांकडे लष्करी कामें सोंपविण्यांत येतील. व्हालंटियर लोकांचीं पलटणें रणभूमीवर उभीं केलीं जातील. रखवालीच्या कामांत विनवाकवगार अशा लोकांच्या हातांमध्यें तरवारी आणि बंदुका देऊन त्यांजकडे ओसाड किल्ल्यांचें आणि कोरड्या खजिन्यांचें संरक्षण करण्याचें काम येईल. हत्तेबंद्या, देवाच्या कोर्टाचीं कामें आणि शेतकऱ्यांच्या सोडवणुकीसाठीं बिलें पास करणाऱ्या कायदे कौन्सिलच्या बैठकी या सर्व बंद पडतील. बैल, घोडीं, उंट, लढाईसाठीं

पकडून नेण्यांत येतील. नांगर ओढणारे बैल आणि हांकणारे बैल यांच्या अभावामुळें शेतकीच्या उत्पन्नाची नासाडी होईल. त्यामुळें महर्घता उत्पन्न होईल व पैसा आणि अन्न हीं दोन्हीही दुर्मिळ होतील. मंदबुद्धीचे आणि कोत्या दृष्टीचे लोक ही दरवडे घालण्याला उत्तम सोय आहे असें समजून एकमेकांचीं घरें फोडूं लागतील. सर्व व्यापारधंदे बंद पडतील आणि फक्त मनुष्याच्या प्राणाच्या व्यापाराला तेजी येईल. अशीं आपल्या देशावर अरिष्टें आलीं (परमेश्वर तीं कधींही न आणो) तर आपण काय करावें, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. जेव्हां ज्याला फुरसत सांपडेल तेव्हां त्यानें या प्रश्नाचा आपल्याशीं आणि आपल्या मित्रमंडळीशीं ऊहापोह करावा इतक्या महत्त्वाचा हा प्रश्न आहे. असा प्रसंग दुसऱ्या एखाद्या देशावर आला असतां त्या देशांतील लोकांनीं काय केलेलें आहे, याचाही जर इतिहासांत कोठें दाखला असेल, तर तो प्रत्येकानें काढून पाहणें जरूरीचें आहे. अशा प्रसंगीं आपलीं मनें अगदीं घाबरलेलीं असतील व अनेक बंधनें आपल्याला अनेक दिशांनीं ओढीत राहतील. त्यांपैकीं आपण कोणत्या दिशेकडे जावें, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. आपण काय करावें, हा एकच प्रश्न असला तरी याला प्रत्येकजण निरनिराळें उत्तर देईल. आणि असें होणें स्वाभाविक आहे परंतु त्या निरनिराळ्या उत्तरांमध्येंही एकसूत्रता असावी म्हणून आम्ही येथें एवढें मात्र सुचवून ठेवतों, कीं आपण कांहींही केलें तरी तें स्वराज्यनिष्ठेच्या पायावर केलें पाहिजे. एवढी गोष्ट लक्षांत ठेवून सदर प्रश्नाचा प्रत्येकानें विचार केला पाहिजे. एवढें सुचवून व वर दिल्याप्रमाणें स्थिति प्राप्त झाली असतां आपण काय करावें, हा प्रश्न फिरून एकदां पुढें मांडून आम्ही वाचकांची रजा घेतों.

---

# आपलें सुख काय झालें ? : : ४

अशी एक वेळ होती कीं, त्या वेळीं हिंदुस्थान सुखी होतें. त्या वेळीं हिंदुस्थानांत आगगाड्या नव्हत्या, किंवा तारायंत्रें नव्हतीं. त्या वेळीं हिंदुस्थानच्या पर्वतांमधून बोगदे नव्हते किंवा नद्यांवरून लोखंडी पूल नव्हते. त्या वेळीं हिंदुस्थानांतील लोकांना इंग्रजी बोलतां येत नव्हतें, किंवा ते सभांतून भाषणें आणि अर्ज करीत नव्हते. पण इतक्या सगळ्या उणीवा असूनही हिंदुस्थानांतील लोक त्या वेळीं सुखी होते. तें सुख आतां कोठें गेलें ? परकीय लोक आपल्याला येऊन सांगत आहेत, कीं आम्हीं तुमच्या सुखाचीं साधनें अतिशय विपुल करून ठेविलीं आहेत. आतां तुम्ही वाटेल तितकें सुख भोगा. पण त्यांच्या सांगण्याचा प्रत्यय आपल्याला कांहींच येत नाहीं, हें कसें ? जर सुखाचीं साधनें वाढलीं, तर सुखही वाढलेंच पाहिजे, असें तर्कशास्त्रही सांगतें. म्हणून त्याप्रमाणें सुखाचीं साधनें वाढलेलीं पाहून त्या साधनांनीं प्राप्त होणारें सुख शोधण्याकरितां जावें तों तें सुख आपल्याला कोठेंच सांपडत नाहीं हें कसें ? ही भूतचेष्टा कोणी निर्माण केली आहे, कीं जिच्या योगानें आम्हांला सुखाचीं साधनें मात्र मिळावीं परंतु सुख मिळूं नये ? हीं सुखाचीं अनेक साधनें आमच्या हातांत देऊन आमचें सुख कोणी हिरावून नेलें ? त्यांनीं त्यापेक्षां आमचें जीवित हरण करून नेलें असतें तरी हरकत नव्हती. पण सुख हरण करून नेल्यानंतर या जगांतील जीवितामध्यें काय हंशील आहे ? जो मनुष्याचें जीवित हरण करितो तो फक्त खुनाचा एकच अपराध करतो, पण जो त्याच्या सुखाचें हरण करतो तो त्याचा खून तर करतोच, पण तसें करूनही त्याला दुःख भोगण्याकरितां जिवंत ठेवून यावज्जन्म त्याला यातना भोगावयाला लावितो. अशा प्रकारच्या यातना आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांना सोसाव्या लागत आहेत. आपल्या सभोंवतीं जिकडे पाहावें तिकडे सुखाचीं साधनें भरलीं आहेत, तरी पण आपल्या

स्वतःकडे पाहावें तों आपल्याला सुख नाहीं, अशी विलक्षण स्थिति झालेली आहे. मानससरोवरामध्यें आकंठ बुडालेले असून आपण तृषाक्रांत झालेले आहों. कल्पवृक्षाच्या झाडाखालीं बसलेले असतांही आपण प्रत्यहीं हताश होत आहों. अन्नपूर्णेच्या सन्निध असून आपण उपाशी मरत आहों. सूर्याची आपल्यावर कृपादृष्टि असतांनाही आपण थंडीनें कुडकुडत आहों. अश्विनीकुमार आपल्याला अनकूल असूनही आपण व्याधिग्रस्त झालों आहों. आणि अमृताच्या डोहांत पोहत असतांनाही आपण मरणोन्मुख झालों आहों. अशी आपल्या राष्ट्राची स्थिति कोणी केली ? तें आपलें सुख काय झालें ? तें आपलें पूर्वीचें सुख आपल्याला फिरून मिळेल काय ? जर या आगगाड्या आणि तारायंत्रांत सुख नाहीं, तर त्या घेऊन आपल्याला काय करावयाचें आहे ? जर या पाश्चिमात्य सुधारणेंत आणि इंग्रजी प्रगतींत आपल्याला सुख नाहीं तर त्या घेऊन आपल्याला काय करावयाचें आहे ? जर त्या कायदे कौन्सिलांच्या बैठका, तें पार्लमेंटाकडे पाठवावयाचे निरुपयोगी अर्ज, आणि ती रेड्यापासून दूध निघण्याची वायफळ आशा यांपासून आपल्याला कांहीं सुख नाहीं, तर ती घेऊन आपल्याला काय करावयाचें आहे ? याच्यापेक्षां आपली पूर्वीची स्थिति काय वाईट होती ? मद्रासचा अय्या बंगालच्या बाबूपाशीं बोलला नाहीं म्हणून आपलें काय अडत होतें ? त्या वेळीं मुंबईच्या रस्त्यावर विजेच्या दिव्यांचा प्रकाश पडत नव्हता, किंवा कलकत्त्याच्या रस्त्यावरील माती नवीन निघालेल्या मोटारकारच्या चाकांनीं तुडविली जात नव्हतीं म्हणून आपलें काय बिघडलें होतें ? द्वारकेच्या मनुष्याला त्या वेळीं जगन्नाथास चार–आठ दिवसांत जातां येत नव्हतें म्हणून आपल्या सुखांत काय बिघाड पडला होता ? आपण त्या वेळीं इंग्रजी पुस्तकांनीं आपले विचार बदलून घेत नव्हतों, आपल्या बायका इंग्रजी झगे घालीत नव्हत्या, आणि आपलीं मुलें इंग्रजी खाऊच्या वड्या खात नव्हतीं, म्हणून आपलें काय अडलें होतें ! पूर्वीं हिंदुस्थानांतील लक्षावधि लोक दुष्काळानें मरत नव्हते म्हणून त्यांच्या सुखांत काय अंतर पडलें होतें ? दुष्काळानें मरणोन्मुख झालेले लोक बाटून ख्रिस्ती होत नव्हते, म्हणून त्यांच्या धर्मसंचयांत काय न्यूनता उत्पन्न झाली होती ? पूर्वीं वरच्यावर अवर्षणें पडत नसत, आपली आर्यजननी आपल्याला लागेल तितकें धान्य पिकवून देत असे. तें पिकविण्याला लागणाऱ्या गाई व बैल जिवंत असत, आणि तें धान्य पिकल्यानंतर आपल्या तोंडांतून काढून कोणी

परदेशांत नेत नसे, म्हणून आपलें सुख काय कमी झालें होतें ? त्या दिवसांतच आपण जास्त सुखी होतों. (आपल्या पूर्वजांनीं पर्णकुटिकेंत राहून, जाडीभरडीं स्वनिर्मित वल्कलें नेसून वेदवेदांतांदिकांचें अध्ययन करीत असतांना जें सुख अनुभवलें तें सुख इंग्रजी फॅशनच्या बंगल्यांत राहून आणि विलायती कपडे नेसून इंग्रजी बुकें वाचीत असतांना आपल्याला आज मिळत नाहीं. आपल्या त्या पूर्वीच्या लहान लहान स्वराज्यांतून आपल्या पूर्वजांनीं ज्या सुखाचा अनुभव घेतला तें सुख त्यांचे वंशज अतिशय मोठ्या साम्राज्याच्या छत्राखालीं राहत असूनही आज त्यांच्या कपाळीं नाहीं ! ते पूर्वींचे लहान लहान राजे आपसांत भांडत असतील, तंटे करीत असतील, एकमेकांच्या उरावर बसत असतील, जातिभेद कायम राखीत असतील, किंवा लोकांपासून जमिनीचा सारा जास्त घेत असतील, काय वाटेल तें करीत असतील, तरी पण त्यांच्या हाताखालची प्रजा सुखी होती. तें सुख आज आम्हांला नाहीं. शांततेच्या, जातीच्या अभेदाच्या दिवसांत आम्ही राहत असूनही आम्हांस तें पूर्वींचें सुख नाहीं. आमच्या पूर्वजांना दहा कोस चालावयाचें झालें तर एक सबंध दिवस लागत असे. आणि दहा कोसांवर एक चिठ्ठी पाठवावयाची झाली, तर त्याला दोन रुपयांचा जासूद लागत असे. त्यांनीं आपल्या प्रांतापलीकडील एकही गांव पाहिला नसेल किंवा त्यांना बाकीच्या जगांत काय चाललें आहे याची वार्ताही कळली नसेल. तरी पण ते सुखी होते. आणि आम्ही एका तासांत दहा कोसांचा प्रवास करणारे, एक पैशामध्यें काशीपासून रामेश्वरापर्यंत पाहिजे तेथें आपला जासूद धाडणारे, सगळ्या जगाची सफर करून येणारे, आणि जगाच्या प्रत्येक कोनाकोपऱ्यांत काय कमीजास्त झालें याबद्दलची माहिती प्रत्येक सकाळीं वाचणारे त्यांचे वंशज त्यांच्याइतके सुखी नाहीं. असें कां ? सुखाचीं साधनें असून सुख नाहीं असें कां ? ज्यापासून सुखप्राप्ति नाहीं अशीं हीं सुखाचीं साधनें आपल्यापासून नाहींशीं झालीं तरी हरकत नाहीं, पण तें पूर्वींचें सुख आपल्याला मिळेल काय ? स्वराज्यांत, स्वदेशांत आणि स्वधर्मांत ज्या सुखाचा अनुभव आमच्या पूर्वजांनीं घेतला तीं सुखें आम्हांला आतां लाभतील काय ? ज्या ठिकाणीं आपल्या पूर्वजांनीं आनंदाच्या गोण्या लुटून घेतल्या त्या ठिकाणीं आपण जाऊन आनंद शोधूं लागलों, तर तो तेथें आपल्याला दिसत नाहीं. तो त्या ठिकाणीं आमच्या पूर्वजांनीं आमच्याकरितां ठेविलेला आनंद वेचून कोणी नेला ? गंगेच्या कांठीं,

सरस्वतीच्या कांठीं, हिमालयाच्या शिखरावर, विंध्याचलाच्या गुहेंत, नर्मदेच्या पाण्यांत, कावेरीच्या लाटांत, रामेश्वरच्या सेतुबंधांत, गंगोत्रीच्या पहाडांत, प्रतिष्ठान शहरांत, धारा नगरांत, काशीविश्वेश्वराच्या पुरींत, लाहोरांत, अयोध्येंत, पाटलीपुत्रांत, नागपुरांत, पुण्यनगरींत, सातान्यांत, रायगडावर, विजयनगरांत, जिंजीच्या किल्ल्यांत, तंजावरच्या शहरांत आणि तिरुमल नाइकाच्या राज्यांत आपल्या पूर्वजांच्या आनदाचे डोह भरलेले होते. पण ते आतां कोरडे पडले आहेत. तेथें कांहीं उरलें नाहीं. तेथील आनंद कोणीकडे गेला ? तेथील बाकी सर्व दगड, धोंडे, माती वगैरे जेथल्या तेथें आहे. आपला आनंद मात्र तेथून कोणीकडे गेला कोण जाणे ! त्याला कोठें शोधावें आणि तो आपल्याला कोठें मिळेल ? हल्लीं सुखाचीं साधनें नवीन नवीन निर्माण झालीं असल्यानें आपल्या पूर्वजांपेक्षां आपल्याला वास्तविक पाहिलें असतां जास्त सुख व्हावें, पण तसें न होतां उलट तीं साधनें दुःखाला कारणीभूत झालेलीं आहेत. असें कां व्हावें ? जीं सुखाचीं साधनें आहेत म्हणून पाश्चिमात्य लोक आपल्याला सांगतात तीं खरोखर सुखाचीं साधनें आहेत किंवा दुःखाचीं साधनें आहेत असा यावरून संशय येतो. जी सुधारणा म्हणून म्हटली जाते, ती सुधारणाच आहे काय, आणि जी प्रगति म्हणून म्हटली जाते ती प्रगतिच आहे किंवा अधोगति आहे याच्यावद्दल अनेक संशय उत्पन्न होतात. व पाश्चिमात्य सुधारणा ही सुधारणा नव्हे, असा मनाचा ग्रह होऊं लागतो. आणि अशा प्रकारची मनाची व्यग्र स्थिति झाली असतां टॉल्स्टॉय ह्या प्रसिद्ध रशियन तत्त्ववेत्याप्रमाणें जर कोणी गुरु मिळाला तर एकदम सर्व संशयाची निवृत्ति होऊन मनामध्यें प्रकाश पडतो; आणि पाश्चिमात्य सुधारणांचें खरें स्वरूप काय आहे तें कळून येतें.

काउट टॉल्स्टॉय अशी एक कथा सांगतात कीं, येशू ख्रिस्ताचा जन्म ह्या पृथ्वीतलावर होऊन त्यानें सर्व प्राण्यांना उद्धरून नेण्याचा मार्ग लोकांना दाखविल्यानंतर ह्या जगांत जिकडे तिकडे न्याय, सत्य, शांततावगैरे चांगल्या गोष्टींचा अमल सुरू झाला असें पाहून सैतानाची अगदीं निराशा झाली. व पृथ्वीवर आतां आपल्याला कोठेंही अवकाश मिळत नाहीं व आपलें राज्य पृथ्वीवर स्थापन करण्याला आतां सवड नाहीं अशी त्याची खात्री झाली. अशा रीतीनें सैतानाचे हातपाय मोडले जाऊन तो मनांत खिन्न आणि निराश होऊन

स्तब्ध राहिला. अशा स्थितींत शेंकडों वर्षें लोटलीं. आणि त्या अवधींत जगांत सुख नांदत होतें. पण सैतान निरास झाला तरी त्याचे साथीदार निराश झाले नव्हते. त्यांनीं जगावर सैतानाचा अमल बसविण्याचा प्रयत्न चालू ठेविला होता. त्यांत त्यांना यश आलें. म्हणून ती सुवार्ता सैतानाला सांगण्यासाठीं सैतानाचे सर्व साथीदार त्याच्याकडे आले. हे साथीदार म्हणजे सैतानाच्या हाताखालील भुतें होतीं. त्यांनीं येऊन सैतानाला असें सांगितलें कीं, आम्हीं प्रत्येकांनीं कांहीं तरी नवीन युक्ति काढून जगांतील सुखशांतता यांचा उच्छेद करून टाकला आहे, व सैतान महाराज, पृथ्वीवर आपल्या साम्राज्याचा अंमल पूर्णपणें बसविला आहे. हें त्यांचें म्हणणें सैतानाला खरें वाटेना. येशू ख्रिस्तानें पृथ्वीवरील लोकांना चांगलीं चांगलीं तत्त्वें शिकविलीं असून त्या सगळ्यांचा लोप होऊन एकाएकीं इतकें पातक आणि दुःख या भूतांना पृथ्वीवर कसें प्रेरित करितां येईल, अशी सैतानाला शंका उत्पन्न झाली. तेव्हां त्या शंकेच्या निरसनासाठीं प्रत्येक भुतानें दुःखसंचारासाठीं आपण काढलेली युक्ति सैतानाला सांगितली. धंदेशिक्षणाच्या प्रगतीचें भूत म्हणालें, " जितक्या पुष्कळ जिनसा थोड्या वेळांत तुम्ही कराल तितकें चांगलें, हें तत्त्व मीं लोकांच्या डोक्यांत भरवून दिल्यापासून विकत घेणाऱ्यांना तावडतोब निरुपयोगी होणाऱ्या अशा जिनसा तयार करण्यामध्यें लाखों लोक आपलें आयुष्य फुकट दवडूं लागले आहेत." श्रमविभागाचें भूत सैतानापुढें येऊन म्हणालें कीं, " मीं मनुष्यांना निवळ यंत्राप्रमाणें करून ठेविलें आहे." आगगाड्यांचें भूत मोठ्यानें शीळ फुंकून म्हणालें, " मी लोकांना इतकें वेडें करून सोडलें आहे कीं, आपण जेथें आहों तेथेंच आपली स्थिति सुधारण्याचें त्यांच्या डोक्यांत कधींही न येतां आपण एका तासांत पंचवीस मैल प्रवास करूं शकतों याबद्दलच त्यांना भूषण वाटूं लागलें आहे." ह्यानंतर मुद्रणकलेचें भूत पुढें येऊन सैतानाला निवेदन करूं लागलें कीं, " सगळ्या जगांतील मूर्खपणाच्या आणि वेडगळपणाच्या गोष्टी एकत्र करून जितक्या जास्त लोकांना कळतील तितक्या लोकांना कळविण्याची मीं तजवीज केली आहे " इतक्यांत औषधाचें भूत पुढें येऊन म्हणाले कीं, "मीं लोकांच्या मनांत आपल्या शरीराबद्दल इतकी कळकळ उत्पन्न करून ठेवली आहे कीं "त्यांत गर्क होऊन ते आपल्या आत्म्याची कधींच काळजी घेत नाहींत." इतक्यांत सुधारणेचें भूत बाकीच्या भुतांना मागें सारून सैतानापुढें आपली अशी फुशारकी मारूं लागलें कीं, " माझ्याशिवाय

इतर भुतांना कोणी विचारिलें नसतें. मीं सर्व लोकांच्या मनांत भरवून दिलें आहे कीं, धंदेशिक्षणाची प्रगति, श्रमविभागाचें तत्व, आगगाड्यांची सोय, छापखाने, आणि दवाखाने हीं एक प्रकारचीं मनुष्याला भूषणें आहेत. त्याशिवाय मनुष्याचें जिणें व्यर्थ होय. हें तत्त्व जर लोकांच्या डोक्यांत भरवून दिलें नसतें आणि सुधारलेल्या मनुष्याला या गोष्टी अवश्य आहेत असें जर लोकांना भासवून दिलें नसतें, तर ह्या बाकीच्यांना कोण विचारीत होतें?" नंतर शिक्षणाचें भूत सैतानाला सांगतें झालें कीं, "स्वतःचें वर्तन वाईट असूनही दुसऱ्यांना सद्वर्तनाचें सुशिक्षण देण्याची कला मीं जगांत प्रचलित केली आहे." दानधर्माचें भूत म्हणालें कीं, लोकांच्या घरांवर लाखो रुपयांचे दरवडे घालून त्यांतून पांच रुपये धर्म केला म्हणजे तो धर्मात्मा होय, असें मी मानण्याला लोकांना शिकविलें आहे." ह्या सगळ्यांची कामगिरी सैतानानें ऐकून घेतली. पण तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. कारण, जगांत कोणी तरी दरवडेखोर आणि खून करणारे असल्यावांचून ह्या जगांत खरें दुःख कधींही नांदावयाचें नाहीं, अशी सैतानाची खात्री होती; व येशू ख्रिस्ताच्या उपदेशानंतर जगांत कोणी दरवडेखोर आणि खून करणारे नसतील अशी त्याची समजूत होती. तेव्हां सैतान दीर्घ श्वास टाकून म्हणाला, "तुम्ही एवढें सगळें केलें खरें, पण जगांत जर चांगले प्रतिष्ठित चोर, दरवडेखोर आणि खून करणारे नसतील तर जगांत दुःख कसलें नांदणार आहे!" इतक्यांत एक कायद्याचें आणि राज्यव्यवस्थेचें प्रचंड व अक्राळविक्राळ भूत पुढें ओरडत येऊन म्हणालें, "कां, चोर, दरवडेखोर आणि खून करणारे नाहींत का? लागतील तितके आहेत. पूर्वीं लोक एकमेकांच्या चोऱ्या वगैरे करीत होते, परंतु मीं आतां लोकांची अशी समजूत करून दिली आहे कीं, एकमेकांनीं एकमेकांची चोरी करण्यापेक्षां चोरी करण्याचा, दरवडे घालण्याचा, लुटण्याचा आणि खून करण्याचा अधिकार फक्त एकाचकडे दिला तर त्यांत जास्त फायदा आहे. व या गोष्टी त्या एका इसमानें कशा कराव्या, याबद्दल त्याला कायद्याच्या नांवाखालीं नियम ठरवून दिले आहेत. सारांश, मीं दरवड्यांचें आणि खुनांचें स्वरूप बदललें आहे." दरवडे आणि खून हे बंद केले नाहींत असें या भुताचें भाषण ऐकल्यानंतर सैतानाला धीर आला, व असें असेल तर पृथ्वीवर आपलें राज्य चालण्याला कांहीं हरकत पडणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली व तेव्हांपासून पृ[illegible] आहे.

काउंट टॉल्स्टॉय यांनीं निरूपण केलेल्या ह्या सैतानाच्या आख्यानावरून पाश्चिमात्य सुधारणा आणि प्रगति यांचा वास्तविक अर्थ काय आहे आणि त्यापासून आपणाला सुखप्राप्ति कां होत नाहीं, याबद्दलची कल्पना कोणाच्याही मनामध्यें सहज येण्यासारखी आहे.

---

## चळवळ : : ५

'चळवळ' हा शब्द अलीकडे बराच उपयोगांत आलेला आहे. इंग्रजी-मध्यें 'Agitation' हा जो शब्द आहे त्याला प्रतिशब्द म्हणून हा योजण्यांत आलेला आहे. या शब्दानें आपण हल्लीं जीं कल्पना व्यक्त करतों ती इंग्रजी अमलांबरोबर हिंदुस्थानांत आलेली आहे. या चळवळीचे दोन प्रकार मानले जातात; एक कायदेशीर चळवळ ( Constitutional Agitation ) आणि दुसरी गैरकायदेशीर चळवळ ( Unconstitutional Agitation ). या दोन्ही प्रकारच्या चळवळींवर राष्ट्राचें हित किंवा अहित अवलंबून असतें इतके मोठे ज्याचे परिणाम आहेत, ती गोष्ट दाखविण्याकरितां इंग्रजींतील Agitation हा शब्द बराच योग्य आहे. पण त्याचें मराठींत चळवळ या शब्दानें जें भाषांतर करण्यांत आलेलें आहे तें कितपत योग्य आहे याबद्दल शंका येणें स्वाभाविक आहे. हिंदुस्थानसंबंधानेंच बोलावयाचें झालें तर ज्या गोष्टीमुळें हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत सर्व हिंदुस्थान खवळून किंवा हालून जावयाचें, तिला चळवळ हा शब्द लावणें हें भाषेंतील अनभिज्ञपणाचें लक्षण होय. चळ-वळ हा शब्द संस्कृतमधील चलनवलन या जोडीपासून अपभ्रष्ट होऊन मराठी भाषेंत आलेला आहे. आणि संस्कृतमधील 'चल्' किंवा 'वल्' या धातूंचा मूळचा अर्थ पाहिला तर या धातूंपासून ज्या गतीचा बोध होतो ती गति फारशी चपळ आणि चंचल नसून मंद आणि अल्प आहे असा प्रत्यय येतो. चलनवलन

याचा आपण कोठें उपयोग करतो ? एखादा मनुष्य मरणोन्मुख झाला असतां तो मेला किंवा नाहीं याबद्दल शंका आली असतां कोणी वैद्य जवळ असतो तो म्हणतो कीं, अजून चलनवलन बंद झालें नाहीं. कोणी झोंपेंत असला तर त्याच्यासंबधानें आपण असें म्हणतों कीं, तो चळवळ करतो आहे, तेव्हां त्याला गाढ झोंप लागलेली नसावी. वर दिलेल्या उदाहरणांवरून एवढें तात्पर्य कळून येईल कीं, अत्यंत स्वल्प हालचाल दाखविण्याकरितां आपण प्रथमतः चळवळ या शब्दाचा उपयोग करीत होतों. पण हल्लीं आपण तोच शब्द तीस कोटि लोकांच्या हिताहिताच्या उलाढालीकडे लावण्याला सुरुवात केली आहे. अर्धवट झोंपेंत असलेला मनुष्य या कुशीचा त्या कुशीवर होतांना जशी चळवळ करतो तशाच प्रकारची आपल्या या अर्धवट झोंपी गेलेल्या राष्ट्राची चळवळ आहे असें दर्शविण्यासाठीं जर या शब्दाची योजना केलेली असेल तर कांहीं हरकत नाहीं. परंतु जिच्यापासून हिंदुस्थानांतील लोकांची स्थिति सुधारेल, जिच्यापासून हिंदुस्थानांतील लोकांना राजकीय हक्क प्राप्त होतील आणि जिनें हिंदुस्थानांतील लोकांच्या उत्कर्षाची स्थानिक स्वराज्याच्या प्राप्तीमध्यें परिसमाप्ति होईल, अशी आपण आशा करीत आहों, तिला चळवळ हा शब्द लावणें हें कधींही बरोबर होणार नाहीं. अशा दृष्टीनें पाहिलें असतां चळवळ हा शब्द अगदीं अयोग्य ठरतो. एखादी सरपटणाऱ्या जनावराची गति दाखविण्याकरितां किंवा मरणोन्मुख प्राण्याची गति दाखविण्याकरितां चळवळ हा शब्द साधारण बरा आहे; पण हिंदुस्थान म्हणजे कांहीं सरपटणारा प्राणी नव्हे. आतां हिंदुस्थान हा झोंपेंत असलेला किंवा मरणोन्मुख झालेला देश आहे असें कदाचित् म्हणतां येईल; व त्या दृष्टीनें पाहिलें असतां त्याच्या हालचालीला चळवळ हा शब्द अनुरूप होईल. पण मग तसल्या चळवळीपासून आपलीं सर्व इष्ट कार्यें सिद्धीस जातील असें जें साहेब लोकांनीं आपल्याला वरचेवर आश्वासन दिलेलें आहे तें खरें कसें होणार! सारांश, नुसत्या शब्दाच्याच दृष्टीनें पाहिलें तर चळवळ हा शब्द फारसा चांगला नाहीं. असो. याप्रमाणें agitation हा शब्दाचें मराठींत ज्या शब्दानें आपण भाषांतर करतों त्या शब्दाच्या योग्यतेसंबंधानें येथपर्यंत विचार करून, आतां आपण कायदेशीर चळवळ आणि गैरकायदेशीर चळवळ असे जे चळवळीचे दोन विभाग वर सांगितले आहेत त्यांच्याकडे वळूं. चळवळ हा शब्द वाईट कसा,

एवढेंच तूर्त दाखविण्याचें काम होतें. त्याच्याऐवजीं दुसरा चांगला शब्द कोणता हें शोधून काढण्याचें काम शब्दपंडितांचें होय. जो शब्द आहे तो चांगला नाहीं व तो चांगला कां नाहीं इतकें दाखवून दिलें म्हणजे आपलें प्रस्तुतचें काम भागलें. सबब तेवढें भागवून व फिरून तोच शब्द हातीं धरून आतां त्याच्या पोटविभागांकडे आपण वळूं. चळवळी हजार कामांत होत असतील. आपल्याला राजकीय चळवळीबद्दल बोलावयाचें आहे. एवढें सांगितल्यानें बाकीच्या चळवळी सहजच व्यावृत्त होतात. आतां राजकीय चळवळ म्हटली म्हणजे अर्थात् तिचा राजा आणि प्रजा या दोहोंशीं संबंध येतो. प्रजेनें राजापाशीं कांहीं हक्क मागावयाचे असले किंवा आपली कांहीं सोय करून घ्यावयाची असली तर त्यासाठीं लोकांचे जे प्रयत्न चालतात, त्याला सामान्यतः agitation अथवा चळवळ असें म्हणण्याचा प्रघात आहे. ही चळवळ लोक करितात, पण ती कोठल्या थरापर्यंत न्यावयाची हें ठरविण्याचें राजावर अवलंबून असतें. वास्तविक पाहिलें असतां राजा हा जर लोकांच्याच हितासाठीं आहे आणि त्या उद्देशाव्यतिरिक्त राजाला अस्तित्वांत येण्यालासुद्धां जर कांहीं कारण नाहीं, तर लोकांना राजापासून आपलें हित साधून घेण्याला इतके आयास करणें कां जरूर पडावें, व राजानें तरी त्यांना इतक्या श्रमामध्यें कां घालावें, हें समजणें कठीण आहे. राजा म्हणजे कल्पना अशी कीं, त्यानें लोकांचें हित सदैव चिंतीत असावें; त्या राजाच्या कानींकपाळीं लोकांनीं ओरडावें, त्यानें न वाचण्याकरितां लोकांनीं अर्ज करावे व त्यानें न ऐकण्याकरितां लोकांनीं हातींपायीं पडून त्याच्या विनवण्या कराव्या, अशी स्थिति कां असावी? राजानें लोकांचें कल्याण साधण्याकरितां सदोदित दक्ष असावें, हा जर राजाचा धर्म होय, तर मग एखादी क्षुल्लक मागणी करण्याकरितांसुद्धां लोकांना इतका खटाटोप करणें अवश्य कां पडावें? सगळ्या लोकांना अवश्य असणारी मागणी मागण्याकरितां सगळ्या देशभर चळवळ कशाला पाहिजे? आणि हजारों लोकांनीं ओरडून ती मागणी कशाला मागावयाला पाहिजे? राजा काय कोणी बहिरा प्राणी आहे कीं काय, कीं ज्याच्या कानामध्यें लोकांचें म्हणणें शिरण्याकरितां तें हजारों लोकांनीं ठिकठिकाणीं ओरडूनच सांगितलें पाहिजे? राजा लोकांच्या हिताकरितां आहे. असें असून व लोक आमचें हित अमक्या अमक्या गोष्टीमध्यें आहे असें स्पष्ट सांगत असूनही राजाकडून

लोकांना हितकारक असलेली गोष्ट घडवून आणली जात नाहीं, अशी पुष्कळ उदाहरणें दृष्टीस पडतात. व असें झालें म्हणजे त्यांत राजाची कांहीं तरी लबाडी असली पाहिजे असें उघड होतें. एरव्हीं लोकांच्या कल्याणासाठीं म्हणून असलेल्यांनीं लोकांचें कल्याण कां साधून देऊं नये ? पण वस्तुस्थिति अशी होते कीं, राजे आपलें मूळचें कर्तव्यकर्म विसरतात. लोकांच्या हितासाठीं आपलें अस्तित्व ही गोष्ट त्यांच्या लक्षांतून नाहींशी होते. प्रजाहितसाधनाच्या जागीं स्वार्थबुद्धि उत्पन्न होते. आणि लोकसरक्षणाच्या ऐवजीं लोकांना बुचाडण्याची इच्छा जागरूक होते. न्यायबुद्धि नष्ट होऊन त्याऐवजीं जुलूम करण्याचा जोर वृद्धिंगत होतो. आणि लोकांचा हक्क ही एक आपणापाशीं ठेव आहे, ही कल्पना लयाला जाऊन त्या हक्कावर आपलीच सत्ता आहे, आणि ते हक्क देणें हें आपलें कर्तव्यकर्म नसून तें आपल्या खुषीचें काम आहे, असें त्यांना वाटूं लागतें. समजुतीमध्यें असा बदल पडल्यामुळें लोकांना आपले हक्क मिळवून घेण्यासाठीं चळवळ करण्याचे प्रसंग येऊं लागले. मूळचे लोकांचेच हक्क खरे, पण लोकांनीं ते राजाच्या हवालीं केले आणि राजाला सैन्य ठेवण्याला परवानगी दिली. त्यामुळें राजाचें पारडें शिरजोर होऊन लोकांवर चळवळ करण्याचा प्रसंग आला व अशा रीतीनें राजांनीं भाग पाडल्यामुळें लोकांना चळवळ करणें भाग पडलें.

ह्याप्रमाणें लोक आपलेच हक्क आपल्यासाठीं परत मिळविण्याच्या प्रयत्नाला लागले. परंतु हे प्रयत्न सर्व ठिकाणीं सारखेच नव्हते. देशकालवर्तमानाप्रमाणें आणि लोकांच्या धैर्य, शौर्य इत्यादि गुणांच्या मानाप्रमाणें या प्रयत्नांना निरनिराळीं स्वरूपें येऊं लागलीं. कित्येक प्रयत्नांचें स्वरूप सौम्य असे. पण कित्येकांचें उग्र आणि असह्य झालें. कित्येकांनीं सामोपचारानें हक्क मागून पाहिले आणि त्या रीतीनें ज्या कांहींना कांहीं मिळाले नाहींत त्यांनीं जबरदस्तीचे, दांडगाईचे आणि बंडाळीचे मार्ग स्वीकारून आपल्याला पाहिजे होत्या त्या गोष्टी प्राप्त करून घेतल्या. लोकांना राजापासून पाहिजेत त्या गोष्टी मिळाल्या नाहींत म्हणून त्या प्राप्त करून घेण्यासाठीं लोकांनीं एक सौम्य आणि एक उग्र असे हे वर दिलेले दोन मार्ग स्वीकारिले. लोकांच्या दृष्टीनें या दोन्ही मार्गांमध्यें कांहीं एक फरक नाहीं. कारण कोणत्याही मार्गानें झालें तरी आपले हक्क मिळवायचे हाच लोकांचा काय तो हेतु. दोन्ही मार्गांचें

पर्यवसान एकच. मग त्यांत लोकांच्या दृष्टीनें भेद तो कसला ? साम आणि दंड यांपैकीं ज्या उपायानें आपला हक्क आपल्याला मिळेल, तो उपाय योजावयाचा एवढेंच काय तें लोकांचें पाहणें. पण धूर्त राजांनीं यामध्यें यापेक्षां जास्त पाहिलें. त्यांनीं असें पाहिलें कीं, वास्तविक हे लोकांचेच हक्क आहेत, व ते त्यांचे त्यांनाच देण्याच्या कामीं आपण उघड रीतीनें नकारात्मक उत्तरें देऊं लागलों तर तें चांगलें दिसणार नाहीं; म्हणून येथें कांहीं तरी वंचनाच केली पाहिजे. लोकांचे सामाचे आणि दंडाचे असे दोन उपाय पाहून त्यांपैकीं सामाचा उपाय राजांनीं पसंत केला. जेथें लोक प्रबळ झाले तर ते आपल्याला दंड करूनही आपल्यापासून आपले हक्क जबरदस्तीनें घेणार, तेथें सामोपचारानें आणि दिरंगाईनें आपणच त्यांना हक्क दिले तर काय वाईट, अशी कल्पना मनांत येऊन राजांनीं आपल्या प्रजाजनांमध्यें द्वाही फिरविली कीं, 'हे सर्व प्रजाजनहो, ऐका, ऐका, आनंदाची आणि महत्त्वाची बातमी ऐका. आम्ही मेहरबान होऊन तुम्हांला एक अतिशय महत्त्वाचा हक्क देत आहों. त्याचा प्रणिपातपूर्वक स्वीकार करण्याकरितां तुम्ही धांवत या, तुम्हीं आपले हक्क मिळविण्यासाठीं कायदेशीर चळवळ ( Constitutional Agitation ) करीत जावी. हा हक्क आजपासून तुम्हांला देण्यांत आलेला आहे. हा आपला हक्क तुम्ही अत्यंत अहमहमिकेनें सदोदित पाळीत जावा.' ही अपूर्व मेहरबानगीची बादशाही देणगी मिळाल्याबरोबर कित्येकांचे डोळे चकित होऊन गेले व इंद्राच्या नंदनवनामध्यें रोवलेल्या कल्पवृक्षाचेंच हें फळ आपल्या हातीं पडलें आहे असें त्यांना वाटूं लागलें. वास्तविक वरच्या करवंटीशिवाय दुसरें त्या फळांत कांहीं नव्हतें. तरी पण दृष्टि दिपावलेले लोक त्या एकत्र जुळलेल्या करवंट्या हातांत घेऊन तें श्रीफळ म्हणून ज्याला त्याला दाखविण्याकरतां नाचत जाऊं लागले. पण कित्येक कमी मूर्ख होते त्यांना या कायदेशीर चळवळ करण्याबद्दलच्या हक्काचा अर्थ कांहींच कळेना. ते असें म्हणत कीं, आमचेच हक्क मिळविण्याला आम्हांला चळवळ कशाला करावयाला पाहिजे ? अशी कोठें रीत आहे काय ? सावकारानें कुळाला कर्जाऊ पैसे दिले तर ते परत मिळविण्यासाठीं तूं चळवळ कर असें सावकाराला कुळानें सांगण्याची रीत आहे काय ? एखाद्यानें एखाद्या पेढीवर कांहीं ठेव ठेवली आणि नंतर कांहीं दिवसांनीं तो ती परत मागण्याकरितां गेला, तर तूं आपली ठेव परत

मिळविण्यासाठीं चळवळ कर, असें कोणी पतीचा पेढीवाला सांगत असतो काय ? सारांश, आपलेच हक्क आपण राजांपाशीं ठेव म्हणून ठेवलेले आपल्याला परत मागण्याची वेळ आली असतां ते मागण्याकरितां लोकांना चळवळ करावयाला सांगावयाची म्हणजे हें ठेव बुडविण्याचें लक्षण होय. ठेव ठेवणाराला बाजारांतील पेढीवाला असें उत्तर देईल तर त्याची पत बाजारांत एक क्षणभरदेखील टिकणार नाहीं; व त्याच्या दुकानाचें तावडतोब दिवाळें निघेल. पण आपल्या ठेवी आपल्याला योग्य वेळीं परत मिळण्यासाठीं लक्षावधि लोक ठणठण् शब्द करीत असतांही मूर्ख लोकांच्या दृष्टीनें ज्यांची नापत झाली नाहीं, आणि वेडगळ लोकांच्याच बाजारांत ज्यांचें दिवाळें निघालें नाहीं, अशा कित्येक मोठमोठ्या सावकारी पेढ्या पृथ्वीच्या पाठीवर अस्तित्वांत राहिलेल्या आहेत. राजानें लोकांना जे हक्क द्यावयाचे ते राजाचे नसून लोकांचेच कसे आहेत, आणि ते एक प्रकारचा न्यास म्हणून लोकांनीं राजापाशीं कसे ठेवलेले असतात, याच्याबद्दलची विवेचनें पूर्वीं अनेक वेळां होऊन गेलेलीं आहेत; सबब त्यांचा येथें फिरून निर्देश करण्याचें कांहींच कारण नाहीं. तेव्हां जे वास्तविक लोकांचेच हक्क ते लोकांनीं परत मिळविण्यासाठीं चळवळ कशाला करावयाला पाहिजे ? आणि ती करण्याबद्दलचा हक्क सरकारनें लोकांना कशाला द्यावयला पाहिजे ? लोकांना भूक लागली तर तुम्ही जेवा, असला हक्क लोकांना देण्याला सरकार नको. हें देवानेंच लोकांना सांगून ठेविलेलें आहे. भूक लागली तर जेवणें, अति झोंप येऊं लागली तर निजणें हें जितकें स्वाभाविक आहे, तितकेंच आपल्या हक्कांच्या प्राप्तीसाठीं वाटेल ती खटपट करणें स्वाभाविक आहे. व ऊन्ह लागलें असतां सांवलींत जावें, आणि थंडी वाजूं लागली तर उन्हांत जावें, ह्याच्याप्रमाणेंच आपल्या हक्कांसाठीं वाटेल तो प्रयत्न करावा, हाही एक ईश्वरदत्तच हक्क आहे. या ईश्वरदत्त हक्कामध्यें वाटेल त्या प्रयत्नांचा समावेश वास्तविक होत असतां, तुम्ही फक्त कायदेशीर चळवळ करा असें सांगणें म्हणजे राजानें लोकांना जास्त हक्क देणें नसून त्यांच्या ईश्वरदत्त हक्कांपैकीं निम्मे हक्क खालसा करण्यासारखें आहे. असा हक्क देणें म्हणजे उन्नतीचें साधन लोकांच्या हातांत देणें नसून त्यांना उन्नत प्रदेशांत उडतां येऊं नये म्हणून त्यांच्या एका बाजूचे पंख समूळ कातरून टाकण्यासारखें आहे.

तुम्हीं आपले हक्क आमच्यापासून मिळविण्याकरितां कायदेशीर चळवळ करा असें कोणी राजा आपल्या प्रजेला सांगतो तेव्हां तें सांगण्यांत त्यानें कांहीं गोष्टी कबूल केलेल्या असतात. मी तुमचें कांहीं तरी देणें लागत आहे, आणि तें माझ्यापासून घेण्याचा तुम्हांला अधिकार आहे, या गोष्टी वरील वाक्य बोलतांना राजा कबूल करतो हें उघड होतें. आतां लोकांचें घेणें जर खरें आहे आणि तें खुद्द राजालाही कबूल आहे, तर मग तें घेणें कोणत्या रीतीनें वसूल करून घ्यावें हें वसूल करून घेणारांच्या सोयीवर अवलंबून असलें पाहिजे; तें राजाच्या हुकुमावर काय म्हणून अवलंबून असावें? लोकांना सामोपचार सोयीचा वाटला तर लोक सामोपचाराचा उपयोग करतील, नाहीं तर दंडाचा उपयोग करतील. अशी वास्तविक स्थिति असतां फक्त कायदेशीर चळवळ करा, असें सांगून राजांनीं आपली सोय करून घेतली आहे. आपले हक्क परत मिळविण्यासाठीं लोक अप्रतिहत रीतीनें प्रयत्न करूं लागले असते तर ते वाटेल त्या दरवाजानें आंत घुसले असते. आणि त्यांनीं आपले हात आपल्या हक्कापर्यंत तेव्हांच नेऊन पोंहोचविले असते. पण राजांनीं आतां अशी व्यवस्था केली आहे कीं, ते ज्या ठिकाणीं लोकांच्या हक्कांना खालीं घालून त्यांच्यावर बसलेले आहेत, त्या ठिकाणचे दरवाजे त्यांनीं कडेकोट बंदोबस्तानें बंद करून फक्त एकच दरवाजा उघडा ठेविला आहे, व त्या दरवाजावरही चौकीपहारे, पासपरवाने वगैरे इतके ठेविलेले आहेत कीं, त्या उघड्या दरवाजांतूनही कोणाचा प्रवेश होणें फार मुष्किलीचें काम आहे. अशा रीतीनें सर्व दरवाजे लावून घेतल्यामुळें दुसऱ्या कोणत्याही बाजूनें भीति न उरून सर्व लक्ष एकाच बाजूनें येणाऱ्या मागणेकऱ्याकडे लावण्याची राजांची सोय झाली आहे. व इतक्या अडचणींमधून आपले हक्क परत मिळवावयाचे असल्याकारणानें लोकांना मात्र फार गैरसोय झाली आहे. हक्कच घ्यावयाला यावयाचें आहे तर मग या दरवाजानें काय आणि त्या दरवाजानें काय, कोणीकडून गेलें तरी सारखें कां नसावें? एखाद्या ऋणकोनें आपल्या सावकाराला जर असें सांगितलें कीं, मी तुमचें देणें आहे खरें, पण मी आपल्या घराचीं सर्व दारें बंद करून ठेवीन, आणि तुमच्या प्रवेशाला प्रतिबंध करण्याजोगीं मजपाशीं जीं जीं साधनें असतील तीं तीं सर्व मीं जेथें गोळा करून ठेविलीं आहेत, असा एक दरवाजा मात्र उघडा ठेवीन, त्या दरवाजांतून तुम्हीं येऊन आपले पैसे वसूल करून घ्यावे, तर त्या ऋणकोचें

म्हणणें कोणाला तरी सयुक्तिक आणि न्यायाचें वाटेल काय? या ऋणकोच्या म्हणण्याप्रमाणें राजांचेंही म्हणणें थोडेंसें गैरशिस्त दिसतें.

कायदेशीर चळवळीबद्दल हा एका बाजूनें विचार झाला. पण त्या प्रश्नाला दुसरीही बाजू आहे. चार लोक चोहोंकडून येऊन जर राजापाशीं मागण्या मागूं लागले, व राजावर एकदम गिल्ला करूं लागले व त्याचें अस्तित्व धोक्यांत आणूं लागले, तर त्याच्यापासून लोकांना राजकारणामध्यें दुसरे जे कांहीं अनेक फायदे व्हावयाचे असतात ते सर्व बंद पडतील; व राजाचाच अशा प्रसंगांत उच्छेद झाला तर अराजक अवस्थेमुळें उत्पन्न होणारे सर्व अनर्थ उद्भवतील ते टाळण्यासाठीं हा सामोपचाराचा उपाय योजिलेला आहे. त्याच मार्गानें जाऊन लोकांनीं आपला फायदा करून घ्यावा हें उचित आहे. पूर्वीच्या विवेचनांत जें वाजवी मिळावयाचें आहे तें मिळविण्याकरितां लोकांनीं चळवळ कशाला करावयाला पाहिजे, असा एक प्रश्न उपस्थित झालेला होता. त्या प्रश्नालाही वर दर्शविल्यापेक्षां निराळी अशी दुसरी एक बाजू आहे. सरळ रीतीनें पाहिलें तर चळवळीची जरूर नाहीं. परंतु चळवळ करणें कां जरूर आहे, यालाही एक उपपत्ति सांगतां येण्यासारखी आहे. राज्यांतील लोकांच्या बहुमताला जी गोष्ट जरूर वाटत असेल ती द्यावी, असें राजाचें धोरण असतें. व हें धोरण समंजसपणाचेंही आहे. तेव्हां आपण जो हक्क राजापाशीं मागत असूं त्या हक्काची जरूरी पुष्कळ लोकांना आहे, निदान एकंदर राज्यांतील निम्मेपेक्षां अधिक लोकांना आहे, असें सिद्ध करून दाखविणें जरूरीचें असतें व त्यासाठीं लोकांचीं मनें आपल्या मताकडे वळविण्याकरितां चळवळ करणें जरूर पडते. पण ही उपपत्ति मान्य करतांना एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, जेथें लोकमतावर अवलंबून असलेली प्रतिनिधिसत्तात्मक राज्यपद्धति सुरू आहे, तेथेंच या चळवळीविषयींची उपपत्ति लागू पडण्यासारखी आहे. युनायटेड किंगडमची एकंदर लोकसंख्या चार कोटींच्या वर आहे; पण त्यापैकीं राजकारणामध्यें बरें वाईट मत देण्याची योग्यता जवळ जवळ सदुसष्ट लक्ष लोकांना आहे. ह्या सदुसष्ट लक्ष लोकांनीं निवडून दिलेले सुमारें सहाशें सत्तर प्रतिनिधि पार्लमेंटच्या सभेमध्यें बसतात. म्हणजे पार्लमेंटमधील प्रत्येक सभासद आपल्या दहा हजार मतदारांच्या जागीं असतो. अशा प्रतिनिधींपैकीं निदान तीनशें छत्तीस प्रतिनिधींना एखादी गोष्ट मान्य झाली म्हणजे ती युनायटेड

किंगडममधील अर्थातच जास्त लोकांना मान्य झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु तशी स्थिति प्राप्त होण्याला आणि तितकीं लोकांचीं मनें वळविण्याला लोकांनीं चळवळच करावी लागते, हें ठीक आहे. पण जेथें लोकमतावर राजाची क्रिया अवलंबून नाहीं त्या देशांतून असल्या चळवळींचा काय उपयोग आहे, हें समजणें फार कठीण आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील राज्यकारभार लोकमतावर सर्वस्वीं अवलंबून नाहीं. असल्या देशांतून असल्या चळवळीचा काय उपयोग? सहाशें सत्तर सभासदांच्या पार्लमेंटांत तीनशें चौतीस सभासदांनाच फक्त एखादी गोष्ट मान्य आहे, तोंपर्यंत इंग्लंडचा राजा ती गोष्ट करीत नाहीं, पण तीच गोष्ट जर तीनशेंछत्तीस सभासदांना मान्य झाली तर मग राजाला नाहीं म्हणण्याची सोय नाहीं. म्हणून तिकडे तीनशें चौतिसांचे तीनशें छत्तीस करण्यासाठीं लोकांनीं चळवळ करणें युक्त आहे. पण हिंदुस्थानांत तसें काय आहे? येथें पार्लमेंट कोठें आहे? आणि येथें लोकांना काय वाटतें आहे आणि काय वाटत नाहीं, याच्याबद्दलची तिकडच्याप्रमाणें मोजदाद कोठें आहे? येथें लोकांच्या म्हणण्याला विचारतो आहे कोण? येथें तीनशें चौतिसाचे तीनशें छत्तीस नव्हे, सहाशें सत्तर झाले तरी त्यांची दाद घेण्याला कोण बसलें आहे? जर कोणी नाहीं, तर मग ह्या चळवळीचा काय उपयोग? मोर नाचतो म्हणून लांडोरीनें नाचावें, त्याप्रमाणें इंग्लंडांतील लोक चळवळी करितात म्हणून हिंदुस्थानांतील लोकही चळवळी करूं लागले आहेत! पण तिकडच्यांत आणि इकडच्यांत फरक काय आहे हें कोणीही लक्षांत आणीत नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांना कांहीं तरी नादीं लावून ठेवण्याला हें एक साधन बरें आहे, असें पाहून साहेब लोकांनीं शिकलेल्या नेटिव लोकांना सांगितलें कीं, तुम्ही इंग्लंडांतल्याप्रमाणें चळवळी करा. पण त्या साहेब लोकांना असें कोणी विचारीना कीं, होय, आम्ही तिकडच्यासारख्या चळवळी करितों; पण त्या चळवळीनें जें लोकमत बनेल याची मोजदाद घेण्याला आणि तें निम्मेपेक्षां अधिक भरल्यास त्याप्रमाणें वागण्याला राज्यकर्ते कोणते तयार आहेत? निम्मेपेक्षां अधिक लोकमत झाल्यास त्याप्रमाणें वागण्याचें सरकारनें कबूल केल्यावांचून, म्हणजे प्रतिनिधिसत्ताक पद्धत सुरू केल्यावांचून लोकांनीं पुष्कळ शंख केले तरी त्याचा काय उपयोग आहे? भोळे बिचारे, आपले हात आणि तोंडें मात्र दमवून घेतील! आपण पुष्कळ चळवळी करितों आणि त्याचा कांहीं एक परिणाम होत नाहीं याचें कारण हेंच

आहे कीं, आपण पुष्कळ चळवळी केल्या तरी त्याप्रमाणें वागण्याचें आपल्या सरकारनें कबूल केलेलें नाहीं. आपलें लोकमत कांहींही झालेलें असलें तरी सरकारला जें उचित दिसेल तेंच सरकार करणार. अशा प्रकारचे शिरजोर सरकार जोंपर्यंत आहे तोंपर्यंत नेभळ्या लोकांच्या दुबळ्या सभा, शिळपट अर्ज, पोंचट परिषदा, दिखाऊ नॅशनल कॉंग्रेस आणि निरुपयोगी इंग्लंडांतील व्याख्यानें, या सगळ्यांचा काय उपयोग व्हावयाचा आहे, हें अलीकडच्या शहाण्या लोकांशिवाय दुसऱ्या कोणालाही सांगण्याची जरूरी नाहीं. सारांश, हिंदुस्थानांत आज अशी स्थिति आहे कीं, हिंदुस्थानांतील लोक मात्र इंग्लंडांतील लोकांप्रमाणें कॉन्स्टिटय़ूशनल पद्धतीनें हक्क मागण्याच्या चळवळी करीत आहेत, पण लोकमत मोजून तें अधिक भरलें तर त्याप्रमाणें आपण वागूं असें राजानें आपल्याला कोठेंच बांधून घेतलेलें नाहीं. हिंदुस्थान सरकारच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमधील चार–पांच सभासदांना आणि व्हाइसरॉयसाहेबांना इंग्लंडांतील लोकांच्या जें कांहीं सोईचें दिसेल तें ते करणार. आणि हिंदुस्थानांतील लोकांनीं मात्र कॉन्स्टिटय़ूशनल चळवळी कराव्या, अशी व्यवस्था आहे ! ही बरोबर नाहीं. राजाला आणि प्रजेला दोघांनाही एकच बंधनें पाहिजेत. हिंदुस्थानांतील लोकांनीं जर कॉन्स्टिटय़ूशनल चळवळीच कराव्या तर हिंदुस्थान सरकारलाही बांधणारी कॉन्स्टिटय़ूशन पाहिजे.

लोक कॉन्स्टिटय़ूशनल आणि सरकार मर्जीस येईल तसें वागणारें असें कधीं चालावयाचें नाहीं. दोघांनींही सारख्याच तत्त्वावर चाललें पाहिजे. असें लिहिण्यांतील आमचा हेतु सरकार स्वैराचारी आहे त्याप्रमाणें लोकांनींही गैरकायदेशीर रीतीनें वागावें असा मुळींच नाहीं, तर लोक जसे कॉन्स्टिटय़ूशननें बांधले गेले आहेत त्याचप्रमाणें राजाही बांधला गेलेला असला पाहिजे व त्याप्रमाणें हिंदुस्थान सरकार हिंदुस्थानांतील लोकांवर कायदेशीर रीतीनें राज्य करण्याची केव्हां ना केव्हांतरी मेहेरबानी करतील अशी आशा बाळगण्याला जागा आहे. परंतु जोंपर्यंत सरकार लोकमत मोजून बहुमताप्रमाणें सर्व व्यवस्था करण्याला तयार नाहीं तोंपर्यंत हिंदुस्थानांतील लोकांच्या सर्व चळवळी फुकट आहेत.

आतां ह्या चळवळींपैकीं कायदेशीर चळवळी कोणत्या देशांतील लोकांनीं कराव्या आणि कां कराव्या, आणि गैरकायदेशीर चळवळी कोणत्या देशांतील लोकांनीं करूं नयेत आणि त्या कां करूं नयेत, हाही एक विचार करण्यासारखा

प्रश्न आहे. परंतु प्रस्तुतचा विषय बराच लांबल्यामुळें तूर्त या प्रश्नाकडे वळणें अशक्य आहे.

---

# जुन्या सुशिक्षिताचा एक मासला : : ६

हल्लीं जसें आपल्यावर ब्रिटिशसाम्राज्याचें दडपण आहे, तसें तीनशें वर्षांपूर्वीं आपल्यावर मुसलमानी साम्राज्याचें दडपण होतें. त्या मुसलमानी साम्राज्याखालीं आपण जेव्हां दडपले जात होतों, तेव्हां आपली पुष्कळ बाबतींत हल्लींच्यासारखीच स्थिति होती. तेव्हांही एक सुशिक्षित वर्ग आणि एक अशिक्षित अथवा अडाणी वर्ग, असे दोन वर्ग आपल्यामध्यें होते. त्या वेळच्या सुशिक्षित वर्गांत हल्लींप्रमाणें बॅरिस्टर, ॲडव्होकेट, एल्‌एल्. बी., वकील, जज्ज, एम्. डी., एल्. एम्. ॲण्ड एस्., इंजिनिअर, प्रोफेसर, हेडमास्तर आणि कॉंग्रेसचे किंवा परिषदेचे अध्यक्ष आणि पुढारी यांचा समावेश होत नसे हें जरी खरें आहे, तरी दोन्ही वेळची त्यांच्याबद्दलची कल्पना एकच होय. हल्लीं इंग्रजी भाषेनें सुशिक्षितत्व येतें, तसें तें पूर्वीं संस्कृत भाषेनें येत असे. संस्कृत शिकला म्हणजे तो सुशिक्षित झाला असा पूर्वींचा समज होता. व ज्यांना संस्कृत विद्येचें शिक्षण नाहीं असे लोक अडाणी वर्गांत मोडत होते. हिंदुसमाजाची सर्व रचना श्रुतिस्मृतिमूलक असल्यामुळें व हे श्रुतिस्मृतींचे ग्रंथ संस्कृतमध्येंच असल्यामुळें संस्कृत जाणणारांना स्वाभाविकपणेंच चारी वर्णांत एक प्रकारचें विशेष महत्त्व येत असे. शिवाय श्रुतिस्मृति खेरीजकरून इतरही सर्व शास्त्रांवरील आणि कलांवरील ग्रंथ संस्कृतमध्येंच लिहिलेले असल्यामुळें त्या वेळीं साहजिकपणें संस्कृत भाषा ही त्या वेळच्या उपलब्ध असलेल्या सर्व ज्ञानांची किल्ली होय, असें मानण्यांत येत असे. व संस्कृतच्या मानानें पाहिलें असतां मराठी भाषा त्या वेळेस फारच दैन्यावस्थेंत होती. तिला अद्यापि चांगलें स्वरूप आलेलें नव्हतें, व निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथसमुच्चयही तिच्यामध्यें अजून अवतीर्ण

झालेला नव्हता. असा या दोन भाषांमध्यें मुख्य फरक असल्यामुळें, संस्कृत भाषा जाणणारे ते सुशिक्षित आणि बाकीचे अडाणी असें त्या वेळचेंही एक साधारण मत झालेलें होतें. आतां या त्या वेळच्या सुशिक्षित वर्गापैकीं मासल्याकरितां एक सुशिक्षित घेऊन त्याचें आचारविचार, त्याची रीतभात, त्याच्या कल्पना, त्याची महत्त्वाकांक्षा, त्याची नीति, त्याचा देशाभिमान, त्याचें राजकीय धोरण, वगैरे कसें काय होतें याबद्दलचें त्या वेळच्या सुशिक्षित वर्गाची स्थिति समजण्याकरितां आपण थोडक्यांत येथें परीक्षण करूं.

ज्याला संस्कृत काव्यांचें थोडेंबहुत ज्ञान आहे, पण ज्याला जगन्नाथ पंडिताचें नांव माहीत नाहीं, असा मनुष्य फारच विरळा सांपडेल. जगन्नाथ हा एक त्या वेळचा फारच जाडा पंडित होता. आणि त्या वेळच्या पंडितांना ग्रॅज्युएट हा शब्द लावण्याची परवानगी जर हल्लींच्या एखाद्या युनिव्हर्सिटीनें दिली, तर त्यामध्यें जगन्नाथ पंडिताला प्रिन्स ऑफ ग्रॅज्युएट्स असें म्हणण्याला बिलकुल हरकत नाहीं. याची विद्वत्ता आश्चर्य करण्यासारखी होती; व यानें लिहिलेले ग्रंथ अद्यापि अत्यंत लोकमान्य आहेत. याची कविताशक्ति अप्रतिम होती, आणि त्यांतच प्रसाद, माधुर्य, कोमलता, इत्यादि अनेक गुणांची भर पडल्यामुळें ज्याला ज्याला म्हणून संस्कृत समजतें, त्याला त्याला जगन्नाथ पंडिताची कविता आपल्या प्रियतमेप्रमाणें अत्यंत प्रिय झालेली आहे. जगन्नाथ पंडिताचा शृंगाररस मनुष्याला कामुक करून सोडितो. त्याच्या करुणरसात्मक कविता कठोर अंतःकरणाच्या मनुष्याच्याही डोळ्यांमध्यें अश्रु निर्माण करितात, आणि त्याच्या भक्तिरसाच्या ओघामध्यें सांपडलेला मुमुक्षु वाहत जातां जातां क्षणभर परमेश्वराच्या चरणांशींच जाऊन लागतो. जगन्नाथाची कविताशक्ति जशी उत्कृष्ट तशीच त्याची तर्क आणि अलंकारशास्त्रांतील गतिही उत्कृष्ट होती. त्यानें अलंकारशास्त्रावर लिहिलेल्या रसगंगाधरनामक ग्रंथाप्रमाणें सर्वमान्य ग्रंथ अलंकारशास्त्रावर पूर्वी कधीं झालेला नाहीं, व याच्यापुढेंही होण्याचा संभव नाहीं. जगन्नाथ पंडिताच्या अद्वितीय ग्रंथकर्तृत्वाबद्दल आणि अलौकिक कविप्रतिभेबद्दल त्याची योग्य स्तुति करून आतां आपण त्याच्या चरित्रांतील इतर गोष्टींकडे वळूं. हा मूळचा दक्षिण देशांत राहणारा होता. परंतु तिकडे त्याचें बरोबर जमेना म्हणून तो उत्तर हिंदुस्थानांत आला. जगन्नाथाचा उदय कोणत्या वर्षी झाला याच्याबद्दल बरोबर निश्चय करण्याला तूर्त कांहीं साधन

नाहीं. परंतु त्याच्याबद्दल ज्या कित्येक दंतकथा कर्णपरंपरेनें ऐकण्यांत येतात त्यांवरून तो अकबराच्या कारकीर्दीत उदय पावला असावा असें दिसतें. आणि त्याच्या लेखांतील अंतर्गत पुराव्यावरून पाहिलें असतां शहाजहान बादशहाच्या कारकीर्दीमध्यें तो असलाच पाहिजे असें मानण्याला पुष्कळ जागा असल्याचें आढळून येतें. जगन्नाथ पंडिताचा बरोबर कालनिर्णय करण्याचें हें स्थळ नव्हे. सामान्यपणें आपल्या कामाला तूर्त एवढें पुरें आहे कीं, अकबर, जहांगीर, शहाजहान, यांच्या कारकीर्दीमध्यें जगन्नाथ पंडित नांवलौकिकाला चढला. हा त्या वेळचा जाडा सुशिक्षित काय करीत असे, हें आतां आपल्याला पाहावयाचें आहे. या सुशिक्षिताचा—या त्या वेळच्या प्रिन्स ऑफ ग्रॅज्युएट्सचा—देश मुसलमान लोकांनीं कैलासपर्वतापासून सेतुबंधापर्यंत सर्वतः व्यापून टाकिला असतां, त्याच्या देशबांधवांचा मुसलमान लोक जिकडे तिकडे छळ करीत असतां, हा त्या वेळचा सुशिक्षित, हा त्या वेळचा प्रिन्स ऑफ ग्रॅज्युएट्स, काय करण्यांत गुंग झालेला होता ? हा सुशिक्षित मुसलमानांच्या दरबारांत राहून आणि मुसलमानांचें अन्न खाऊन त्यांचा तोंडपुजेपणा करण्यामध्यें आपल्या आयुष्याचे दिवस फुकट घालवीत होता ! जगन्नाथाच्या काव्यांतील श्लोक शोधून पाहिले तर त्यांमध्यें ज्यांत विनाकारण मुसलमान नबाब आणि बादशहा यांची स्तुति केली आहे असे बरेच श्लोक सांपडतील. जगन्नाथानें अलंकाराच्या उदाहरणासाठीं प्रायशः हे श्लोक केलेले आहेत. त्या श्लोकांतून कोठल्याही राजाचें नांव घातलें असतें तरी चाललें असतें. असें असूनही त्यानें मुद्दाम तोंडपुजेपणा करण्यासाठीं आणि खुशामत करण्यासाठीं मोंगल बादशहाचें नांव घातलें आहे. यावरून वरील विधानाची सत्यता कोणाच्याही सहज लक्षांत येईल. पुढें दिलेले कांहीं चरण वरील गोष्टीच्या प्रत्ययासाठीं उदाहरणें म्हणून होण्यासारखे आहेत. 'चिरंजीवन्नास्तामधिधरणि दिल्लीनरपतिः,' 'जानीमो भवता न हंत विदितो दिल्लीधरावल्लभः,' 'दुग्धाब्धे भवतासमो विजयते दिल्लीधरावल्लभः,' 'व्याकुप्यन्नूरदीनक्षितिरमणरिपुक्षोणि भ्रूत्पक्ष्मलाक्षी,' 'भूमीनाथ शहाबुद्दीन भवतस्तुल्यो गुणानां गणैः...' जगन्नाथाच्या पूर्वीं ज्यांनीं अलंकारावर उदाहरणें रचलीं त्यांना तीं उदाहरणें करावयाला दिल्लीपतिच लागत होता असें नाहीं. परंतु जगन्नाथाला आपल्या देशाची धूळधाण करणाऱ्या मोंगलांचीच स्तुति करणें आवडत असे. त्याच्याबद्दल अशी एक आख्यायिका सांगतात कीं, जगन्नाथ

दिल्लीच्या दरबारामध्यें असतांना त्याला दुसऱ्या कोणा राजाकडून आपल्या पदरीं राहण्याला येण्याविषयीं बोलावणें आलें होतें. हा राजा कदाचित् हिंदुही असेल पण त्याचा तिरस्कार करून आणि दिल्लीधराला जगदीश्वराच्या तोडीला बसवून जगन्नाथानें ('दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान् पूरयितुं समर्थः। अन्यैर्नृपालैः परिदीयमानं शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात्॥') असे उद्‌गार काढले. दुसरे राजे काय देणार? त्यांनीं दिलेलें माझ्या मीठभाजीला पुरेल किंवा नाहीं याची वानवा आहे. माझे मनोरथ परिपूर्ण करण्याला केवळ एक दिल्लीश्वर किंवा दुसरा जगदीश्वर हेच काय ते समर्थ आहेत. अशा अर्थाचे हे वरील उद्‌गार ऐकून या त्या वेळच्या सुशिक्षिताबद्दल वाचकांची काय बरें कल्पना होईल! शिवाय ज्या वेळीं जगन्नाथ मोंगल बादशहांची अशा रीतीनें खुशामत करीत होता, त्या वेळीं त्यांची वास्तविक त्यानें वर्णन केल्याप्रमाणें स्थिति नव्हती. मोंगल साम्राज्याचे चांगले दिवस अकबराबरोबर समाप्त झाले होते, व शहाजहानच्या मुलांच्या भांडणाबरोबर मोंगल साम्राज्यांत अपकर्षाचा शिरकाव झालेला होता. मोंगल साम्राज्य चोहोंकडून पोखरलें जाऊन तें लहानशाही धक्क्यानें मोडण्याच्या बेतांत आलेलें होतें, व दिल्लीच्या बादशहांचें सामर्थ्य चोहोंकडे उत्पन्न होत चाललेल्या शत्रूंच्या प्राबल्यामुळें हळूहळू संपुष्टांत येत चाललें होतें; तरी जगन्नाथ पंडित 'दुग्धाब्धे भवतासमो विजयते दिल्लीधराबल्लभः' असें म्हणून त्यांची खुशामत करीतच होता! असली वागणूक कोणत्याही दृष्टीनें प्रशस्त आहे असें म्हणतां येत नाहीं. तरी पण जगन्नाथाच्या मनामध्यें आपण करीत आहों हें आपल्या देशाच्या आणि धर्माच्या दृष्टीनें उचित आहे किंवा अनुचित आहे याबद्दलचा विचार कधीं आलाच नाहीं. आणि स्वार्थापलीकडे त्याची दृष्टि कधीं गेलीच नाहीं. त्याच्या सुशिक्षितपणाचें पर्यवसान मोंगलांच्या अन्नावर पुष्ट होण्यामध्यें झालें आणि त्याच्या विद्वत्तेचें पर्यवसान मोंगलांची वृथा स्तुति करण्यामध्यें झालें. ह्या त्या वेळच्या सुशिक्षिताची महत्त्वाकांक्षाच बेताबाताची होती. त्याच्या महत्त्वाकांक्षेचें चित्र पुढील श्लोकामध्यें फार चांगल्या रीतीनें व्यक्त झालेलें आहे. 'शास्त्राण्याकलितानि नित्यविधयः सर्वेपि संभाविता दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः। संप्रत्युज्झितवासनं मधुपुरीमध्ये हरिः सेव्यते सर्वं पंडितराजराजितिलकेनाकारि लोकाधिकम्॥' सर्व लोकांपेक्षां पंडितांनीं अधिक केलें तें काय केलें?

तर दिल्लीच्या राजाच्या पदरीं आपलें नवीन वय खर्ची घातलें ! सर्व लोकांपेक्षां अधिक करावयाचें म्हणजे काय करावयाचें, याच्याबद्दलची पूर्वीच्या सुशिक्षितांची कल्पना आणि हल्लींच्या सुशिक्षितांची कल्पना या अगदीं तंतोतंत जमतात ! युनिव्हर्सिटीची परीक्षा द्यावी, भोजनादिक नित्यविधी नऊ वाजतां करावे, वीस वर्षांपासून पन्नास वर्षांपर्यंतचें उमेदीचें वय दिल्लीपतीच्या चाकरीमध्यें खर्च करावें, आणि अखेरीस नाशिक, वांई, काशी वगैरे सारख्या ठिकाणीं पेन्शन घेऊन हरि हरि म्हणत बसावें, हें जें आजकालच्या सुशिक्षितांना लोकाधिक वाटत आहे तेंच जगन्नाथाला वाटत होतें हें मोठें आश्चर्य आहे ! तीनशें वर्षांपूर्वीचा सुशिक्षित जेथें होता तेथेंच आजचा सुशिक्षित उभा आहे हें पाहून हिंदुस्थानच्या खगोलांतील ताऱ्यांची गति किती धिम्मेपणाची आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. जगन्नाथ पंडिताबद्दल दुसरीही एक वाईट आख्यायिका आहे. ती अशी कीं, त्याचा एका यवनीशीं संबंध होता. त्याबद्दलचा एक श्लोकही प्रचलित आहे. तो असा कीं, ' यवनी नवनीतकोमलांगी शयनीये यदि लभ्यते कदाचित् । अवनीतलमेव साधु मन्ये न वनी माघवनी विलासहेतुः ॥' हें वाक्य जर खरोखरच जगन्नाथानें उच्चारिलें असेल तर त्यानें महाराजा सर किसनप्रसाद यांच्याही वर ताण केली असें म्हटलें पाहिजे.

जगन्नाथ पंडिताच्या चरित्रांतील ज्या कांहीं गोष्टी वर दिल्या आहेत, त्यांवरून त्या वेळचा सुशिक्षित मनुष्य कसा होता, याची आपल्याला चांगली कल्पना येईल; व हल्लींच्या सुशिक्षितानें त्याच्याकडे पाहिलें असतां त्याला तेथें आपलें प्रतिबिंब बरोबर दिसेल. जगन्नाथ हा उत्तम कवि होता हें सांगितलेंच आहे. पण दुःखाची गोष्ट ही कीं, ज्या परमेश्वरानें त्याला कविताशक्ति दिली, त्यानें त्या कविताशक्तीचा उपयोग कोणाची स्तुति करण्याकडे करावा हें ठरविण्याची विचारशक्ति त्याला दिली नाहीं. जगन्नाथानें आपली कविता गुलामगिरीचीं गाणीं गाण्याकडे लाविली. पण कवितेचा खरा उपयोग हा नव्हे. कविताशक्ति आणि चित्रकला ह्या दोन देवाच्या घरच्या विद्या आहेत. त्यांचा उपयोग गुलामगिरीच्या अभिवृद्धयर्थ करावयाचा नाहीं. आपल्याला चित्रें काढतां येत असलीं तरी आपण कोणाचीं चित्रें काढावीं, आणि आपल्याला कविता करतां येत असल्या तरी आपण कोणाविषयीं कविता कराव्या, या प्रश्नांचा विचार चित्रकारानें आणि प्रत्येक कवीनें केला पाहिजे. त्या वेळचे मोंगल

बादशहा हिंदु लोकांवर फार जुलूम करीत होते आणि त्यांनीं हिंदु लोकांना आपले गुलाम करून ठेविलें होतें. अशा स्थितीमध्यें हिंदु कवींनीं आपल्या गुलामगिरीमध्यें संतोष मानून त्या गुलामगिरीची बेडी आपल्या पायामध्यें अडकविणाऱ्या जुलमी राजांची स्तुति करण्याकरितांही कविता रचाव्या, हें खऱ्या कवीचें काम नव्हे. असला कवि आणि पोपट यांच्यामध्यें काय फरक उरला ? दोघांचाही शब्द रम्य आहे, पण दोघांनाही त्या रम्य शब्दाचा उपयोग कोणासाठीं करावयाचा याच्याबद्दल सारासार विचार नाहीं ! पण कवीला आणि पोपटाला देवानें या जगामध्यें एकाच उद्देशानें पाठविलें नाहीं. कवीचें काम आपल्या कवितेच्या द्वारानें लोकांना कांहीं तरी शिकवावयाचें आहे; व जें कांहीं शिकवावयाचें ती वाईट गोष्ट असतां कामा नये. कवीनें लोकांना गुलामगिरीची चटक लावून द्यावयाची नाहीं किंवा तिच्यासाठीं कविता करावयाच्या नाहींत. इतर देशांतून अशीं उदाहरणें आढळून येतात कीं, तेथील कवींच्या कविता वाचून गुलामगिरींत असलेल्या लोकांना आपलें स्वातंत्र्य परत मिळवून घेण्याची उत्कट इच्छा उत्पन्न होते, आणि आमच्यांतील कवींनीं जे आमच्यावर जुलूम करतात त्यांचींच गाणीं गावीं ! अर्वाचीन संस्कृत ग्रंथसमूहामध्यें पुष्कळ चांगल्या गोष्टी आहेत. परंतु ज्याच्या योगानें वाचणारांच्या मनांत स्वदेशाभिमानाचें आणि स्वदेशभक्तीचें स्फुरण उत्पन्न होईल, असा ग्रंथ फारच विरळा दृष्टीस पडतो. उलट गुलामगिरीमध्यें आनंद उत्पन्न करणारे श्लोक मात्र जगन्नाथ पंडितानें करून ठेविले आहेत !

त्या वेळच्या सुशिक्षितांमध्यें गुलामगिरीची आवड किती होती, तोंडपुजेपणामध्यें त्यांना किती गोडी वाटत होती, आणि स्वातंत्र्याबद्दलची त्यांना किती थोडी कल्पना होती, हें यावरून दिसून येईल. त्या वेळीं हिंदुस्थानला तोंडपुजेपणाहून भिन्न अशा गोष्टींची आवश्यकता होती. पण ती या सुक्षितांकडून परिपूर्ण झाली नाहीं. ती कामगिरी अखेरीस अशिक्षित वर्गामध्यें मोडणाऱ्या लोकांनींच शेवटास नेली. संस्कृत भाषेंतील पंडितांचा बहुजनसमाजाला कांहीं एक उपयोग होत नव्हता. [हल्लींचे पंडित जसे इंग्रजींत बोलतात आणि इंग्रजींत चालतात, त्याचप्रमाणें त्या वेळचे पंडित केवळ संस्कृतमध्यें बोलत आणि चालत असत.] त्यांच्या विचाराचा जनसमुदायावर कांहीं एक परिणाम होत नसे. त्या समुदायावर जे लोक आपल्या विचारांचा

कांहीं परिणाम घडवून आणीत होते, ते ह्या पंडितवर्गांत मोडणारे नसून अशिक्षित किंवा अडाणी वर्गामध्यें ज्यांची गणना होईल अशाच लोकांकडून तें काम झालें. हिंदुधर्माचा उच्छेद चालला असतां आणि हिंदुस्वातंत्र्याची पायमल्ली होत असतां त्या धर्माचें पुनरुज्जीवन रामदास, तुकाराम यांच्यासारख्या मराठी बोल बोलणाऱ्या लोकांनींच केलें आणि त्या स्वातंत्र्याचें पुनरुज्जीवन शिवाजी, तान्हाजी वगैरेसारख्या अशिक्षित आणि अडाणी लोकांनींच घडवून आणिलें. आणि हे मराठी भाषा बोलणारे, अशिक्षित व अडाणी लोक हीं महत्कृत्यें करीत असतां गीर्वाण भाषा बोलणारे, सुशिक्षित जगन्नाथ पंडित यवनांच्या अन्नावर आपला पिंड पोसून व यवनीच्या शयनावर पडून माधवनी वनीचे विलास तुच्छ मानून दिल्लीपतीच्या चरणसेवेमध्ये आपलें नवीन वय घालविण्याचें लोकाधिक कृत्य केल्याबद्दल आपल्या धन्यतेचें वर्णन करण्यामध्यें गुंग झालेले होते ! मुसलमानांनीं आपल्या धर्माला किती जखमा केल्या आहेत, डच, पोर्च्युगीज, फरेंच या लोकांनीं आपल्या देशाचे तुकडे तोडण्याला कसा प्रारंभ केला आहे, आणि इंग्लिशांनीं मोंगल बादशाहापुढें हातीं पायीं पडून आपल्या मातृसमान आर्यभूमीच्या शरीराला रक्त शोषणाऱ्या जळवा लावण्याला कशी सुरवात केली आहे, याच्याबद्दल या सुशिक्षितांच्या स्वप्नांतसुद्धां कधीं विचार आले नाहींत. ह्या गोष्टी रामदासांसारख्या भगवी कफनी घालून भीक मागणारांच्या आणि मावळे हेटकरी जमवून त्यांच्या काठ्यांनीं किल्ले सर करणाऱ्या शिवाजीच्या मनामध्यें आल्या !

---

## दैवाची गति विचित्र आहे ! : : ७

गेल्या शतकांत आफ्रिका खंड बेवारशी होतें. चार युरोपियनांनीं कोठेंही जावें, आपलें निशाण रोवावें व आपण तो प्रदेश आपल्या देशासाठीं जिंकला असें जाहीर करावें, असे प्रकार ठिकठिकाणीं होत होते. १८९८ सालीं आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सज्ज असलेल्या सैन्यानिशीं रानटी टोळ्यांना जिंकून इंग्लंडचें साम्राज्य वाढवीत असतांना पांच–सहा गोऱ्या लोकांनीं फॅशोडावर झेंडा लावल्याची बातमी लॉर्ड किचनेर यांना मिळाली. तावडतोब तेथें जाऊन त्यांनीं ईजिप्तचा झेंडा रोवला व ब्रिटनच्या नांवानें ग्वाही फिरवून निशाणाला तोफांची सलामी दिली. तेथें दाखल झालेल्या गोऱ्यांनीं मेजर मार्शाँ यांच्या नेतृत्वाखालीं तो मुलूख यापूर्वींच फ्रान्सच्या साम्राज्याला जोडला होता. त्याच्याबरोबर फक्त शंभर सेनेगाली शिपाई होते. दोघांच्या दंडेलीनंतर राजकारण सुरू झालें. फ्रेंचांचेपूर्वींच तो मुलूख आपण काबीज केला आहे या सबबीवर ब्रिटननें माघार घेण्याचें नाकारलें. इंग्लंडबरोबर टक्कर देण्याइतका जोर अंगीं नसल्यामुळें फ्रान्सनें पडतें घेतलें व मेजर मार्शाँला फ्रान्सचा झेंडा उखडून यूरोपला परत यावें लागलें. नंतर सूडान प्रांत इंग्लंडच्या साम्राज्यांत सामील करण्यांत आला. फॅशोडा हें खेडें नाइल नदीच्या कांठावर आहे. या प्रसंगाची आठवण राहूं नये म्हणून या गांवाला कोडोक हें नांव देण्यांत आलें.

फॅशोडा प्रकरणामध्यें इंग्लंडनें फ्रान्सची कांहीं वर्षांपूर्वी मानखंडना केली होती हें सर्वांना माहीतच आहे. त्या अपमानाबद्दल फ्रेंच लोक इंग्लिशांविरुद्ध मनामध्यें पुष्कळ दिवसपर्यंत जळत होते व त्या फॅशोडा प्रकरणाबद्दल आपल्याला

केव्हां सूड घ्यावयाला सांपडेल, याची ते डोळ्यांत तेल घालून वाट पाहत बसले होते. बरींच वर्षेंपर्यंत तशी संधि मिळाली नाहीं. परंतु १९०३ सालापासून फ्रान्सला पाहिजे तसा योग हळूहळू जुळून येत चालला. इंग्लंडनें बोअर लढाईकरितां जें जास्त सैन्य गोळा केलें होतें त्याला रजा देण्यांत आली. आणि त्यामुळें इंग्लंडचें लष्करी सामर्थ्य पुष्कळ संपुष्टांत आलें व खुद्द इंग्लंडचें संरक्षण करण्याचें काम नागरिक लोकांनीं बनविलेल्या सैन्याकडे सोंपविण्यांत आलें. इंग्लंडची स्थिति अशा रीतीनें कमकुवतपणाची हळूहळू होत चालली असतां यूरोप खंडांतील इतर देशांतूनही बऱ्याच महत्त्वाचीं स्थित्यंतरें होत चाललीं होतीं. प्रिन्स नेपोलियन हा इतके दिवसपर्यंत रशियामध्यें अज्ञातवासांत राहत होता, तो एकाएकीं प्रकट झाला, व चवथा नेपोलियन अशी पदवी धारण करून तो फ्रान्स देशाच्या गादीवर बसला व सर्व साम्राज्याचा तो बादशहा झाला. फ्रान्समध्यें या उलाढाली चालल्या असतां, जर्मनीमध्यें तर याच्याहीपेक्षां विलक्षण आणि आश्चर्यकारक गोष्टी घडून आल्या. जर्मनीचा बादशहा एके दिवशीं आपल्या कांहीं मित्रमंडीसह व्हिएन्ना येथें विमानांत बसून जाण्याकरित निघाला असतां मध्येंच एक फार मोठा अपघात झाला. इ. स. १९०५ सालच्या मार्च महिन्याची ती पहिली तारीख होती. तो भयंकर दिवस लोकांच्या स्मरणांतून कधींही नाहींसा व्हावयाचा नाहीं. जर्मन बादशहाचें विमान डॅन्यूब नदीवरून जात असतां एकाएकीं सोसाट्याचा वारा सुटला व त्या विमानांतील यंत्रें मोडून गेलीं, आणि ती विमानांतील सर्व मंडळी पुष्कळ उंचावरून डॅन्यूब नदीमध्यें पडली. नदीच्या पाण्याचा जोर अतिशय असल्यामुळें ते सर्व लोक तावडतोब खालीं वाहून गेले व त्यांचा कांहीं एक पत्ता लागला नाहीं. ते सर्व लोक बुडून मरण पावले अशी सगळ्यांची खात्री होऊन जो तो अतिशय दुःख करूं लागला. बर्लिनमध्यें ही बातमी येऊन पोंचल्यावर बादशहाचा मुलगा वयांत आलेला होता त्याला एकदम गादीवर बसविण्यांत आलें. जर्मन साम्राज्यामधील लोकांमध्येंही एक प्रकारचें स्थित्यंतर होत चाललें होतें. जर्मनी, फरान्स, आणि रशिया या तीन देशांनीं एकत्र व्हावें आणि इंग्लंडचें अलीकडे जें मोठें स्तोम माजलें आहे तें मोडून टाकावें, इंग्लंडची समुद्रावरील सर्व सत्ता नष्ट करून टाकावी, आणि इंग्लंडच्या जितक्या वसाहती आपल्या ताब्यांत घेतां येतील तितक्या घ्याव्या, अशा प्रकारची इच्छा जर्मन लोकांच्या मनांत दिवसेंदिवस

जास्त जास्त वाढत चालली होती. विमानांतून डॅन्यूब नदींत पडलेल्या केसर चुइल्यमनें आपल्या लोकांची ही इच्छा दाबून ठेवली होती. परंतु नवीन बादशहा गादीवर बसल्याबरोबर इंग्लंडच्याविरुद्ध असलेले सर्व लोक भराभर पुढें आले, व प्रधानमंडळांतील सर्व जागा त्यांनीं आपल्या हस्तगत करून घेतल्या. जुन्या बादशहाची मोठी इच्छा म्हटली म्हणजे आपलें आरमार वाढविण्याची होती, तेव्हां तें आरमार आपण अतिशय वाढवावें हेंच त्या बादशहाचें उत्तम स्मारक होय, असें सर्वांना वाटून त्यांनीं आरमाराला यत्किंचितही वादविवाद केल्याशिवाय लागेल तितका पैसा खर्च करण्याविषयीं आपली मंजुरी दिली. या गोष्टी चालू असतां जर्मन वर्तमानपत्रांनीं इंग्लिशांच्या विरुद्ध टीका करण्याचें अगदीं बंद केलें. ही एक अगदीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

फरान्समधील लोक लोकसत्तात्मक राज्याला अगदीं कंटाळून गेले होते, व प्रिन्स नेपोलियनसारखा रशियाच्या सैन्यांत लष्करी शिक्षण मिळून तयार झालेला राजा मिळाल्यामुळें त्यांना अतिशय आनंद झाला होता. शिवाय फरेंच लोकांच्या मनांत फॅशोडा येथील अपमान धुमसतच होता. इंग्लिशांना मात्र वाटत होतें कीं, आपण जसें फॅशोडाप्रकरण विसरलों आहों, त्याचप्रमाणें फरेंच लोकही तें विसरले असतील. आणि ज्यांना जय मिळतो त्यांच्या मनांत असले विचार येणें स्वाभाविकच आहे. पण ज्यांचा पराजय होतो ते ती गोष्ट तो कलंक धुऊन टाकल्याशिवाय कधींही विसरत नाहींत. त्याप्रमाणें फरेंच लोक फॅशोडाबद्दल सूड घेण्यासाठीं वाट पाहत बसलेले होते

जर्मनी आणि फरान्स या देशांतून अशा घडामोडी होत असतां इंग्लंडमधील कित्येक लोकांना असें वाटूं लागलें कीं, जर्मन लोक आपल्याविरुद्ध जातात तेव्हां आपण रशियाला अनकूळ करून घ्यावा. इकडे रशियाचीही तयारी पूर्णपणें शेवटास जाण्याला कांहीं अवकाश होता. ती तयारी निर्विघ्नपणें व्हावी म्हणून रशिया इंग्लंडपाशीं गोड गोड बोलत असे. परंतु आंतून रशियानें आपली लढाईची तयारी गुप्तपणानें चालू ठेविली होती. रशियानें आपलें आरमार वाढविलें, अफगाणिस्थानांत आपला वकील पाहिजे म्हणून बोलणें लाविलें, मध्य एशिया आणि चायना येथील आपल्या आगगाड्यांचें काम पुरें केलें, व पाण्यासारखा पैसा ओतून पर्शियामध्यें आपलें वर्चस्व स्थापित केलें. इतक्या सगळ्या गोष्टी रशियानें केल्या तरी वाह्यात्कारें रशिया इंग्लंडपाशीं

गोडच होता. फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्य मोडून तेथील गादी राजाच्या हातांत आली, व जर्मनी आणि रशिया येथें तर मूळचेच राजे होते. या तीन राजांच्या संयोगानें इंग्लिशांच्याविरुद्ध लढाईची तयारी जारीनें सुरू झाली, पण ती इतक्या रीतीनें चालली होती कीं, बाहेरून कोठें लढाईचें यत्किंचितही चिन्ह दिसत नव्हतें. इंग्लिश प्रवासी साऱ्या यूरोप खंडभर फिरत होते. पण त्यांनासुद्धां ही बातमी कळली नाहीं. एका प्रवाश्यानें एका वर्तमानपत्रांत याबद्दल कांहीं बातमी प्रसिद्ध केली होती. पण तिच्यावर इंग्लंडमध्यें कोणीही विश्वास ठेविला नाहीं. फ्रेंच सैन्य आपल्याबरोबर तोफा, बायसिकल्स वगैरे घेऊन आगबोटींत चढत आहेत वगैरे जी बातमी त्या प्रवाश्यानें प्रसिद्ध केली होती, ती इंग्लिशांना शक्यच वाटेना. इंग्लंडमध्यें पार्लमेंटपुढें प्रत्येक गोष्टीची उघडपणें वाटाघाट होण्याची वहिवाट असल्यामुळें जेथें एकएकटेच राजे मुखत्यार असतात तेथें गुप्तरीतीनें लढाईची तयारी कशी होते याची इंग्लिशांना कल्पनाही नव्हती.

असो. अशा प्रकारची परिस्थिति यूरोप खंडांत अस्तित्वांत असतांना १९०५ सालच्या प्रारंभाच्या सुमारासच अफगाणिस्थानांतील पश्चिम प्रांतामध्यें धामधुमीचीं कांहीं चिन्हें दिसूं लागलीं. हिरातचा सुभेदार रशियाला आंतून सामील आहे असा अमिराला संशय आला, परंतु त्या सुभेदाराला रशियाचें पाठबळ असल्यामुळें त्याला काढून टाकण्याची अमिराला छाती होईना. म्हणून अमीर योग्य संधीची वाट पाहत बसला होता. पुढें एकदम अशी बातमी आली कीं, हिरातच्या सुभेदारानें रशियाच्या सैन्याला हिरात शहरांत घेतलें. ही गोष्ट झाल्याबरोबर अमीर आपलें सैन्य घेऊन हिरातवर चाल करून गेला. हिरातचा प्रांत आपल्या राज्यांत सामील करून घेण्याचा रशियाचा इरादा स्पष्ट दिसून आला, व त्यासाठीं रशियाचें सैन्य चोहोंकडून जमा होऊं लागलें. परचक्रापासून आम्ही तुमचें संरक्षण करूं, असें इंग्लिश अमिराला कित्येक वर्षें आश्वासन देत गेले असल्यामुळें अमिरानें त्यांच्यापाशीं कुमक मागितली. तेव्हां बरीच भवति न भवति होऊन अखेरीस इंग्लिशांनीं रशियाशीं लढाई सुरू करण्याचा निश्चय केला. हिंदुस्थानांतील सैन्याची तयारी झाली. एक तुकडी हिरातवर पाठविण्याचा निश्चय ठरला व बाकी राहिलेलें सैन्य हिंदुस्थानच्या सरहद्दीवर रशियन शिपायांना प्रतिबंध करण्याकरितां उभें राहिलें. रशियाचें आणखी एक सैन्य हिंदुकुश पर्वताकडील अफगाणिस्थानांतील उत्तर प्रदेशांत

उतरलें होतें, व पामीरमधून रशियन शिपाई चित्राळवर उतरतात कीं काय, अशी क्षणोक्षणीं भीति वाटत होती. अशी स्थिति येऊन पोंहोचली तरी विलायत सरकार मागेंपुढें पाहत होतें. अमीर एकटाच पुढें चाल करून गेला. त्याचा रशियन शिपायांनीं पराभव केल्यामुळें सर्व अफगाणिस्थानांत अंदाधुंदी माजून राहिली. रशियानें अफगाणिस्थानांत येऊन तळ दिल्यामुळें काबुली लोकांच्या मनाची पुष्कळच चलविचल उडून गेली. व या सगळ्या संकटाचा परिहार करण्याकरितां अमीर रशियाला खात्रीनें शरण जातो अशी सर्वांना भीति पडली. तरी पण अफगाणिस्थानांत आपण जावें किंवा नाहीं याच्याबद्दल विलायत सरकारनें असें कळविलें कीं, आमच्या सरहद्दीचें संरक्षण करण्याकरितां पुरेसें सैन्य आमच्यापाशीं आहे, परंतु अफगाणिस्थानांत पाठविण्याला सैन्य व ऑफिसर लोकांचा तर फारच तोटा आहे. अशी ब्रिटिश साम्राज्याची लढाईसाठीं धांदल उडून गेली असतां रशियन लोकांनीं हिरातमधील सैन्य वाढविण्याचा एकसारखा सपाटा चालविला होता व इराणच्या बाजूनें धान्याचा वगैरे पुरवठा करण्यांत येत होता. युरोपियन इतिहासामध्यें सिबॅस्टोपॉलचा वेढा जो प्रख्यात आहे, तशाच प्रकारचा प्रसंग अफगाणिस्थानामध्यें येऊन बेतला. चोहोंकडे शांतता असतां एकाएकीं रशियानें स्वारी केली हें बरोबर नाहीं, असें इंग्लिश लोक म्हणूं लागले. त्यावर रशियन सरकारनेंही जाहीरनामे काढून आपलें म्हणणें प्रसिद्ध केलें, व खुद्द इंग्लंडनें अशा रीतीनें एकाएकीं लढाया सुरू केल्याचीं उदाहरणें दाखवून दिलीं. ह्या उपायांनीं रशिया ऐकेना, तेव्हां काळ्या समुद्रांतील रशियाच्या गलबतांना तेथल्या तेथें अडकवून ठेवावें असें कोणी सुचविलें. परंतु टर्की आणि जर्मनी हे इंग्लंडला आपलीं जहाजें डार्डनेलिसकडे नेऊं देईनात, तेव्हां उत्तरेकडून बाल्टिक समुद्रांतील रशियाचीं गलबतें अडवून ठेवण्याचा इंग्लिशांनीं विचार केला. परंतु ह्या वेळीं इंग्लडपाशीं फारसें मोठें आरमार राहिलेलें नव्हतें. खर्च कमी करण्याच्या नादीं लागून इंग्लिशांनीं गेल्या दोन तीन सालांत आपलें आरमार पुष्कळ कमी केलें होतें; व रशियानें हिरातवर केलेल्या स्वारीला प्रतिबंध करण्यासाठीं सुवेझच्या कालव्याच्या वाटेनें कांहीं गलबतें हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलीं होतीं. काहीं आरमार भूमध्य समुद्रांत होतें; आणि बाकीचें उत्तरेकडे बाल्टिक समुद्राच्या तोंडाशीं पाठविण्यांत आलें. रशियन गलबतांचा कोंडमारा करण्यासाठीं बाल्टिक समुद्रामध्यें

इंग्लिश आरमार गेलें होतें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. रशियाचीं गलबतें काळ्या समुद्रांत बिनहरकत जात येत होतीं. तीं आपला माल फरेंच आणि जर्मन लोकांना विकीत. आणि ते लोक तो माल आपल्या गलबतांत भरून पाठवीत. आणि फरेंच व जर्मन ह्या लोकांशीं लढाई नसल्यामुळें त्यांच्या गलबतांना इंग्लिशांना हरकत करतां येत नसे. इकडे रशियानें चीनच्या किनाऱ्यावरही कांहीं गडबड चालविली होती. तेव्हां तिकडे पाठविण्या-साठींही इंग्लंडला कांहीं गलबतें पाहिजे होतीं. जपानचा या लढाईमध्यें कांहीं संबंध नसल्यामुळें तिकडील मदत इंग्लिशांना मागतां येईना. अशा सर्व बाजूंनीं इंग्लंडवर अडचणी येत असतां १९०५ सालच्या जून महिन्याच्या प्रारंभीं एकाएकीं अशी बातमी आली कीं, तीन फरेंच आगबोटी दगड भरून सुवेझच्या कालव्यांतून येत असतां एकाएकीं फुटून बुडाल्या; व तेथून गलबतें जाण्यायेण्याचा रस्ता त्याच्या योगानें अगदीं बंद होऊन पडला. सुवेझचा रस्ता बंद करून टाकण्यासाठीं फरेंचांनीं मुद्दाम ही गोष्ट केली कीं काय, याबद्दल खात्रीलायक माहिती नाहीं. हा रस्ता बंद झाल्यामुळें हिंदुस्थानांत मदत घेऊन चाललेलीं जीं गलबतें भूमध्य समुद्रांत अर्ध्या वाटेवर गेलीं होतीं, तीं माघारीं बोलावून केप ऑफ गुडहोपच्या रस्त्यानें पाठविणें भाग पडलें. अशा स्थितींत खुद्द इंग्लंडच्या किनाऱ्याचें संरक्षण करण्याची तजवीज कांहीं एक नव्हती. इंग्लंडचा सर्व किनारा मोकळा आहे ही बातमी यूरोप खंडांतील प्रत्येक देशांतील गुप्त बातम्या काढणाऱ्या ऑफिसांतून माहीत होती. अशा स्थितींत एके दिवशीं जर्मनीचें आरमार आपल्या बंदरांतून बाहेर निघालें आणि स्कॉट्लंडच्या उत्तरे-कडून चाललें. यानें तर इंग्लंडमध्यें फारच गडबड उडून गेली. इतक्यांत समुद्रां-तील सर्व तारा तुटल्याबलद्दची बातमी आली. दक्षिण अफ्रिकेची तार तुटली, तेव्हां ती कांहीं कारणानें तुटली असेल असें वाटलें. परंतु पुढें असें कळून आलें कीं नॉर्थ सीमधील तार व हिंदुस्थानाकडे गलेली तार याही तुटल्या आहेत. तेव्हां हें शत्रूचेंच कृत्य असावें असें इंग्लिशांना वाटलें. व चोहोंकडून संकटाची वेळ आली असतां आपलें आरमार दूर दूर ठिकाणीं कसें पांगलें जातें, इंग्लंडचा किनारा संरक्षणावांचून कसा उघडा पडतो, सुवेझचा रस्ता थोड्या युक्तीनें कसा बंद होतो, आणि तारा तोडून टाकल्या म्हणजे विस्तीर्ण साम्राज्याचें एक लहानसें बेट एकाएकीं कसें बनून जातें, याबद्दलची कल्पना इंग्लिशांना

त्या वेळीं आली. जर्मन आरमाराचा पाठलाग करण्याकरितां कांहीं थोडें बहुत शिल्लक असलेलें इंग्लिश आरमार पाठविण्यांत आलें, त्यामुळें इंग्लिश चॅनेल अगदींच उघडा पडला. व त्या चॅनेलच्या पलीकडच्या किनाऱ्यावर फ्रेंचांचें आरमार जय्यत तयार होतें. तरी पण फ्रेंच लोक बाह्यत्कारी इंग्लिशांपाशीं अतिशय गोड गोड बोलत होतें. या सुमारास इंग्लंडशीं लढाई सुरू करण्याचा जर्मनीचा निश्चय ठरून राहिला होता. परंतु त्याला कांहीं विघ्न आलें. इंग्लंडमध्यें असलेल्या जर्मन लोकांनीं या वेळीं एक कट केला होता. वूलविच हें इंग्लिशांचें दारूगोळा ठेवण्याचें जें मुख्य ठिकाण त्या ठिकाणीं रात्रीं एक वाजतां सर्व जर्मन लोकांनीं जमून तेथील भिंतीवर शिड्या लावून चढून आंतील सामानाला आग लावून द्यावयाची, असा त्या कटांतील मंडळींचा विचार होता. परंतु पोलिसला त्याची बातमी कळल्यामुळें तो बेत फसला, व त्यामुळें जर्मनीमधील लोकांनींही आपला बेत कांहीं वेळ तहकूब केला. इतक्यांत फ्रेंच लोकांचें आरमार आपल्या जागेवरून हललें, व उत्तर समुद्राकडे त्यानें आपला रोख वळविला. इकडे इंग्लंडमध्यें पार्लमेंटची बैठक ४ ऑगस्टलाच संपून पार्लमेंट बंद झालें होतें. सर्व सभासद आपल्या गांवीं निघून गेले होते, व खुद्द प्रिन्स ऑफ वेल्स हेही एक घोड्यांचें प्रदर्शन पाहण्याकरितां लिंकनशायरमध्यें गेले होते. लॉर्ड रोझबरी हे जे फॉरिन ऑफिसचें काम त्या वेळीं पाहत होते, तेही रशियानें चालविलेल्या लढाईशिवाय दुसरें कांहीं फारसें काम नाहीं असें पाहून लंडन सोडून डालमेनी या ठिकाणीं विश्रांतीकरितां गेले होते. ते ऑगस्टच्या ५ व्या तारखेला गेले. त्याच दिवशीं फ्रेंचांचा वकील लॉर्ड रोझबरीकडे गेला होता. परंतु त्यांची भेट न झाल्यामुळें त्यानें एक खलिता लॉर्ड रोझबरीकडे ताबडतोब पाठवून देण्यासाठीं लिहून दिला. आणि तो वकील त्याच रात्रीं आपल्या सर्व मंडळीसह पॅरीसला निघून गेला. फ्रेंच वकिलानें दिलेला खलिता लॉर्ड रोजबरी यांना फारच उशीरा पोचला. त्या खलित्यांत फ्रेंचांनीं इंग्लिशांशीं कां लढाई सुरू केली आहे याचीं कारणें दर्शविण्यांत आलीं होतीं. इतकें होतें आहे न होतें आहे तोंच दुसरे दिवशीं पहाटेस स्पर्नहेडजवळ फ्रेंच सैन्य येऊन इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरलें. त्या सैन्याचें पहिलें काम तारा तोडून टाकण्याचें होतें. नंतर त्या सैन्यांतील शिपाई मोटार सायकलवर बसून चोहोंकडे निघाले व ठिक-

ठिकाणीं शस्त्रें, दारूगोळा, घोडीं वगैरे सामान ते आपल्या हस्तगत करीत चालले. त्यांनीं घोडे फरान्समधून बिलकुल आणले नव्हते. तरी इंग्लिशांच्या घोडयांनीं फरेंचांना कोणतीही उणीव भासूं दिली नाहीं. फरेंचांनीं जिकडे तिकडे तारा तोडल्या, पूल पाडले, आणि उथळ गलबतांच्या साधनानें नद्यांच्या पात्रांतून आणि कालव्यांतून त्यांनीं इंग्लंडांत प्रवेश केला. त्यांना जे जय मिळाले त्यांत विशेष महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ही होय कीं, खुद्द प्रिन्स ऑफ वेल्स हेही त्यांच्या हातीं सांपडले. या गोष्टी होईपर्यंत फरान्सचें बहुतेक सैन्य इंग्लंडच्या किनाऱ्यावर येऊन उतरलें. नंतर बऱ्याच वेळानें इंग्लिशांना वाटूं लागलें कीं, फरेंच लोक आपल्या देशावर खरोखरच स्वारी करण्याकरितां आले आहेत. असें कळल्यावर इंग्लिश लोकांनीं पुष्कळ पराकाष्ठा केली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. इंग्लिशांकडील सेनापतींच्या हाताखालील शिपाई अगदीं नवखे असल्यामुळें अखेरीस लढाईमध्यें फरेंचांनाच जय प्राप्त झाला. असाच क्रम पुढें चालला असतां तर फरेंचांनीं सर्व इंग्लंड काबीज करून घेतलें असतें. परंतु इतक्यांत बाल्टिक समुद्रामध्यें गेलेलें आरमार माघारें आलें व त्या योगानें इंग्लंडचा बचाव लागला. पुढें लवकरच सर्व राष्ट्रांमध्यें तह झाला; आणि फिरून एकदां यूरोप खंडामध्यें सर्वत्र शांतता नांदूं लागली.

ही हकीकत सर टामस हालवे यांनीं मागील गोष्टी आठवून आठवून एकत्र करून लिहिलेली आहे. इंग्लंडनें आपलें सैन्य आणि आरमार यांजवरील खर्च कमी केल्याचे परिणाम, फरान्स, जर्मनी, रशिया येथील लोकांच्या मनांमध्यें इंग्लिशां-विषयीं बाणलेला द्वेषाचा परिणाम, सुएझचा कालवा, आर्मी कोअर्स, आर-मारें, मिलिशिया, समुद्रांतील केबल्स आणि जमिनीवरील तारा वगैरे क्षणभंगुर साधनांवर बांधलेल्या मोठमोठया आशांचें निष्फलत्व, अतिशय मोठया दिस-णाऱ्या फापटपसाऱ्याची क्षणभंगुरता वगैरे अनेक गोष्टी वरील हकीकतीवरून इंग्लिशांखेरीज कोणाच्याही मनामध्यें चांगल्या रीतीनें ठसल्यावांचून राहणार नाहींत.

---

## स्वयंवर व संकुल युद्ध : : ८

कोकिळाबाई दिसण्यांत अगदीं कोंवळ्या आणि तरुण दिसत असत, तर पण त्यांचें वय चाळीशीच्या जवळ जवळ आलेलें होतें. त्यांना वैधव्य आल्याला आठ दहा वर्षें झालीं होतीं, तरी पण त्या बहुतेक बाबतींत अगदीं एखाद्या सवाष्ण बायकोप्रमाणें दिसत असत आणि वागतही असत. त्या फार पापभीरु होत्या, व हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें आपण नेहमीं आपलें आचरण ठेवावें अशी त्यांची फार इच्छा असे. त्यांचे विचार नेहमीं हिंदुधर्मशास्त्रामध्यें घोटाळत असत. कांहीं करावयाचें झालें तरी तें हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें करावयाचें अशी आपली संवय त्यांच्या मनाला लागूनच गेलेली होती. फार काय, त्यांच्या मनांतून पुनर्विवाह करावयाचा होता, परंतु तोसुद्धां हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें सशास्त्र होतो किंवा नाहीं, याची यांच्या मनाला शंका वाटत होती. परंतु कोणी एका सद्गृहस्थानें कोकिळाबाईंना असें सांगितलें कीं, पुनर्विवाह सशास्त्र आहे किंवा अशास्त्र आहे याच्याबद्दल शंकराचार्यांच्या नजरेखालीं पूर्वी एकदां वादविवाद झाला होता, त्यांत पंच नेमण्यांत आले होते, व त्यांच्या बहुमतानें जें निश्चित होईल त्याप्रमाणें करावें असें ठरलें होतें. त्या पंचांपैकीं सहाजण पुनर्विवाहाला विरुद्ध होते तरी पण बाकी चौघेजण पुनर्विवाह सशास्त्र आहे असेंच म्हणत होतें. ही हकीकत ऐकून आणि पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेबद्दलचें हें दांडगें प्रमाण लक्षांत आणून पुनर्विवाह सशास्त्रच असला पाहिजे, अशी कोकिळाबाईंच्या मनाची खात्री झाली; व पुनर्विवाह करण्यांत आपण आपल्या धर्माच्याविरुद्ध जात नाहीं असें समजून त्यांनीं एके दिवशीं आपला पुनर्विवाह करून घेण्याचा निश्चय कायम केला.

आपल्यांतील सगळ्या वेदकालीन आणि पुराणकालीन चाली अमलांत आणाव्या ही कोकिळाबाईंची फार मोठी महत्त्वाकांक्षा. त्यामुळें पुनर्विवाहाबरो-

राज्यरूपी समुद्रावर भीतीनें डोळे मिटवून टाकणारी अशी जी लाट इतके दिवस उसळत होती व अजूनहि उसळत आहे, ती लाट कोणती म्हणाल, तर ती Imperialism ( राज्यविस्तारा ) ची होय. पाण्याची लाट पाहून आतां ही आपल्या गलबताला गिळून टाकते कीं काय, अशी ज्याप्रमाणें एखाद्याला भीति वाटते, त्याप्रमाणेंच ही Imperialism (राज्यविस्तारा) ची लाट आपल्या देशाला आणि त्याच्या स्वातंत्र्याला खाऊन टाकते कीं काय, अशी भीति कोणत्या लहान देशांना वाटली नाहीं ? पृथ्वीच्या पाठीवर असें कोणतें लहान संस्थान किंवा दुर्बल देश आहे, कीं ज्याला ही Imperialism (राज्यविस्तारा) ची लाट आपल्याला आपल्या पोटांत सामील करून घेणार नाहीं अशी खात्री होती? सर्वांना या लाटेची भीति वाटत होती आणि ती भीति निराधार होती असें नाहीं. कारण, या लाटेनें अनेक लहान लहान पण स्वतंत्र अशा संस्थानांचे, देशांचे, बेटांचे आणि राज्यांचे बळी घेतलेले आहेत. फ्रान्सच्या किनाऱ्यावरून जी लाट निघाली तिनें पाँडेचरी, चंद्रनगर, कोचीन-चायना, टाँकिंग, अनाम कँबोडिया, अलजीरिया, माडागास्कर, सेने-गाल, टर्यूनिस वगैरे अनेक ठिकाणें आपल्या पोटांत सांठवून ठेविलीं. रशियामधून जी लाट निघाली, तिनें पोलंड, फिन्लंड, बोखारा, खिवा, मँचूरिया, पोर्ट आर्थर, वगैरे अनेक ठिकाणें गिळून टाकलीं. त्याचप्रमाणें जर्मनीच्या किनाऱ्यावरून निघालेल्या लाटेनें टोगोलँड, कामेरून, जर्मन आफ्रिका, कौचू वगैरे ठिकाणें भक्षून आपली भूक शांत केली. पण ह्या सगळ्यांहूनहि अतिशय उंच अशी Imperialism (राज्य-विस्तारा) ची लाट इंग्लंडच्या बंदरामधून निघाली. ही लाट फारच भयंकर ! बाकीच्या लाटांनीं जमिनीचे भाग व्यापले, पण ह्या लाटेनें—समुद्रांपैकीं एक अंशभूत अशा या लाटेनें—प्रत्यक्ष समुद्रच व्यापून टाकले आहेत. ह्या लाटेनें हिंदी महासागर व्यापला आहे, पॅसिफिक महासागर व्यापला आहे आणि अटलांटिक महासागर व्यापला आहे. आणि ही लाट इतकी उंच उसळली कीं, साऱ्या जगामध्यें अतिशय उंच असा जो हिमालयपर्वत त्याच्या देखील डोक्यावरून ह्या लाटेचें पाणी गेलेलें आहे. असली ही भयंकर आणि प्रचंड लाट दुभंग करून ती फोडून, तिच्यामधून पोहून पलीकडे जाण्याचा धीर लोकांनी नुकताच प्रयत्न केला होता.

पण तो फसला. ती लाट फोडून तिच्यामधून पलीकडे पोहत जाऊं इच्छिणारांची या लाटेनें अगदीं वाताहात करून टाकली आहे. सहस्रावधि पोहणारांना हिनें ठार बुडवून टाकलें आहे. कांहीं लोकांचे गळे अजून पाण्याच्या पृष्ठभागावर दिसत आहेत, पण त्यांनासुद्धां ही लाट थोड्याच वेळांत खालीं दडपून टाकणार, हें खास. इतके हिम्मतवान पोहणारे शूर तर खरेच. पण बिचाऱ्यांचा ह्या प्रचंड लाटेपुढें काय निभाव लागणार ? जिब्राल्टर, माल्टा, एडन, बोर्नियो, सीलोन, सायप्रस, हाँकांग, हिंदुस्थान, वेहवे, मॉरिशस, नेटल, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टॅसमॅनिया इत्यादिकांना जिनें बुडविलें, त्या लाटेला ट्रान्सवालला बुडविणें कठीण आहे काय ? व ट्रान्सवालला बुडविण्याचें काम संपवून ही लाट हल्लीं चीन देशाकडे वळून पेकिनच्या राजवाड्यापर्यंत येऊन थडकली आहे. त्यामुळें या लाटेच्या भक्ष्यस्थानामध्यें आपणहि सामील होतों कीं काय, अशी पिवळ्या समुद्राला आणि त्याच्या कांठच्या पिवळ्या लोकांना चिंता उत्पन्न झालेली आहे. अशा प्रकारची ही Imperialism ( राज्यविस्तारा ) ची लाट चोहोंकडे पसरली आहे व पसरत आहे.

पण ही एक लाट झाली. व एका लाटेच्या विरुद्ध दुसरी लाट उत्पन्न होत असते, असा लाटांचा स्वाभाविक नियम आहे. त्याप्रमाणें ह्या राज्य-रूपी समुद्राच्या पृष्ठभागावरहि Imperialism ( राज्यविस्तारा ) च्या लाटेच्या विरुद्ध दुसरी एक लाट हळू हळू उत्पन्न होत आहे, असें जो कोणी सूक्ष्म रीतीनें सद्यःस्थितीचें पर्यालोचन करील, त्याला आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. ह्या लाटेच्या प्रादुर्भावाला नुकती सुरुवात होत आहे. ह्या लाटेचें प्राथमिक उन्नतत्व अजून इतकें कांहीं लहान आहे कीं, त्यामधून लवकरच एक मोठी प्रचंड लाट उसळणार आहे, हें कोणालाहि इतक्यांतच विश्वसनीय वाटावयाचें नाहीं. आणि या लहानशा प्राथमिक उन्नतत्वामधून आपला भावी—आणि आपण प्रचंड तर आपल्यापेक्षां प्रचंडतर असा आपला—शत्रु उत्पन्न होणार आहे, असें Imperialism ( राज्यविस्तारा ) च्या लाटेला इतक्यांत कधींहि खरें वाटणार नाहीं. पण तें तिला खरें वाटो किंवा न वाटो. प्राथमिक उन्नतत्वाचीं स्पष्ट चिन्हें तेथें आहेत. तेथें सूक्ष्म असा उच्चभाव उत्पन्न झालेला आहे, व तो हळूहळू

तर तूं याच्याशीं रममाण हो. कारण, मी अतिशय मोठा सुधारक आहे असें वाटून हा अतिशय बहकून जाऊन भलभलतेच करूं लागल्या कारणानें याच्या आईबापांनीं आपल्या कुटुंबांतून याला बाहेर हांकलून लाविला असल्यामुळें हा हल्लीं एका मिशनऱ्यांच्या पागेंत एकटाच राहत आहे. असला नवरा मिळणें फार दुर्घट आहे. तरी पण ‘ भिन्नरुचिर्हि लोकः ’ या न्यायानें जर तुला हा आवडत नसेल, तर हा पलीकडे एक नवरा मुलगा बसला आहे तो पहा. याच्याशीं लग्न केलें असतां तुझी मोठमोठ्या साहेब लोकांत ओळख होण्याचा फार संभव आहे. कारण हा तुझा भावी नवरा चाकरी मागण्यासाठीं ज्याच्या बंगल्यावर गेला नाहीं असा एकही साहेब आपल्या या देशांत नसेल. अथवा या दुसऱ्या सुधारकाशीं जर तूं लग्न लावशील तर त्यापासूनही तुझें अनंत कल्याण होणार आहे. हा मोठा शूर आहे व बैल ज्याप्रमाणें आपल्या पायांखालीं चिखल तुडवितात त्याप्रमाणें यानें हिंदुस्थानांतील सर्व जुन्या चालीरीति आपल्या पायांखालीं तुडवून टाकल्या आहेत. कारण, हा त्यांच्याप्रमाणें कधीं वागत नाहीं. अथवा तुला देवाची पूजा करणें, देवाला जाणें, देवाला नमस्कार करणें, वगैरे गोष्टींचा कंटाळा आला असेल तर तूं त्या पलीकडच्या महासुधारकाच्या गळ्यामध्यें माळ घाल. कारण, तो प्रार्थनासमाजी आहे. किंवा हा नास्तिक असेल अशी तुला भीति वाटत असली तर तूं याला वरूं नको. त्याच्या शेजारी बसलेला तुला पसंत पडेल असें मला वाटतें. कारण, तो पक्का आस्तिक आहे. कां कीं त्यानें एक नवीन युक्ति शोधून काढिली आहे. ती अशी कीं, सुधारणेची एकच बाब हातीं घ्यावयाची, व बाकीच्या सर्व बाबतींत अगदीं धर्माभिमानी लोकांप्रमाणें वागावयाचें, असा यानें अलीकडे आव घातला आहे. आतां कोकिळे, या दिवसांमध्यें प्रत्येकानें थोडीबहुत सुधारणा आपआपल्या शक्तीप्रमाणें केली पाहिजे. तेव्हां तुला जर जातिभेदांचें बंड मोडण्याची सुधारणा करावयाची असेल, तर तूं त्या पलीकडच्या रांगेंतील खुर्च्यांवर बसलेल्या नवरदेवांना वर. कारण त्यांतील कोणी गुजराथी आहेत, कोणी तेलंगी आहेत, कोणी परभू आहेत, कोणी कमअस्सल आहेत, कोणी नेटिव ख्रिस्चन आहेत, आणि कोणी ब्राह्मण आहेत. पण हेही तुझ्या मनास येत आहेत असें दिसत नाहीं. तेव्हां पुढें चल. तुला दुसऱ्या तऱ्हेचे सुधारक दाखवितें. तुला कदाचित् समाजाची भीति वाटत असेल; आणि आपण एखादा सुधारक नवरा वरिला, आणि त्यानें बोलल्याप्रमाणें कृति

केली तर त्यामुळें आपला समाज विरुद्ध होऊन आपलें विनाकारण नुकसान होईल, अशी जर तुला शंका वाटत असेल, तर मी सांगतें या सुधारकाला तूं बेलाशक वर. कारण, हा सुधारक लागोपाठ आज तेरा वर्षें सामाजिक परिषदे-मध्यें निरनिराळ्या विषयांवर बोलत आलेला आहे. पण यानें सुधारणेची अमुक एक गोष्ट केली, असा आळ धर्माभिमानी लोकसुद्धां याच्यावर घालण्याला धज-णार नाहींत. तेव्हां इतका बोलका सुधारक नवरा तुला दुसऱ्या कोठेंही मिळा-वयाचा नाहीं. वास्तविक पाहिलें असतां सुधारकांच्या अंगांतला हा गुण कांहीं हलका नव्हे. तरी पण तो नवरा मुलगा कोकिळेला नाहीं आवडला झालें! तेव्हां कामंदकी दोन खुर्च्या पुढें सरून फिरून कोकिळेला म्हणाली—तुला हिमालय पर्वतावर चढणारा नवरा पाहिजे असेल तर याला वर, हिंदुसमाजाला धरणीकंपाचे धक्के देणारा नवरा पाहिजे असेल तर त्याला वर, सबगोलंकार करणारा पाहिजे असेल तर त्याला वर, ज्याच्या अंगावर वज्रासारख्या अस्त्रांचे प्रहार केले तरी लागावयाचे नाहींत असा नवरा पाहिजे असल्यास त्याला वर. अशा रीतीनें तिनें कोकिळेला अनेक नवरे दाखविले; परंतु त्यांपैकीं तिला फारसे कोणी पसंत पडले नाहींत; व मला यांपैकीं स्वयंवरणाला कोणीही एक पसंत पडत नाहींत, असें तिनें अखेरीस आपलें मत सर्वांना जाहीर रीतीनें कळविलें तेव्हां सर्वांना अतिशय दुःख झालें. प्रत्येकाचीं मनापासून इतकीं वर्णनें केलीं तीं सर्व फुकट गेलीं म्हणून कामंदकीलाही वाईट वाटलें, व छप्पन देशचे जे नवरे मुलगे आपल्या पदरच्या खर्चानें या स्वयंवराकरितां आले होते, त्यांना अगदीं वेड्यासारखें होऊन गेलें. व आतां आपल्या गांवच्या लोकांनीं पुनर्विवाहाची बायको कोठें आहे म्हणून विचारलें तर त्यांना काय सांगावें अशी त्यांना मोठी पंचाईत पडली व त्यामुळें ते अगदीं चवताळून गेले. आपण इतकी सुधारणा करीत असतां, आणि आपण इतके मोठे सुधारक झालों असतां अजूनही आपल्याला बायका पसंत करीत नाहींत, म्हणजे आम्ही आतां याच्यापलीकडे सुधारणा तरी करावयाची कशी? असे विचार मनांत येऊन त्यांतील शूर होते ते कोकिळाबाईच्या अंगावर धावून गेले, आणि आपण पुढें जाण्यासाठीं दुसऱ्यांना मागें ढकलीत ढकलीत त्या नवरदेवांनीं कोकिळाबाईच्या अंगावर अतिशय गर्दी केली व तिला उद्देशून अनेकजण अनेक बोलूं लागले—आम्ही इतक्या खटपटी करतों तरी आमच्यापैकीं कोणीच तुमच्या मनास येत

## हिंदुस्थानची गरिबी नाहींशी करण्यासाठीं चार उपयुक्त सूचना : : १.

हिंदुस्थान देश दिवसेंदिवस अधिक भिकार होत चालला आहे. पूर्वीं हिंदुस्थान देश अतिशय संपन्न म्हणून चोहोंकडे ख्याति होती; व प्रत्येक गिधाडाला आपण हिंदुस्थानावर जाऊन चोंच मारावी अशी महत्त्वाकांक्षा वाटत होती. परंतु हल्लीं हिंदुस्थानचे ते दिवस जाऊन हिंदुस्थान हा एक अतिशय भिकार देश असा याचा डंका सर्व जगभर वाजून राहिला आहे; व आतां या देशाकडे येण्यासाठीं आपल्या पंखांना श्रम द्यावे असें अतिशय भिकार गिधाडांच्याही मनामध्यें येईनासें झालें आहे. येथील लोक म्हणजे अर्थात् मूळचे रहिवाशी नेटिव लोक, इंग्रज लोक नव्हेत, कंगाल होत चालले आहेत. आणि चांगल्या सुबत्तेच्या दिवसांमध्येंही कित्येक गरीब लोक उपाशी मरतात, आणि त्यांतून दुष्काळाचे दिवस आले तर मग विचारावयालच नको, लक्षावधि लोक उपासमारीनें मृत्युमुखांत पडतात. अशी हिंदुस्थानची स्थिति होत चाललेली फक्त नेटिवानांच कळते असें नाहीं. इंग्लिशांच्याही ती लक्षांत येते. व खासगी रीतीनें बोलत असतां हिंदुस्थानची अशी अशी स्थिति झाली आहे असें ते कबूलही करतात. व या स्थितीला कांहीं तरी आळा घालण्यासाठीं त्यांच्यांतील विचारी आणि दूरदृष्टि लोकांचे विचार आणि प्रयत्नही नेहमीं कांहीं तरी सुरू आहेत. एकदां कांहीं साहेब लोक याच हिंदुस्थानच्या गरिबीबद्दल आणि उपासमारीबद्दल विचार करीत बसले असतां, एकाच्या मनांत पुढील कल्पना आली, तेव्हां ती त्यानें आपल्या बाकीच्या मित्रमंडळींना आणि सल्लामसलतगारांना सांगितली. ती त्यांना पसंत पडली व तिची उपयुक्तता त्या मंडळींना इतकी कांहीं भासली कीं, त्यांनीं ती आपल्या गोऱ्या रंगाच्या

सर्व्हिसमधील लोकांचे हुद्दे म्हटले म्हणजे लेफ्टेनेन्ट, कर्नल, ॲडजूटन्ट जनरल, स्टाफ ऑफिसर, कमांडर वगैरे असतात. इंडियन मेडिकल सर्व्हिसमधील लोकांपैकींहि कोणी असिस्टंट सर्जन, कोणी सर्जन, कोणी केमिकल ॲनॅलायझर, कोणी सॅनिटरी कमिशनर, असे मोठमोठे अधिकारी असतात. ह्या खात्यांतून जसे मोठमोठ्या दर्जाचे, हुद्याचे आणि अधिकाराचे लोक असतात, त्याचप्रमाणें इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्येंहि असतात. सिव्हिल सर्व्हिस म्हणजे मुलकी खातें होय. मिलिटरी सर्व्हिस म्हणजे लष्करी खातें होय, आणि मेडिकल सर्व्हिस म्हणजे वैद्यकीचें खातें होय. त्याचप्रमाणें डोमेस्टिक सर्व्हिस म्हणजे घरगुती कामाचें खातें होय. डोमेस्टिक Domestic हा इंग्रजी शब्द आहे. व त्याचा अर्थ 'गृहकृत्यासंबंधीं' असा आहे. त्यामुळें डोमेस्टिक सर्व्हिस ह्या खात्यामध्यें सैंपाक करणें, कपडे धुणें, मुलांना खेळविणें, घोड्यांचा खरारा करणें, गाडी हांकणें, केर काढणें, दिवाबत्ती करणें वगैरे बारीक सारीक अशा अनेक गोष्टींचा समावेश होतो. ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसच्या खात्यांत जितक्या पोट बाबींचा अंतर्भाव होतो, तितक्या बाबींचा अंतर्भाव दुसऱ्या कोणत्याहि खात्यांत होत नाहीं. इतर खात्यांप्रमाणें ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्येंहि मोठमोठ्या हुद्याच्या जागा आहेत, म्हणून वर सांगितलेंच आहे. त्यांतील मुख्य हुद्यांवरील लोक म्हटले म्हणजे बटलर, बबर्जी, साइस (घोडेवाला), कोचमन, भिस्ती, माळी, झाडू, पट्टेवाला, आया वगैरे होत. ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचे महत्त्व कोणी कदाचित् कमी समजेल; पण बारीक दृष्टीनें विचार करून पाहिला असतां इंडियन सिव्हिल सर्व्हिस, मिलिटरी सर्व्हिस, मेडिकल वगैरे सर्व्हिसेसचें (खात्यांचें) जितकें महत्त्व आहे, तितकेंच ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचें महत्त्व आहे, हें लक्षांत आल्यावांचून राहाणार नाहीं. हिंदुस्थान देशांत बाकीच्या तीन सर्व्हिसेसची जितकी आवश्यकता आहे, त्याच्यापेक्षां रतीभर जास्त अवश्यकता हिंदुस्थानाला ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसची आहे, असें म्हटल्यास गैरवाजवी होणार नाहीं. कारण इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस हें हिंदुस्थानांतील सर्व साहेबलोकांचें प्रत्यक्ष कामिसरिएट खातेंच आहे. साहेब कोणत्याहि खात्यांत असो; त्याचें जर डोमेस्टिक सर्व्हिसचें खातें बरोबर नसेल, तर त्याच्या हातून आपल्या खात्याचें काम कधींहि

बरोबर व्हावयाचें नाहीं. सिव्हिल सर्व्हिसमधील कलेक्टरसाहेब जमाबंदी-साठीं फिरावयास जावो; मिलिटरी सर्व्हिसमधील कमांडर साहेब शत्रूंशीं लढाई करावयास जावो; किंवा मेडिकल सर्व्हिसमधील डॉक्टर साहेब जखमी लोकांच्या जखमा बाधावयास जावो; इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमधील लोक त्यांच्या बरोबर पाहिजेत; एरवीं त्याला आपलें काम कधींहि चांगलें करतां यावयाचें नाहीं. ह्यावरून ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचा इंडियाच्या हिताहिताशीं किती जवळचा संबंध आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल.

ह्या डोमेस्टिक सर्व्हिसचें महत्त्व किती आहे, हें आतां सांगितलेंच आहे. पण ह्या सर्व्हिसमध्यें एक विशेष आहे तो हा कीं, बाकीच्या सर्व्हिसेसपेक्षां ह्या डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें चाकरी मिळविण्याची पात्रता अंगीं येण्याला फारसे श्रम करावे लागत नाहींत. सिव्हिल सर्व्हिस, मिलिटरी सर्व्हिस वगैरे खात्यांतून चाकऱ्या मिळण्याला फार परिश्रम करावे लागतात. लहानपणापासून हाडांचीं काडें करावीं लागतात. शाळेंतील शिक्षण पुरें झालें नाहीं तोंच कॉलेजामध्यें जावें लागतें. परीक्षापाठीमागून परीक्षा द्याव्या लागतात, व अतोनात पैसा खर्च करावा लागतो. पण इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें चाकरी मिळण्याला असें कांहींच करावें लागत नाहीं. ह्या सर्व्हिसमधील शिक्षण देणाऱ्या अशा शाळा किंवा कॉलेजें कोठेंच नसतात. ह्या सर्व्हिसमध्यें असलेल्या लोकांचा हा वंशपरंपरेनें चालत आलेला धंदा असतो. बापाला ह्या खात्यांत चाकरी असली तर तो आपला मुलगा सात आठ वर्षांचा झाला, म्हणजे त्याला उगीच साहेबांच्या बंगल्यावर साहेबांला सलाम करण्याकरितां नेत असतो, व तो जसजसा मोठा होत जाईल तसतशी त्याजकडून बिनपगारी उमेदवारी करवून, त्याला तो बहुतेक कामांत तरबेज करतो. सारांश, साहेबांचा बंगला ही त्यांची शाळा व हेंच त्यांचें कॉलेज; आणि तेथील नोकर लोक हेच इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस-मधील परीक्षेसंबंधाचें आपल्या मुलांना शिक्षण देणारे प्रोफेसर. इतक्या अगत्यानें असें घरगुती शिक्षण मिळाल्यावर मग काय कमी आहे? शिक्षण अनायासें प्राप्त होतें व त्यासाठीं एक कवडीहि खर्च करावी लागत नाहीं. ह्यामुळें पुष्कळ लोकांची ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमधें शिरण्याचा कल फार असतो.

वरिष्ठ वर्गामध्यें बहुतेकांच्यापुढें ठेविली. आणि ती कल्पना ज्यांच्या ज्यांच्यापुढें गेली त्यांच्या त्यांच्याकडून ती पसंत होऊनच आली. त्या कल्पनेच्य उत्पादक साहेबांनीं ती कल्पना दोन चार तत्त्वांच्या आधारावर उभारलेली होती. हिंदुस्थान गरीब होत चाललें आहे, हा प्रश्न त्या साहेबानें घेतला, आणि हा हिंदुस्थानावरील गरीबीचा आळ जाण्याकरितां काय केलें पाहिजे या विचाराला ते लागले. अर्थात् गरीब देशाला श्रीमंत करावयाचें, म्हणजे श्रीमंत देशामध्यें गरीब देशापेक्षां जास्त काय असतें हें पाहण्याकडे ते साहेब प्रथमतः वळले. त्यांनीं इंग्लंड, फरान्स, जर्मनी, अमेरिका हे देश हिंदुस्थानच्याजवळ आणून मांडले, आणि त्या सर्वांची तुलना करण्याला सुरवात केली. त्या तुलनेमध्यें त्यांना असें आढळून आलें कीं, इंग्लंड वगैरे जे श्रीमंत देश आहेत त्यांच्यामध्यें त्या देशांच्या क्षेत्रफळाच्या मानानें लॅंड रेव्हिन्यूचें उत्पन्न पुष्कळ जास्त आहे. ही खुबी त्यांच्या लक्षांत आल्याबरोबर आणि हिंदुस्थानच्या जमीनमहसुलाच्या पद्धतींतील हा दोष त्यांच्या नजरेस आल्याबरोबर त्यांनीं पहिला सिद्धान्त ठरविला तो असा कीं, हिंदुस्थानाला जर इंग्लंड वगैरे देशांइतके श्रीमंत दिसावयाला पाहिजे असेल, तर हिंदुस्थान देशानें ब्रिटिश सरकारला त्या मानानें शेतसारा पुष्कळ जास्त दिला पाहिजे. आतां हिंदुस्थानांतील लोक तक्रारी आहेत, आणि त्यांना आपला हिंदुस्थान देश श्रीमंत मात्र व्हावयाला पाहिजे आहे, परंतु त्या श्रीमंतीच्या इतमामाला शोभेल असा शेतसारा त्यांना द्यावयाला नको, ही नेटिव लोकांची खोड सदर साहेबांना चांगली माहीत होती तरी पण कोणत्याही गोष्टीचा फायदा करून तो नेटिवांपुढें मांडला म्हणजे ती गोष्ट नेटिवांना शिरसावंद्य होते हाही त्यांच्या स्वभावांतील सद्गुण साहेबांना माहीत होता. आणि एकदम घेण्यापेक्षां कोणाहीपासून हळूहळू थोडेंथोडें घेतलें असतां तो तें सुखासमाधानानें देतो हा मनुष्यस्वभाव लक्षांत आणून साहेबांनीं पहिली सूचना अशी लिहिली कीं, हल्लीं तीस वर्षांनीं जमिनीचा शेतसारा वाढविण्याची सरकारनें जी पद्धत ठेविली आहे तीच कायम ठेवावी. ज्या जमिनीवर देशवाईमध्यें दहा रुपये शेतसारा दिला जात होता, त्याच जमिनीवर इंग्रज सरकारनें एकदमच शंभर रुपये वाढविले असते तर ते लोकांना फार जड वाटलें असतें. पण प्रत्येक तीस वर्षांनीं पन्नास पन्नास रुपये याप्रमाणें सरकार वाढवीत गेलें तर तिसऱ्या रिव्हिजन सर्व्हेमध्यें सरकारचे

दीडशें रुपये होऊन शिवाय त्या देशाच्या मालकाला आपली जमीन उत्तरोत्तर जास्त कसदार आणि जास्त उत्पन्नाची होत चालली आहे असें समाधान वाटून तो जास्त संतुष्ट होईल हा एक फायदा होईल तो निराळाच. हप्त्याहप्त्यानें रिव्हि-जन सर्व्हे करून त्या योगानें देशाची जमाबंदी वाढली असतां, देश कितीही भिकार झाला असला तरी तो हं हं म्हणतां श्रीमंत होईल. काँग्रेसवाले लोक कायमचा शेतसारा सर्व हिंदुस्थानावर असावा असें म्हणत आहेत. पण अज्ञानी बिचारे ! देश कशानें श्रीमंत दिसतो, याची बापड्यांना मुळींच कल्पना नाहीं. काँग्रेसची ही कल्पना सरकारनें मुळींच ऐकूं नये. उलट हल्लीं तीस वर्षांनीं जी रिव्हिजन सर्व्हे केली जाते ती पाहिजे असल्यास सरकारनें पंधरा वर्षांनीं, इतकेंच नव्हे दहा वर्षांनीं केल्यास हरकत नाहीं. कारण तितक्या जलद हिंदुस्थान श्रीमंत दिसूं लागेल. देशाची श्रीमंती श्रीमंती म्हणजे काय ? ज्या देशांतील शेतसारा पुष्कळ तो देश श्रीमंत ! हें तत्त्व लक्षांत बाळगून इंग्रज सरकार हल्लीं शेतसारा वाढवीतच आहे, पण तो त्यांनीं याच्याहीपेक्षां जास्त झपाट्यानें वाढविला पाहिजे. कारण हिंदुस्थान देशाला झपाट्यानें श्रीमंत करणें हें त्यांचें पहिलें कर्तव्यकर्म आहे.

हिंदुस्थान देशाच्या श्रीमंतीसंबंधानें सदर साहेबांनीं आणखीही कित्येक तत्त्वें सुचविलीं आहेत. हिंदुस्थान श्रीमंत आहे व जास्त श्रीमंत होत चाललें आहे, असें जगाला दाखवावयाचें असेल तर हिंदुस्थानानें सदर साहेबांच्या मताप्रमाणें दुसरीही एक गोष्ट केली पाहिजे. जगांत इंग्लंड, अमेरिका, वगैरे जीं श्रीमंत राष्ट्रें म्हणून नांवाजलेलीं आहेत, तेथील कामगारांना जो पगार मिळतो त्याच्यापेक्षां जास्त मोठमोठाले पगार हिंदुस्थान देशानें आपल्यावर राज्य करणाऱ्या अधिकाऱ्यांना द्यावे, म्हणजे हिंदुस्थानच्या श्रीमंतीची सहजच खात्री होईल. हिंदुस्थानला जर युनायटेड स्टेट्सपेक्षां पांचपटीनें अधिक श्रीमंत व्हावयाचें असेल तर अमेरिकन प्रेसिडेंटला जितका पगार आहे, त्याच्या पांचपट अधिक पगार हिंदुस्थाननें आपल्या व्हाइसरॉयला दिला म्हणजे झालें. इंग्लंडपेक्षां दसपट श्रीमंती हिंदुस्थानला पाहिजे असेल तर इंग्लंडच्या प्राइम मिनिस्टरपेक्षां हिंदुस्थानानें आपल्या व्हाईसरॉयला दसपट पगार दिला म्हणजे झालें. अगदीं सोपी युक्ति ! व तीही सगळी हिंदुस्थानच्याच हातांत. इतर देशांतून लोक जेथें पांच रुपये देत असतील तेथें हिंदुस्थानानें पंचवीस दिले म्हणजे मग

हिंदुस्थान गरीब आहे असें म्हणण्याची कोणाची माय व्याली आहे ! हिंदुस्थानची गरिबी घालविण्याला सर्वांत अतिशय उत्तम उपाय म्हटला म्हणजे हाच आहे. आजपर्यंतचे व्हाइसरॉय यथाशक्ति हा उपाय करीतच आले आहेत. तरी पण थोड्या मुदतींत पुष्कळ कमिशनें नेमून पोलीस कमिशनसारख्या रिपोर्टान्वयें जास्त पगाराचे जास्त युरोपियन ठेवण्याबद्दल खटपट करून कर्झनसाहेब हिंदुस्थानाला आपली श्रीमंती जगाच्या निदर्शनास आणून देण्याची जी उत्तम संधि देत आहेत ती फार वर्णनीय आहे. आणि हाच क्रम जर हिंदुस्थाननें पुढें चालविला तर थोड्याच दिवसांत हिंदुस्थान किती श्रीमंत होईल, याची कल्पनाही करतां येणें शक्य नाहीं. एकंदरींत हिंदुस्थान देश श्रीमंत करण्याविषयीं साहेबमजकुरांनीं अशा प्रकारचे कांहीं उपाय सुचविले. परंतु कोणत्याही देशांतील व्यक्ति श्रीमंत झाल्यावांचून तो सर्व देश कधींही श्रीमंत व्हावयाचा नाहीं, हें तत्त्व साहेबांना पूर्णपणें मान्य होतें. त्यामुळें या देशांतील बहुतेक व्यक्तिही कशा श्रीमंत दिसतील याविषयींसुद्धां त्यांनीं कित्येक सूचना केल्या आहेत. साहेबांचें असें म्हणणें आहे कीं, एकदर देश श्रीमंत दिसण्यासाठीं ज्याप्रमाणें शेतसारा वाढविला पाहिजे, त्याप्रमाणें निरनिराळ्या व्यक्तींना श्रीमंत करण्यासाठीं त्यांच्यावरील इनकमटॅक्स वाढविला पाहिजे. लॅन्ड रेव्हेन्यु देशाला श्रीमंत करितो, आणि इनकमटॅक्स व्यक्तींना श्रीमंत करितो. पूर्वींचे मोंगल राजे, भट राजे, हे आपली चैन चालण्यासाठीं, देश श्रीमंत करण्यासाठीं नव्हे, शेतसारा लोकांपासून पिळून घेत असत. पण देशांतील व्यक्तींना श्रीमंत करणाऱ्या या इनकमटॅक्सची त्यांना कल्पनाही नव्हती. इनकमटॅक्स हा थरमॉमीटर आहे. हा प्रत्येक मनुष्याला तो किती श्रीमंत झाला आहे, हें प्रत्येक क्षणीं दाखवीत असतो; व आपण इतकें श्रीमंत झालों आहों, याबद्दल त्या त्या व्यक्तींना समाधान वाटत असतें. शिवाय आपण यंदा इतके श्रीमंत झालों तर पुढल्या वर्षी कांहीं तरी जास्त श्रीमंत होऊं, याबद्दल त्यांना आनंद होत असतो. कारण पुढल्या वर्षी आपल्यावर कांहीं तरी जास्त इनकमटॅक्स बसेल अशी त्यांना मागील व इतरांच्या अनुभवावरून खात्री असते. हल्लीं हिंदुस्थान सरकारनें दिल्लीदरबारच्या वेळीं हजार रुपयांच्याखालील प्राप्तीवरचा कर उठविला आहे, त्यामुळें कदाचित् कांहीं दिवसपर्यंत हिंदुस्थानांतील लोक व्यक्तिशः गरीब झालेले आहेत, असा कदाचित् कोणाचा गैरसमज

होण्याचा संभव आहे. पण एक दोन वर्षातच हिंदुस्थानांतील एकंदर इनकम-टॅक्सची बेरीज दिल्लीदरबारच्या पूर्वीच्या बेरजेशीं सामना करूं लागून मध्यंतरीं दुर्दैवानें हिंदुस्थानावर आलेला गरिबीचा आळ नाहींसा होऊन हिंदुस्थानांतील व्यक्तींची श्रीमंती पूर्ववत् कायम राहील किंवा वाढतही जाईल, अशी साहेबांना आशा आहे. परंतु या बाबतींत केवळ हिंदुस्थानच्या श्रीमंतीकडे लक्ष देऊन साहेबांचें असें म्हणणें आहे कीं, हिंदुस्थान श्रीमंत व्हावयाला पाहिजे असेल तर हिंदुस्थानांतील व्यक्ति श्रीमंत झाल्या पाहिजेत. आणि हिंदुस्थानांतील व्यक्ति श्रीमंत व्हावयाला पाहिजे असतील तर त्यांच्यावरील इनकम टॅक्स वाढविला पाहिजे. दिल्लीदरबारकरितां दोन दिवस प्राप्तीवरील कर कमी केला असला तर ती गोष्ट वेगळी. पण फिरून सरकारनें हिंदुस्थानास गरीब करण्याचा असा प्रयत्न कधींही करूं नये. जर हिंदुस्थान खरोखरच श्रीमंत व्हावयाला पाहिजे आहे, तर पांचशेंपेक्षांही कमी प्राप्तीवर, आणि दहा रुपयांपेक्षांही जास्त दराचा कर बसविणें जरूर आहे. कर वाढतो ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हिंदुस्थानांतील व्यक्तींना श्रीमंती यावयाला पाहिजे असेल तर ती फुकटची येणार नाहीं. आणि हिंदुस्थान देशांतील एकंदर व्यक्तींच्या प्राप्तीवरील कराचा आंकडा अतिशय भयंकर वाढलेला इतर युरोपियन मुत्सद्द्यांनीं पाहिला म्हणजे ब्रिटिश अमलाखालील हिंदुस्थान गरीब झालें असें म्हणण्याची कोणाची छाती होणार आहे ?

इतक्या दूरदर्शीपणाच्या सूचना ज्यांनीं केल्या त्या साहेबांची दृष्टि कोती कधींही नव्हती. त्यांच्या लक्षांत सर्व कांहीं गोष्टी येत होत्या. जोंपर्यंत उपास-मारीनें माणसें मरत आहेत, तोंपर्यंत लॅन्ड-रेव्हिन्यु, मोठ्या पगाराचे कामगार, आणि इनकमटॅक्स हे आपण कितीही वाढविले तरी हिंदुस्थान खरोखरी श्रीमंत झालें असें हिंदुस्थानांतील दुराग्रही लोक आणि कॉंग्रेसवाले हे कधींही म्हणावयाचे नाहींत, हें साहेब मजकूर जाणून होते. म्हणून हिंदुस्थानांतील नेहमींच्या आणि दुष्काळांतील उपासमारीवर त्यांनीं आपल्या विचारांची तोफ वळविली. व अखेरीस त्यांनीं असें पाहिलें कीं, हिंदुस्थानांतील लोक कायद्यासारखे दुसरे कशालाही भीत नाहींत, तेव्हां लॅन्ड-रेव्हिन्यु, मोठ्या पगाराचे अधिकारी, आणि इनकमटॅक्स यांच्या वाढीच्या मुदतीला हिंदुस्थानांत गरिबीच्या विरुद्ध एक कायदा करून दिला म्हणजे सर्व काम होणार आहे, व

हिंदुस्थानांत गरिबीचें नांवही राहणार नाहीं. हिंदुस्थानवर मोंगल किंवा भट राज्य करीत होते तेव्हां भिकार लोक दुर्मिळ असावे आणि इंग्रजांचें न्यायी राज्य हिंदुस्थानावर चालत असतां हिंदुस्थानांत भिकाऱ्यांचा सुकाळ व्हावा, ही गोष्ट इंग्रजांच्या इभ्रतीला कमीपणा आणणारी आहे. तेव्हां इंग्रज सरकारनें या गोष्टीकडे लक्ष देऊन गरिबीविरुद्ध हिंदुस्थानांत एक कायदा पास करून घेतलाच पाहिजे. आणि कायदा केल्यावर हिंदुस्थानांतील गरिबी नाहींशी होणार नाहीं, असें मानण्याला काय जागा आहे? हिंदुस्थानांत सतीचा कायदा केला आणि सती बंद झाली; बालहत्तेच्याविरुद्ध कायदा केला आणि बालहत्या हिंदुस्थानांतून नाहींशी झाली; संमतिवयाचा कायदा केला आणि त्या वयाच्या पूर्वीचे संभोग बंद झाले; लोकांच्या जमिनी सरकारनें आपल्या ताब्यांत घेण्याचा कायदा केला आणि त्या हळूहळू सरकारच्या हातांत येत आहेत; बडोद्यांत बालविवाहाविरुद्ध कायदा होत आहे आणि त्याप्रमाणें तेथें बालविवाह बंद होणार आहे. अशी जर स्थिति आहे तर गरिबीविरुद्ध कायदा केल्यानें गरिबीही हिंदुस्थानांत कां होणार नाहीं? हिंदुस्थानांत कायद्यानें वाटेल तें होण्यासारखें आहे. करणारा मात्र पाहिजे. अशा प्रकारचा उपोद्घात करून गरिबीविरुद्ध करावयाच्या कायद्यांतील कांहीं महत्त्वाच्या कलमांची आणि बाबींची फोड सदर साहेबांनीं फार विचारपूर्वक केली आहे.

ते म्हणतात कीं, गरिबीमध्यें पुष्कळ प्रकार आहेत. कित्येक लोक कंजुषपणामुळें अतिशय गरिबीनें वागत असतात, आणि अगदीं भिकाऱ्यासारखे दिसत असतात. त्यांचा या कायद्यांतील 'गरीब' ह्या शब्दांत समावेश केला जाऊ नये. कारण एकीकडे ते जरी अगदीं भिकाऱ्यासारखे दिसत असले आणि लक्तऱ्या पांघरीत असले तरी देखील ते दुसरीकडे सरकारला हजारों रुपये इनकमटॅक्स भरीत असतात. यामुळें त्यांची गरिबी ही देशाच्या श्रीमंतीलाच परंपरेनें कारणीभूत होत असल्यानें गरिबीविरुद्ध कायद्यांतील गुन्ह्याच्या कलमाखालीं सरकारनें त्यांना आणूं नये. पण असे लोक खेरीजकरून बाकी जे कोणी गरीब असण्याचा गुन्हा करतील ते या कायद्यान्वयें शिक्षेला पात्र व्हावेत. हिंदुस्थानांत या गरिबीचा प्रकार म्हटला म्हणजे भिक्षा मागणें हा होय. इंग्लंडमध्यें भिक्षा मागणें हा गुन्हा म्हणून मानलेला आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही हा गुन्हा म्हणून मानला जावा. कोणीही नेटिव

इंडियन भिक्षा मागतांना आढळला तर पोलिसानें त्याला पकडून मॅजिस्ट्रेटकडे न्यावें; आणि मॅजिस्ट्रेटनें त्याला शंभर रुपये दंड करावा. ह्या उपायानें भिक्षा मागण्याचा गुन्हा बहुतकरून बराच कमी होईल. पण पुष्कळ गरीब लोक अंगावर वाकळा घेऊन रस्त्यानें हिंडत फिरत असतात. यावरून गरिबी एखादे वेळेला कोणाच्या चटकन नजरेला येईल. याकरितां असले देखावे कायद्यानें प्रथम बंद केले पाहिजेत. जो कोणी भिकारी अंगावर वाकळा पांघरून रस्त्यानें फिरेल, त्याला एकदम पन्नास रुपये दंड करावा, व त्या वाकळा त्यानें फिरून वापरू नयेत म्हणून त्या त्याच्या अंगावरून तावड-तोब काढून घेण्यांत याव्या. अशा रीतीनें हिंदुस्थानांतील सर्व भिकाऱ्यांच्या अंगावरच्या वाकळा सुमारें पांच वर्षांच्या अवकाशांत सरकारला आपल्या ताब्यांत घेतां येतील. आणि असें झालें म्हणजे हिंदुस्थानांत वाकळा पांघर-णारा भिकारी एकही न उरल्यामुळें गरीब लोकांचे हिडिस देखावे दाखविणाऱ्या युरोपियन देशांपेक्षांही हिंदुस्थान किती तरी जास्त श्रीमंत आहे, असें मत देण्याला कोणीही कांकूं करणार नाहीं. आणि शिवाय हिंदुस्थानांतील सर्व चिंध्या इतक्या थोडया अवधींत बिनखर्चानें सरकारपाशीं गोळा झाल्या तर तेवढ्या चिंध्या-वर कागदांच्या किती तरी गिरण्या चालवितां येण्यासारख्या असल्याकारणानें त्यापासून हिंदुस्थानची औद्योगिक आणि सांपत्तिक स्थिति विलक्षण प्रकारची सुधारेल ती निराळीच! गरिबीच्या गुन्ह्याचा दुसरा एक प्रकार म्हटला म्हणजे थंडींत कुडकुडणें हा होय. हिंदुस्थानांतील भिकारी लोक तर हा गुन्हा पौष, माघ या महिन्यांत करीतच असतात. परंतु भीक न मागणारे लोकदेखील आप-आपल्या घरांतून चोरून हा गुन्हा करीत असतात. हा गुन्हा इतका वाईट आहे कीं, थंडीच्या दिवसांत एखादा पार्लमेंटचा मेंबर हिंदुस्थानांत प्रवास करण्याकरितां आला, आणि त्यानें थंडींत कुडकुडत पडलेले असंख्य लोक पाहिले म्हणजे हिंदुस्थान गरीब झालें आहे असें त्यानें कोठून बोलून दाखविलें नाहीं तरी त्याच्या मनाला खात्रीनें वाटतें. असला ग्रह फार अपायकारक असल्यामुळें या थंडींत कुडकुडण्याच्या गुन्ह्याला फार कडक शिक्षा ठेविली पाहिजे. हा गुन्हा दंडावर सोडण्यासारखा नाहीं. अतिशय थंडी पडली असतां हिंदुस्थानांतील जो गरीब मनुष्य थंडींत कुडकुडत बसेल किंवा निजलेला आढळेल त्याला पन्नास फटके मारण्यांत यावे. शिक्षेमध्यें दोन हेतु आहेत; एक

तर या कडक शिक्षेच्या भीतीनें गरिबीच्या ह्या गुन्ह्याचा प्रकार पुष्कळ कमी होईल, आणि शिवाय डॉक्टर लोकांच्या मताप्रमाणें फटक्याच्या अंगामध्यें उष्णता उत्पन्न करण्याचा धर्म असल्यामुळें ज्यांना ही शिक्षा देण्यांत येईल, त्यांना त्यापासून सुखच होईल ! कारण त्यांना थंडी वाजणार नाहीं. पण थंडी वाजण्याची बंद करण्याचा फटक्यांमधील हा गुण फार दिवस टिकत नाहीं. फटक्यांचे उठलेले वळ बरे झाले म्हणजे फिरून थंडी वाजूं लागते. याकरितां विलायतेहून येणाऱ्या उत्तम ब्लँकेट्स पांच पांच रुपये किंमतीच्या, पांघरल्या असतां थंडी वाजत नाहीं, असा समज मॅजिस्ट्रेटांनीं आपआपल्या सर्व गुन्हेगारांना देण्याविषयीं नेहमीं दक्षता ठेवावी.

गरिबीपासून उत्पन्न होणाऱ्या या बारीक सारीक गुन्ह्यांची अशा रीतीनें व्यवस्था लाविल्यानंतर गरिबीचा मोठा गुन्हा जो उपासमार याची व्यवस्था लावण्याकरितां ज्या कांहीं सूचना करण्यांत आल्या आहेत, त्यांतील गोषवारा पुढें दिल्याप्रमाणें आहे. या नवीन होणाऱ्या कायद्याप्रमाणें उपास हा एक फौजदारी गुन्हा समजला जावा. परमेश्वरानें मनुष्याला चावण्याकरितां दांत, चाखण्याकरितां जीभ, गिळण्याकरितां गळा, आणि पचविण्याकरितां पोट, दिलें असतां मनुष्यानें कृतघ्नपणानें या देणग्यांचा कांहींएक उपयोग न करितां दांतांशीं दांत लावून बसणें, आणि उपास करणें, हा परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध अतिशय मोठा गुन्हा आहे. शिवाय हिंदुस्थानांतील लोकांना खावयाला कमी दिलेलें आहे असें नाहीं. जें हिंदुस्थान आज इंग्लंडला बहुतेक रीतीनें पोशीत आहे, तें आपल्याला स्वतःला पोसण्याला असमर्थ आहे, आणि तेथील लोकांनीं उपास काढले पाहिजेत, असें कोण म्हणेल ? खुशाल खावें, प्यावें, मजा मारावी. पण तें टाकून देऊन स्वतः उपास काढून आणि कधीं कधीं उपाशी मरूनही हिंदुस्थानांतील गरीब लोकांनीं ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवाला कमीपणा आणण्याचा जो क्रम चालविला आहे, तो अत्यंत गर्हणीय असून शासनाला पात्र आहे. आपलें नाक कापून दुसऱ्याला अपशकुन करणें हें कधींही चांगलें नव्हे. उपासाचा गुन्हा हा दोन प्रकारचा आहे. एक गुन्हा श्रीमंत लोकही करीत असतात, आणि गरीब लोकांकडून दुसऱ्या प्रकारचा गुन्हा होतो. हिंदुस्थानांतील मुख्य वर्ग म्हटले म्हणजे हिंदु आणि मुसलमान हे दोन होत. या दोघांच्याही धर्मांत उपास करण्याविषयीं सांगितलें आहे व ते उपास पुष्कळ श्रीमंत

लोकही करितात. परंतु ही धर्माची बाबत असल्यामुळें सरकारनें स्वतः यामध्यें न पडतां ही उपाशी राहण्याची चाल मोडण्याचें काम—हें धर्माचें घर—मोडण्याचें कॉन्ट्रॅक्ट घेणारे सुधारक लोक निघाले आहेत त्यांच्याकडे सोंपविलें असतां ते हें काम फार चांगल्या रीतीनें करून देतील. त्यांच्याकडे तें काम सोंपविलें आणि सुधारकांनीं तें हातीं घेतलें आहे असें झालें आणि त्यावर सामाजिक परिषदेमधून ठराव पास होऊं लागले, म्हणजे त्याबद्दल बहुतकरून बडोद्यामध्यें एक कायदाच पास होईल. आणि एकदां हा प्रकार प्लेगप्रमाणें सुरू झाला म्हणजे त्याचा ससर्ग कोल्हापुराइतक्या दूर अंतरावरही जाणें फारसें अशक्य आहे असें नाहीं. अशा रीतीनें सुधारक लुंग्यासुंग्यांनीं खालसा मुलखांत आणि सुधारक राजांनीं नेटिव संस्थानांत चळवळ सुरू केली म्हणजे धर्मसमजुतीच्या वेडगळपणामुळें चालू असलेले उपास सहज बंद होतील. अशा रीतीनें हें काम सुधारकांकडे सोंपविल्यानें निरुद्योगी श्रीमंत पेन्शनरांना, चाकरीवरून हांकलून लाविलेल्यांना, आणि सरकारी नोकरांना आपला वेळ फुकट दवडण्याला एक चांगलें साधन करून दिल्यासारखें होईल. आणि सरकारचा इष्ट हेतु साध्य होऊन सरकारनें आमच्या धर्मांत हात घातला, असेंही कोणाला वाटणार नाहीं. लोक नाखूष झाले तर ते सुधारकांसंबंधानें होतील, आणि सरकार आमच्या धर्मांत हात घालीत नाहीं म्हणून सरकारचे उलट लोक धन्यवादच गातील. म्हणून हा धार्मिक उपासासंबंधाचा साप पाहुण्याकडूनच मारावा हें उत्तम होय. आतां गरिबीमुळें जे लोक उपास करतात त्यांच्याविरुद्ध मात्र सरकारनेंच अम्मलबजावणी केली पाहिजे. उपाशी राहणें हा किती मोठा गुन्हा आहे याची कोणाला कल्पना नाहीं. पण वास्तविक उपाशी राहणें म्हणजे खून करण्याइतका हा भयंकर गुन्हा आहे. जो मनुष्य खून करतो तो काय करतो? तो ईश्वरानें निर्माण केलेल्या मनुष्याच्या जीवाचा नाश करतो. आणि हीच गोष्ट करण्याचा प्रयत्न जो उपाशी राहतो तो करीत असतो. फरक एवढाच कीं, जो खून करतो तो दुसऱ्याच्या जीवाचा नाश करतो आणि उपाशी राहणारा आपल्या स्वतःचाच खून करण्याचा प्रयत्न करीत असतो. मिळून दोन्हीही खूनच. असा हा जबरदस्त गुन्हा असूनही आणि हे गुन्हे हिंदुस्थानांत प्रत्येक वर्षी लक्षावधि होत असूनही त्यांच्याकडे अजूनपर्यंत कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट होय. निदान यापुढें तरी उपाशी मरणाराला

कायद्याचें कडक शासन पाहिजे. जो इतका उपाशी राहील कीं, त्या उपाशी राहण्यानें त्याचा जीवच जाईल, तो आपल्या स्वतःचा खून करतो असें समजून तो उपासमारीनें मरण पावला असला तरी इतर उपाशी मरणारांना दहशत बसण्यासाठीं त्याला फांशीची शिक्षा द्यावी. आणि प्रत्यक्ष जीव जाणार नाहीं परंतु तो जाण्याच्या बेतांत येईल इतके दिवसपर्यंत जो उपाशी राहील त्यानें प्रत्यक्ष खून नव्हे परंतु सदोष मनुष्यवध केला असें समजून त्याला जन्मभरपर्यंत काळ्यापाण्याची किंवा सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत यावी. आणि जो थोडे दिवसपर्यंत उपाशी राहील, परंतु ज्या उपाशी राहण्याच्या योगानें त्याच्या हातांपायांतील हिंडण्याफिरण्याची शक्ति अजून पूर्णपणें गेली नाहीं येथपर्यंतच उपाशी राहील, तो खून करण्याचा प्रयत्न करीत आहे किंवा खून करण्याला मदत करीत आहे असें कायद्यानें समजून अशा उपाशी राहणाराला हजार रुपयेपर्यंत दंड अथवा सात वर्षें सक्तमजुरीची शिक्षा देण्याची योजना करावी.

असे कडक उपाय योजिल्यावांचून हिंदुस्थानांतील गरिबी, आणि गरिबीच्या कारणामुळें उपाशी मरणारांची संख्या हीं कधींही हटावयाचीं नाहींत. जर हिंदुस्थान श्रीमंत व्हावयाला पाहिजे असेल आणि हिंदुस्थानांत उपासमारीनें लोक मरण्याचें बंद व्हावयाला पाहिजे असेल, तर अशा कडक शिक्षांचीच योजना केली पाहिजे. लॅन्ड रेव्हिन्यु आणि इनकॅमटॅक्स यांच्या वाढीनें देशाला आणि देशांतील व्यक्तींना गरीब होतांच यावयाचें नाहीं. आणि गरिबीविरुद्ध कायदा केल्यानें उपासमारीनें मरण्याचा गुन्हा करणाऱ्यांना संधीच मिळावयाची नाहीं. आणि अशी चोहोंकडून बंदोबस्ती झाली म्हणजे थोडक्याच दिवसांत हिंदुस्थानासारखा सुपीक, सधन आणि सुखी देश पृथ्वीच्या पाठीवर दुसरा कोणताही नाहीं, असें सगळे लोक म्हणूं लागतील व ब्रिटिश साम्राज्याबद्दलच्या चांगुलपणाबद्दल सर्व जगाला कौतुक वाटेल. ज्यांत दारिद्र्य फार वाढलें आहे, आणि जेथें उपासमारीनें लोक फार मरत आहेत असले देश आम्हांला तुमच्या साम्राज्यांत घेतां काय, म्हणून ब्रिटिश साम्राज्याच्या पाठीस लागतील! हिंदुस्थानच्या दारिद्र्याबद्दल वेळीं अवेळीं लेख लिहिणारे दादाभाई नौरोजी, वेडरबर्न, दत्त, वगैरे लोकांना, आश्चर्यानें चकित होऊन आपले लेख माघारे घ्यावे लागतील ! आणि गरीब हिंदुस्थानचें श्रीमंत हिंदुस्थान तुम्हीं कसें केलें याबद्दल रशिया, जर्मनी, अमेरिका, वगैरे देशांतील मुत्सद्दी इंग्लिशांचा सल्ल

विचारूं लागतील म्हणून असल्या उपायांकडे दुर्लक्ष होणार नाहीं, अशी सदर साहेबांना पूर्ण आशा आहे.

---

## अंगठीसाठीं किंवा बोटासाठीं ? : : १०

सत्कर्मानें वागणाऱ्या मनुष्याचे विचार सरळ असतात. त्याला आपण सत्कर्म करावयाचें एवढें मात्र दिसत असतें; व त्या सत्कर्माच्या जोरावर तो निर्भय असतो, व जगांतील सर्व दुष्टकृतींच्या लोकांस तो तुच्छ मानतो. परंतु हें सत्कर्मापासून उत्पन्न होणारें धारिष्ट इतरांना मिळूं शकत नाहीं. पापाच्या पायावर उभा राहिलेला मनुष्य आपलें कसें होईल, आपल्याला लोक काय म्हणतील, आपल्याविरुद्ध लोक काय करतील, वगैरे असंख्य चिंतांमध्यें सदोदित गढून गेलेला असतो. अशी दोन प्रकारची मनुष्याची मनोवृत्ति असते. सत्कृत्यें करणारांना जास्त जास्त सत्कृत्यें करण्याची उमेद येते. परंतु असत्कृत्यें करणारांचा काळ केलेल्या कृत्यांच्या चिंतेमध्येंच जातो.

अशाच प्रकारची कांहीं अंशीं इंग्लिशांच्या मनाची स्थिति झालेली आहे. आपण हिंदुस्थानांत राज्य करीत आहों, पण आपलें राज्य कसें चालेल, आपल्यावर दुसरा कोणी स्वारी करील कीं काय, रशियानें स्वारी केली तर आपलें कसें होईल, वगैरे अनेक चिंतांनीं इंग्लिशांचें मन अलीकडे रात्रंदिवस व्यापून टाकिलें आहे. मात्र त्यांत विशेष वाईट एवढेंच आहे कीं, बिचाऱ्यांनीं कोणतेंही असत्कृत्य न करितां त्यांच्या पाठीमागें हा हृद्रोग लागला आहे ! हिंदुस्थानावर कोणी स्वारी करील कीं काय, आणि आपण हिंदुस्थानावर करीत असलेल्या धर्मराज्यामध्यें अंतराय आणून तेथील प्रजेचे पैसे कोणी लुबाडून घेतील कीं काय, आणि आपल्या हिंदुस्थानांतील बकऱ्यांना ते निष्ठुरतेनें पाळतील कीं काय, ह्याबद्दल अनेक इंग्लिशांना रात्रंदिवस भीति वाटत आहे. व म्हणून त्यासंबंधानें कांहीं तरी निश्चयात्मक सिद्धान्त ठरविण्याकरितां अनेक मुत्सद्दी, सेनापति, आणि साधे लोक निरनिराळे लेख लिहून आपापले विचार प्रकट

करीत आहेत. त्यांपैकींच मेजर बर्टन यांनीं " हिंदुस्थानावरील स्वाऱ्या " या मथळ्याखालीं एक लेख प्रसिद्ध केला आहे. हा लेख लिहिण्यांत हिंदुस्थानावर किती स्वाऱ्या झाल्या, आणि कोणत्या सनांत कोणी स्वाऱ्या केल्या, हें एखाद्या पंतोजीप्रमाणें सांगण्याचा बर्टन साहेबांचा हेतु नाहीं. त्यांना इतिहास शिकवावयाचा नाहीं. त्यांनीं एखाद्या शाळामास्तराप्रमाणेंच हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांची यादी दिली आहे हें खरें; पण त्या यादीवरून त्यांनीं जो निष्कर्ष काढला आहे तो अगदीं भिन्न आहे. थ्युसीडायडीस हा जो एक प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार आहे त्याचा एक सर्वमान्य सिद्धान्त आपल्या वाचकांपुढें मांडून बर्टन साहेबांनीं प्रथमारंभींच असें एक तत्त्व प्रतिपादित केलें आहे कीं, कांहीं गोष्टी जशा एकदां झाल्या तशाच त्या पुनरपि होतात असा ह्या सृष्टिरचनेमध्येंच कांहीं तरी एक धर्म असावा, असें इतिहासावरून सिद्ध होतें. History repeats itself म्हणजे इतिहासाची पुनरावृत्ति होत असते, हा सिद्धान्तही त्याच अर्थाचा आहे, व तो पुष्कळांना माहीतही आहे. ह्या सिद्धान्ताचें खरेंपण ज्यांना मान्य आहे त्यांना बर्टन साहेबांची पुढील मीमांसाही मान्य झाली पाहिजे. बर्टन साहेब म्हणतात कीं, मध्यएशियांतील प्रांत आजपर्यंत ज्यांच्या ज्यांच्या ताब्यांत आला, त्यांनीं त्यांनीं अखेरीस हिंदुस्थानावर स्वारी केली आहे. व हल्लीं मध्यएशियाचा प्रांत रशियाचे ताब्यांत आला आहे. रशियाला हिंदुस्थानावर स्वारी करून येण्याला वाटेंत पुष्कळ अडचणी आहेत, वगैरे म्हणण्यांत विशेष जोर नाहीं. हबीबुल्लासारखे अमीर आणि हिंदकुश, सुलेमान वगैरेसारखे डोंगर वाटेंत असले, तरी अक्कल आणि दृढनिश्चय ह्यांच्या योगानें वाटेंतील ह्या अडचणी दूर सरण्यासारख्या नाहींत असें नाहीं. पूर्वीच्या ज्या लोकांनीं मध्यएशियांतून हिंदुस्थानांत स्वाऱ्या केल्या ते रशियापेक्षां पुष्कळच कमी सुधारलेले होते. नवीन यंत्रें आणि साधनें त्यांच्यापाशीं कांहींएक नव्हतीं, तरी पण अलेक्झांडर, महमंद गिझनी, महमंद घोरी, नादीरशहा वगैरे लोकांनीं बरोबर लाखों सैन्य घेऊन हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. नेपोलियनच्याही मनांतून हिंदुस्थानावर स्वारी करावयाची होती, व त्यासाठींच त्यानें ईजिप्त आणि रशिया हे देश हस्तगत करून ठेवण्याचा घाट घातला होता. ह्या मागच्या हकीकतीवरून असाच कोणी तरी शूर पुरुष हिंदुस्थानावर स्वारी करणारा उत्पन्न होणार नाहीं कशावरून ?

हिंदुस्थानावर आजपर्यंत वायव्येकडील सरहद्दीवरून ज्या अनेक स्वाऱ्या झाल्या, त्यांपैकीं मुख्य म्हटल्या म्हणजे पुढें दिलेल्या होत. महमंद कासीम यानें इ. स. ७१२ मध्यें सीस्टन जिंकून घेतलें व मक्राणच्या बाजूनें हिंदुस्थानवर स्वारी केली. गिझनीचा राजा सबक्तगीन हा पेशावरच्या वाटेनें हिंदुस्थानांत ९७७ सालीं शिरला. गिझनीचा महमद दहा हजार घोडेस्वारांनिशीं पहिल्यानें पेशावरवरून हिंदुस्थानांत आला. दुसऱ्या एका स्वारीच्या वेळीं बन्नू प्रांतांतून टोचीव्हॅलीमधून तो हिंदुस्थानांत आला. महसूद हा काश्मीरच्या वाटेनें १०३१ मध्यें लाहोरपर्यंत आला होता. ११७९ मध्यें महमद घोरी पेशावरवरून आला, व गोमाल नांवाच्या खिंडीनें परत गेला. तैमूरलंग हा कुरम नांवाच्या खिंडीनें बन्नू प्रांतांत आला, व सिंधु नदीवर लांकडी पूल बांधून त्यानें हिंदुस्थानांत प्रवेश केला. बाबर १५०५ मध्यें खैबरच्या रस्त्यानें हिंदुस्थानांत शिरला. हुमायून १५५५ मध्यें क्वेटाच्या रस्त्यानें पळून गेला; आणि खैबरच्या खिंडीनें पंधरा हजार घोडेस्वार बरोबर घेऊन परत आला. १७३८ मध्यें नादीरशहा बाजारव्हॅलीमधून हिंदुस्थानांत आला. आणि अखेरीस १७४८ सालीं अहमदशहा अबदाली हा खैबर आणि बोलन ह्या खिंडींतून हिंदुस्थानांत शिरला. ह्या वरील माहितीवरून बोलन, खैबर, कुरम आणि गोमाल या खिंडींचे रस्ते हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या सैन्याच्या जाण्यायेण्यानें अगदीं मळून गेलेले आहेत असें दिसतें. इतका रस्ता जेथें मळलेला आहे, तेथें त्या रस्त्यानें कोण केव्हां येईल याचा नेम नाहीं, असें वाटून इंग्लिशांच्या मनांत कधी कधीं धडकी भरत असली तर त्यांत फारसें गैरवाजवी आहे असें नाहीं. वर दिलेली हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांची यादी वाचून इंग्लिशांच्या मनांत धडकी भरत असेल हें खरें. पण वरील याद वाचून आपल्या मनावर काय परिणाम होतो? नऊ दहा वेळां आपल्या प्रिय देशावर परकीय लोकांनीं येऊन घाले घातले, आपल्या देशबांधवांचे गळे कापले, आणि आपलीं घरें धुऊन नेलीं, ह्याबद्दल आपल्याही मनाला खेद वाटला पाहिजे. आपल्या देशावरील स्वाऱ्या ह्या गेल्या दीडशें वर्षांत इंग्लिशांनीं बंद केल्या आहेत. नाहीं तर आतांपर्यंत हिंदुस्थानवर परकीय लोभी राजांच्या किती स्वाऱ्या झाल्या असत्या ह्याचा कांहीं नेम नाहीं! हिंदुस्थानच्या उत्तरेकडे आणि वायव्येकडे उंच डोंगर असल्यामुळें तिकडून परचक्राची भीति नाहीं, अशी पुष्कळांची समजूत आहे. पण त्या उंच उंच

पर्वतांनाही खैबर, बोलन, वगैरे ठिकाणीं भोकें पाडून हिंदुस्थानच्या ईश्वरनिर्मित तटाच्या भिंतींमधून परकीय लोक आंत घुसले. अथवा दुर्लंघ्य पर्वताचीच गोष्ट कशाला ? हिंदुस्थानच्या पश्चिम, दक्षिण व पूर्व बाजूच्या समुद्राचा खंदक पाण्यानें भरलेला असल्यामुळें हिंदुस्थानाला भीति नाहीं; कारण, महासागर हे अनुल्लंघनीय आहेत, असें काय थोडयांना वाटत होतें ? तरी पण समुद्राच्या वाटेनें हिंदुस्थानावर स्वाऱ्या झाल्या कीं नाहीं ? आणि त्यादेखील कांहीं थोडयाथोडक्या झाल्या असें नाहीं. एकदां वाट पडल्याबरोबर मध्यएशियांतून जसे महमद गिझनी, महमद घोरी, तैमूरलंग आणि नादीरशहा आले, त्याचप्रमाणें एकदां वास्को–डी–गामाला समुद्रावरची वाट सांपडल्याबरोबर यूरोप खंडातूनही महमद गिझनी, महमद घोरी, तैमूरलंग आणि नादीरशहा, यांची हिंदुस्थानावर धाड पडली. असे दोन्ही वाटा मिळून हिंदुस्थानावर किती तैमूरलंग आणि नादीरशहा आले ह्यांची जर आपण समग्र बेरीज करूं लागलों आणि ह्या सर्व प्रकारच्या तैमूरलंगांनीं आणि नादीरशहांनीं हिंदुस्थानांतून उठविलेल्या संपत्तीची किती मोठी रास झाली असती आणि त्यांनीं मारलेल्या मनुष्यप्राण्यांच्या प्रेतांचा ढीग एकत्र केला असता तर त्या ढिगानें हिमालय पर्वतालादेखील आपल्यापेक्षां हा कोण उंच झाला म्हणून वर पाहावयाला आणि आपला पहिला नंबर गेला म्हणून खालीं पाहावयाला लाविलें असतें किंवा नाहीं, असले विचार मनांत आले म्हणजे हिंदुस्थानांतील मनुष्यांची छाती फाटूनच गेली पाहिजे ! सारांश, प्रस्तुत पुष्कळांच्या घावांनीं आपला देश घायाळ झाला आहे म्हणून हिंदुस्थानांतील लोकांना त्याचा कळवळा येतो, आणि आपलें राज्य जाईल कीं काय, या भीतीमुळें इंग्लिशांची छाती हिंदुस्थानसाठीं धडधडूं लागते असे दोन लोकांचे दोन निरनिराळ्या दिशेचे मनोविकार आहेत. इंग्लिश लोकांचें पाहणें फक्त हिंदुस्थानांतील आपल्या राज्यापुरतें आहे. एखाद्या लहान मुलाच्या बोटांत कोणी सोन्याची अंगठी घातली असतां आणि त्या मुलाला गांठून त्याचें बोट कापून ती अंगठी घेण्याच्या विचारांत कोणी चोर असतां त्या मुलाच्या आईला आणि त्या मुलाच्या हातांतील अंगठीच्या मालकाला असें दोघांनाही वाईट वाटत असतें. पण आई आपला मुलगा जखमी होईल म्हणून रडत असते, आणि अंगठीचा मालक आपली अंगठी जाईल म्हणून रडत असतो. तशी हिंदुस्थानसंबंधानें हिंदुस्थानच्या लोकांची आणि राजांची स्थिति झालेली आहे.

बर्टन साहेबांनीं आपल्या लेखामध्यें जो विचार केला आहे तो फक्त अंगठी-संबंधानेंच केलेला आहे. बोट कापलें जाईल यासाठीं त्यांची हळहळ नाहीं. अंगठी कायम राहिली पाहिजे. परंतु मागील इतिहासाच्या सिंहावलोकनावरून अंगठी कायम राहील अशी बर्टनसाहेबांना फार थोडी आशा आहे. बर्टनसाहेब आपल्या लेखाच्या शेवटीं असे उद्गार काढतात कीं, हिमालयापासून केप कामोरीनपर्यंत सर्व हिंदुस्थानावर जे आज राज्य करीत आहेत, त्यांना हिंदुस्थानच्या मागील इतिहासावरून आणि हिंदुस्थानावर वायव्य दिशेकडून झालेल्या अनेक स्वाऱ्यांवरून चांगलीच दहशत बसली पाहिजे. इतिहास असें दाखवितो कीं, मध्यएशिया आणि पर्शिया हे प्रांत ज्यांच्या ज्यांच्या ताब्यांत आले ते ते बहुतकरून हिंदुस्थानवर स्वारी केल्यावांचून राहिले नाहींत. हल्लीं रशियाच्या ताब्यांत बहुतेक मध्यएशिया आणि पर्शिया आल्यासारखे आहेत. तेव्हां रशिया हिंदुस्थानवर स्वारी केल्यावांचून राहणार नाहीं. डरायसपासून नादीरशहापर्यंत आपण इतिहास पाहिला तर युफ्रेतीस नदीपासून यमुनानदी-पर्यंतच्या सर्व मुलुखावर त्या राजांचा अमल होता. आणि जें मागें झालें तेंच पुढें व्हावयाचें असा सृष्टीचा नियम दिसतो व त्याप्रमाणें हिंदुस्थान रशियाच्या ताब्यांत जाण्याची भीति आहे, असें बर्टनसाहेबांचें म्हणणें आहे. रशियाच्या सैन्यसमुद्राच्या लाटा हिंदुस्थानच्या वायव्येच्या किनाऱ्यावर आपटत असलेल्या हळूहळू ऐकूं येऊं लागल्या आहेत. त्या समुद्राच्या लाटा अजून दूर अहेत, पण म्हणून त्या जवळ येणार नाहींत, असें मात्र नाहीं. त्या समुद्राच्या लाटांनीं एके दिवशीं कदाचित् सर्व हिंदुस्थान देश बुडून जाईल, अशी बर्टनसाहेबांना भीति आहे. आतां ह्या अंगठीसाठीं रडणारांबरोबरच आपण रडत बसावयाचें किंवा बोटासाठीं काळजी करावयाची, हा बर्टनसाहेबांचा प्रश्न नाहीं. तो आपला प्रश्न आहे, व त्याचा आपणच विचार केला पाहिजे.

---

# एका खेडेगांवच्या मनुष्याचे विचार : : ११

मी एक खेडेगांवचा मनुष्य. आमच्या गांवांत कधीं कांहीं मोठाले उत्सव, आरास, दिव्यांचा लखलखाट आणि माणसांची गर्दी इत्यादि गोष्टी पाहावयाला सांपडावयाच्या नाहींत, म्हणून त्या पाहण्यासाठीं गणपत्युत्सवाची संधि चांगली आहे असें जाणून मी एका मोठ्या शहरीं जाण्याकरितां आपल्या गांवाहून निघालों. वाटेंत मला एक किल्ला दिसला. तो किल्ला इतिहासप्रसिद्ध होता. तो पाहून मला असें वाटलें कीं, हा किल्ला म्हणजे काय आहे ? मातीचे अनेक निरनिराळे कण एकत्र होऊच त्यांच्यापासून हा किल्ला बनला आहे. हे मातीचे कण नुसते एकएकटे पडले असते, तर त्यांच्या हातून काय झालें असतें ? लोकांनीं त्यांना आपल्या पायांखालीं तुडवून मात्र टाकिलें असतें. पण हे सर्व एकत्र झाल्यामुळें त्यांनीं आजपर्यंत किती तरी मोठी कामगिरी बजाविली आहे व याच्यापुढेंही कदाचित् बजावितील ! ह्या मातीच्या कणांनीं आजपर्यंत शेंकडों लोकांचे हल्ले माघारे फिरविले आहेत. ह्या मातीच्या कणांनीं बनविलेल्या भिंतींच्या पोटांमध्यें शत्रूच्या तोफांचे गोळे शिरून तेथील आंतडीं बाहेर काढल्याचीं चिन्हें या किल्ल्यावर अनेक ठिकाणीं दिसत आहेत. शत्रूंनीं सुरुंग लाविल्यामुळें या किल्ल्याच्या शरीराला ज्या जखमा पडल्या त्या अजून तशाच आहेत. त्या भरल्या नाहींत. अशा प्रकारचे अनेक क्लेश स्वतःच्या शरीराला होत असतांही या मातीच्या कणांनीं आपल्या आंतील राजाचें आणि त्याच्या सैन्याचें अनेक वेळां संरक्षण केलें. व रिपु शिडय़ा लावून आणि एकमेकांच्या खांद्यांवर चढून आंत शिरण्याला प्रयत्न करीत असतां ह्यांनीं कोणालाही आपलें आक्रमण करूं दिलें नाहीं. अशा ह्या मातीच्या कणांनींसुद्धां आपलें कर्तव्यकर्म केलें, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. या जगांत येऊन

आहे. तें असें कीं, तिकडील लोकांना आपल्यासारखें निःशस्त्र केलेलें नाहीं. त्यांच्या हातांत शस्त्रें असतात. त्यामुळें ते लोक जें कांहीं म्हणतात किंवा लिहितात, त्याची आपण योग्य तजवीज लाविली नाहीं, तर हे लोक काय करतील कोण जाणें, अशी त्या लोकांबद्दल तिकडील सरकारांना भीति असते. पण ज्या देशांतील लोकांच्या हातचीं शस्त्रें काढून घेतलेलीं आहेत त्यांच्याबद्दल अशी शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा लोकांना मुद्रण-स्वातंत्र्य दिलें, तर त्यांत कांहीं फारसें दिल्यासारखें नाहीं. निःशस्त्र लोकांना बडबडण्याची परवानगी देणें आणि दांत पाडलेल्या सापाला फोंफावण्याची परवानगी देणें, हीं दोन्हीं सारखींच. शिवाय या हक्काच्या देणगीचा विचार करतांना ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, आपल्या इकडे या हक्कांचें आणखीहि एका कारणासाठीं फारसें महत्त्व नाहीं. कारण मुद्रण-स्वातंत्र्य मिळाल्यापसून काय करावयाचें, तर त्या मुद्रित केलेल्या लेखांचा लोकांच्या मनावर परिणाम उत्पन्न करावयाचा. पण आपल्या इकडे पुस्तकाची आणि वर्तमानपत्रांची संख्या अतिशय थोडी आहे. व त्याचप्रमाणें तीं वाचणारांची संख्याहि फार थोडी आहे. या गोष्टी पुढील आंकड्यांवरून सहज लक्षांत येण्यासारख्या आहेत. १८९० सालीं फ्रान्समध्यें ४१०० वर्तमानपत्रें होतीं, जर्मनीमध्यें ५५०० होतीं, आणि युनायटेडस्टेट्समध्यें १५,३०० होतीं. पण ह्यांच्या मानानें हिंदुस्थानचा आकडा पाहिला, म्हणजे तो किती तरी कमी आहे! त्याच सालीं हिंदुस्थानांतील पत्रांचा आंकडा फक्त ६४४ होता. इतकीं थोडीं पत्रें ज्या ठिकाणीं आहेत, त्या ठिकाणीं त्यांतील लेखांपासून काय परिणाम व्हावयाचा आहे? शिवाय ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, तीस कोटी लोकांमध्यें हीं ६४४ पत्रें आहेत. इतर देशांतून किती लोकसंख्येंत किती वर्तमानपत्रें आहेत व हिंदुस्थानांत त्यांचें प्रमाण कसें आहे, हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून लक्षांत येण्यासारखें आहे.

मधील निग्रो लोकांनीं त्या मार्गाचें अवलंबन करण्याला सुरवात केली. त्यांच्या रात्रीच्या गुप्त सभा होऊं लागल्या. आणि सभांतून भावी बंडाच्या बेताचा फैलाव होऊं लागला. निग्रो गुलामांचे अबाधित असे काय काय हक्क आहेत, आणि वसाहतवाल्या गोऱ्या लोकांनीं त्यांच्याशीं कशा रीतीनें वागलें पाहिजे, याच्याबद्दल पॅरिसमधील कांहीं लोकांनीं जीं कांहीं भाषणें केलेलीं असत किंवा लेख लिहिलेले असत ते निग्रो लोकांच्या झोपड्यांतून गुप्तपणानें प्रसृत केले जाऊं लागले. सर्व मनुष्य सारख्या दर्जाचे आहेत आणि सर्व मनुष्यांना स्वतंत्र होण्याचा सारखाच हक्क आहे, हीं फ्रेंच तत्त्वें ह्या उपायानें निग्रो लोकांपैकीं प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें भिनून गेलीं. निग्रो लोकांचीं मनें अशा रीतीनें बिथरून गेलेलीं पाहून तेथील गोऱ्या वसाहतवाल्या लोकांना त्यांची दिवसेंदिवस जास्त भीति वाटूं लागली, व त्यामुळें त्यांचा सारासार विचार सुटून जाऊन त्यांनीं वर दिलेल्या रीतीनें ओजे याचा निर्दयपणानें खून केला. त्यांची अशी कल्पना होती कीं, यांच्या पुढाऱ्याला ठार मारिलें म्हणजे त्या योगानें यांना दहशत बसून हे निग्रो लोक पुढें कांहीं एक करणार नाहींत. परंतु ही त्यांची कल्पना चुकली. एखादा मनुष्य दहशतीनें वचकेल, परंतु सर्व मनुष्य सारख्या दर्जाचे आहेत, आणि सर्वांना स्वतंत्र होण्याचा सारखाच हक्क आहे, ही उदात्त तत्त्वें दहशतीनें वचकण्यासारखीं नाहींत. ज्या अंतःकरणामध्यें निवळ पेंढाच भरला आहे, तें अंतःकरण जुलमी लोकांच्या असल्या उपायानें भयग्रस्त होईल; परंतु समान हक्क आणि स्वतंत्रता यांचीं हीं तत्त्वें ज्या अंतःकरणांत एकदां ठसलीं, तीं अंतःकरणें त्यांच्यापुढें जुलमाचा ब्रह्मराक्षसही मूर्तिमंत येऊन उभा राहिला तरी एक पाऊलभरसुद्धां मागें हटणार नाहींत. निग्रो लोकांच्या अंतःकरणांची अशीच स्थिति बनून गेलेली असल्यामुळें ओजेच्या मरणानें त्यांचे हातपाय मोडून न जातां त्यांचे प्रयत्न अधिकच जारीनें सुरू झाले. त्याच्या मरणाची बातमी ऐकल्यावरोबर सर्वांनीं त्याचा सूड घेण्याची शपथ घेतली; व सुधारलेल्या आणि सुशिक्षित लोकांच्या हातून जी गोष्ट कधींही घडून यावयाची नाहीं ती त्यांनीं त्या वेळीं करून दाखविली. शहाण्या लोकांत एकाचें तोंड एकीकडे तर दुसऱ्याचें तोंड दुसरीकडे, अशी स्थिति असते, परंतु निग्रो लोक इतके शहाणे नसल्यामुळें एका रात्रीमध्यें त्यांच्यापैकीं साठ हजार लोक एकत्र गोळा झाले. अडाणी लोक, त्यांच्यापाशीं सुधारलेलीं शस्त्रें वगैरे कांहीं एक नव्हतें.

| देशाचें नांव | लोकसंख्या | वर्तमानपत्रें |
|---|---|---|
| फ्रान्स | ३,८५,१७,९७५ | ४१०० |
| जर्मनी | ५,२२,७९,९०० | ५५०० |
| युनायटेड स्टेट्स | ६,२६,२२,२५० | १५३९२ |
| इंडिया | २८,७१,२३,३५० | ६४४ |

यावरूनहि इतर देशांत या हक्काचें महत्त्व कां आहे, आणि हिंदुस्थानांत कां नाहीं, हें वाचकांच्या लक्षांत येईल. ह्याप्रमाणें वर दिलेल्या कित्येक कारणांवरून मुद्रणस्वातंत्र्यांचा हक्क हा लोकांच्या फारसा फायद्याचा नसून सरकारला मात्र आपली प्रतिष्ठा मिरविण्याला एक साधन झालेलें आहे. वास्तविक सरकारनें ह्यांत आम्हांला कांहीं दिलें नाहीं; मग त्याबद्दल सरकारची स्तुति तरी कशाला पाहिजे ? व शिवाय इतका निरुपयोगी आणि क्षुद्र हक्क देऊन तो तरी अनियंत्रित ठेविला असता, तर एक असो. पण त्याच्या पाठीमागें कायद्याचीं नवीन कलमें लावण्यांत येत आहेत. त्यामुळें तर त्या मुद्रणस्वातंत्र्यांत कांहींच राम राहिला नाहीं. अशा या हक्काबद्दल आपण आनंदित काय व्हावें आणि सरकारची स्तुति काय करावी ? हा हक्क आपल्याला असण्यापेक्षां नसता तर अधिक बरें झालें असतें. कारण, हा हक्क म्हणजे वरून तोंड झांकलेल्या एखाद्या खळग्याप्रमाणें होय. ह्यांत कोणाचा केव्हां पाय जाईल, याचा नेम नाहीं. अशा रीतीनें ह्यापासून फायदा होणें तर लांबच राहिलें, पण उलटा कधीं कधीं अपाय मात्र होतो. शिवाय मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क लोकांना देणें, म्हणजे त्या हक्काचा उपयोग करणाऱ्या सर्व लोकांना पगारावांचून आपले गुप्त बातमीदारच करण्यासारखें आहे. व त्यायमाणें सरकार हा हक्क लोकांना देऊन त्यापासून आपला फायदा करून

थोडाथोडा नाहींसा होत आहे, तों दुसऱ्या एका गंभीर गर्जनेचा अस्पष्ट ध्वनि माझ्यासमोरून मला ऐकूं येत आहे असें वाटलें. त्या ध्वनीमध्यें चित्ताची एकतानता करून मी आपला मार्ग आक्रमीत असतां माझ्यासभोंवतालचे डोंगर एकापाठीमागून एक नाहींसे झाले. एवढा वेळपर्यंत त्यांनीं आकाशमंडपाला सांवरून धरलें होतें. परंतु ते आकाशाचे आधारस्तंभ आपत्काळीच्या मित्रांप्रमाणें एकाएकीं कोठें अदृश्य झाले. व आपला आधार नाहींसा झाल्यामुळें माझ्यासमोरील गगनतल कोसळून पाण्यांतच पडत आहे कीं काय, असा मला क्षणभर भास झाला. कारण, आकाशमंडपाचें माझ्या पाठीमागचें पाखें जरी कांहीं टेंकडयांवर अजून टेकून राहिलें होतें, तरी माझ्या समोरचें पाखें कोसळून पाण्यावर येऊन टेकलेलें मला स्पष्ट दिसत होतें. आकाशमंडपाला आपल्या पोटामध्यें गडप करूं पाहणारा विस्तीर्ण समुद्र माझ्या नजरेसमोर त्या वेळीं दिसूं लागला. मला कांहीं वेळापूर्वी ज्या गंभीर गर्जनेचा अस्पष्ट ध्वनि ऐकूं येत होता, ती गर्जना ह्याच समुद्राची असली पाहिजे, अशी माझी खात्री झाली. त्या वेळची ती समुद्राची शोभा फारच अपूर्व होती. संध्याकाळचा समय झालेला होता, वारा झुळझुळ सुटला होता, सूर्यबिंब अस्तास जाण्याच्या बेतांत असल्यामुळें त्याचा रंग विशेष लाल आणि त्याचा आकार विशेष मोठा दिसत होता. आणि त्याच्या आरक्त किरणांच्या प्रतिबिंबानें समुद्रावरील प्रत्येक लाटेचीं शिखरें कोमल पल्लवाप्रमाणें किंचित् किंचित् आरक्त झालेलीं दिसत होतीं. अशी अदृष्टपूर्व शोभा पाहण्याकरितां मी एक क्षणभर आपल्या पाठीवरचा बोजा खालीं ठेवून एका स्वच्छ शिलातलावर मुद्दाम थोडासा आराम केला. वर्तुळ एका बाजूनें कापीत गेल्यास त्याच्या ज्या निरनिराळ्या आकृति होतील त्या सगळ्या मी तेथें बसून सूर्य मावळत असतांना पाहिल्या. सूर्याचें अर्धबिंब मीं पाहिलें व तें कमी कमी होत गेलेलें मीं अवलोकन केलें. फार काय पाण्याच्या पृष्ठभागाच्या खालीं सूर्यबिंब गेल्यावरही मी कांहीं वेळपर्यंत तें पाहत होतों. अखेरीस तो आकाशांतील दिवा मालवला. इतक्यांत एक गलबत आपलीं शिडें सोडून त्या वेळीं सुटलेल्या वाऱ्याचा फायदा घेत मोठ्या सपाट्यानें क्षितिजाच्या धारेवर पाण्यावरून पोहत चाललें असतांना माझ्या नजरेस पडलें. तें पाहून माझें लक्ष त्या वाऱ्याच्या कृतीकडे लागलें आणि मी आपल्याशीं असे तर्क करूं लागलों :—एखाद्या गरोदर स्त्रियेप्रमा

ह्या शिडांचीं पोटें इतकीं फुगलीं आहेत, असें ह्यांत काय भरलें आहे? ह्यांत भरलेला वारा म्हणजे तरी काय आहे? इतर वस्तूंचे जसे परमाणु असतात, तसेच वायूचेही परमाणु आहेत, आणि त्या अनेक परमाणूंनीं मिळूनच हें गलबत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेलें जात आहे. ह्या वायूच्या एकट्या परमाणूनें काय झालें असतें? वायूचा एकएकटा परमाणु जरी आपल्याकडून अतिशय जोर करूनही वाहूं लागला असता तरी त्याच्या हातून काय झालें असतें? अतिशय हलक्या गवताची अतिशय लहान काडीदेखील त्याच्यानें हलली नसती, किंवा ह्या समुद्राच्या पाण्यांतील एक अतिशय लहानसा थेंबसुद्धां त्याला वर फेंकून देतां आला नसता. वायूचा एकएकटा परमाणु अशा रीतीनें पाहिलें असतां कोणतीही गोष्ट करण्याला अगदीं असमर्थ आहे. परंतु तेच वायूचे अनेक परमाणु एकत्र झाले असतां त्यांच्यामध्यें किती तरी मोठें सामर्थ्य उत्पन्न होतें! हे परमाणु एकत्र झाले असतां वाटतील तेवढीं मोठ-मोठालीं वादळें उत्पन्न करूं शकतात, वाटेल त्या गलबतांना वाटेल तिकडे फेंकून देतात, आणि वाटेल त्याला रसातळाला नेऊन पोंचवितात, असें प्रचंड सामर्थ्य यांच्यामध्यें आहे; आणि त्याच सामर्थ्याचा उपयोग प्रस्तुत प्रसंगीं हें गलबत हांकारून नेण्याकडे केला जात आहे. परमेश्वरानें सर्वांच्यामागें कर्तव्यकर्म कांहीं तरी लावून दिलेलें आहे. आणि त्या परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें हे वारे या गलबताला एका बंदरांतून दुसऱ्या बंदरांत वाकबगार नावड्याप्रमाणें नेऊन पोंचवीत आहेत. हे वारेसुद्धां आपल्या अंगामध्यें उत्पन्न झालेल्या सामर्थ्याचा कांहीं तरी उपयोग करून देत आहेत व तेणेंकरून आपलें ह्या जगांतील कर्तव्य-कर्म बजावीत आहेत. वाऱ्यासारखा ह्या जगामध्यें रिकामा भटकणारा दुसरा कोणीही नसेल. पण त्याच्या मागेंसुद्धां कांहीं तरी कर्तव्यकर्म लावून दिलेलें आहे, आणि तोसुद्धां तें करण्यांत गुंतलेला असतो, ह्या लक्षांत बाळगण्यासारख्या गोष्टी नाहींत असें कोण म्हणेल?

असे विचार माझ्या मनामध्यें चालले असतां थोडथोडा अंधकार पडूं लागला. ज्या गलबताकडे पाहून मी हे विचार करीत होतों तें गलबत मी असे विचार करीत एका जागीं बसलों असतां बरेंच लांब गेलेलें पाहून मी आपल्या विचारामध्यें किती वेळ दवडला, त्या वेळाचें मापन स्थळाच्या अंतरानें मला चांगलें करतां आलें. व एवढ्या वेळांत मीही असेंच कांहीं अंतर चालून गेलों असतों

असा विचार मनांत येऊन फिरून मीं आपलें बोचकें आपल्या पाठीवर बांधलें. आणि त्या मावळलेल्या सूर्याच्या देखाव्याचें स्मरण करीत करीत त्या क्षितिजावरील गलबताच्या संगतीनें मी आपला मार्ग चालूं लागलों.

मी कांहीं वेळ संधिप्रकाशाच्या काळोखांतच आपली वाट चालत होतों. परंतु पश्चिम दिशेनें गट्ट केलेल्या तेजोनिधीचा कांहीं भाग लोकरंजनासाठीं पूर्व दिशेच्या द्वारानें परत देण्याचें पश्चिमेचें कांहीं तरी कारस्थान चाललेलें असावें असें पूर्व दिशेच्या मुखश्रीवरून मला वाटलें; व इतक्यांत पूर्व दिशेकडे चंद्रबिंब स्पष्ट दिसूं लागलें. पापी जनांच्या अंतःकरणांशिवाय दुसऱ्या कोठें अंधकाराचा लेशही उरला नाहीं. औषधि आणि वनस्पति ह्यांच्यावर अमृत किरणांचें सिंचन झाल्यामुळें त्यांना विशेष टवटवी आली. शुभ्र वर्णाच्या फुलांशिवाय बाकी सर्व वस्तु एकमेकांपासून स्पष्टपणें भिन्न दिसूं लागल्या. आणि चकोरपक्षी आनंदाचीं गाणीं गाऊं लागले. अशा रीतीनें एकंदर सृष्टीमध्यें आल्हादाचा वर्षाव ज्याच्यापासून होऊं लागला त्या चंद्राकडे माझी दृष्टि गेली, आणि त्याच्या प्रकाशासंबंधानें माझ्या मनामध्यें अनेक विचारलहरी येऊं लागल्याः—हें चांदणें म्हणजे प्रकाशाच्या अनेक परमाणूंचा एक मोठा थोरला समुदाय होय. प्रकाशाच्या एकएकट्या परमाणूमध्यें जें सामर्थ्य नाहीं, तें हजारों परमाणु एकत्र झाल्यामुळें त्यांच्यामध्यें उत्पन्न होतें. तेजाचा एकटा परमाणु असता तर त्यानें काय केलें असतें ? काजव्याप्रमाणें त्याची स्थिति झाली असती, कदाचित् काजव्याइतकाही त्याला मान मिळाला नसता. तेजाच्या एकट्या परमाणूनें काळोखांत कोणाला वाट दाखविली असती, कोणत्या बुभुक्षिताचें अन्न शिजवून दिलें असतें, किंवा कोणत्या पाण्याची वाफ करून भावी पर्जन्याला मदत केली असती ? त्याच्या हातून यांपैकीं कांहीं एकदेखील झालें नसतें. परंतु तेच तेजाचे हजारों परमाणु एकत्र होऊन परमेश्वराच्या सृष्टींतील अनेक महत्कार्यें पार पाडीत आहेत. त्यांना जें परमेश्वरानें काम लावून दिलें आहे, तें ते करीत आहेत. सर्वांना प्रकाश देण्यासारखें उत्कृष्ट कर्तव्यकर्म दुसरें कोणतेंच नाहीं. प्रकाश हें ज्ञानाचें रूपांतर होय. ज्ञानाची जी योग्यता तीच प्रकाशाची होय. जगांत प्रकाश नसतां तर मानवी ज्ञानाची मर्यादा अत्यंत आकुंचित झाली असती. तेव्हां अशा प्रकारचा प्रकाश हे चंद्रमंडळावर प्रतिबिंबित झालेले तेजाचे परमाणु पृथ्वीवर पाडून आणि आपलें कर्तव्यकर्म करून जगावर कितीतरी उपकार करून ठेवीत आहेत !

असे विचार करीत मी मार्ग क्रमीत चाललों असतां बरीच रात्र झाल्यामुळें कोठें तरी मुक्काम करून थोडी झोंप घेणें जरूर वाटलें. त्याप्रमाणें करून पुढें तशीच वाट चालत चालत कांहीं दिवसांनीं मला ज्या मोठ्या शहरीं उत्सव पाहण्याकरितां यावयाचें होतें त्या शहरीं मी येऊन पोंहोचलों. तेथील उत्सवाचा थाट आणि लोकांची गर्दी काय विचारावयाची! आमच्या खेड्यामधील सगळे लोक एकत्र गोळा केले तर त्यांची बेरीज शंभराच्यावर भरेल किंवा नाहीं याची वानवाच. अशा स्थितींत मी लाखों मनुष्यांचा समुदाय पाहून अगदीं थक्क होऊन गेलों. आमच्या गांवांत कांहीं कारणानें पांचपंचवीस लोक एकत्र जमले म्हणजे अतिशय गर्दी झाली असें मला वाटत असे. त्या माझ्या दृष्टीला तो लाखों लोकांचा जमाव जमलेला पाहून अतिशय आश्चर्य वाटलें. माझ्या लहानशा दृष्टीमध्यें इतक्या लोकांचा समावेश होण्याला जागासुद्धां पुरेशी मिळेना. इतका मोठा जनसमूह पाहून माझ्या मनामध्यें अनेक तरंग उभे राहिले.

मनुष्यप्राणी म्हणजे असा तसा नव्हे. सृष्टींतील इतर सर्व प्राण्यांपेक्षां त्याचें बुद्धिसामर्थ्य जास्त आहे. अशी विलक्षण शक्ति जर एक एकट्या मनुष्यप्राण्यामध्यें आहे, तर असले लाखों मनुष्यप्राणी जेथें एकत्र जमतात, तेथें त्यांच्यामध्यें काय काय अद्‌भुत शक्तीचा प्रादुर्भाव होत असला पाहिजे! हा मनुष्यांचा जमाव नव्हे, तर हा सामर्थ्याचा पर्वत होय. अथवा अचाट कृत्यांची ही खाणच होय. असल्या खाणींतून सगळ्यांच्या नेत्रांना थक्क करून सोडणारीं काय काय रत्नें उत्पन्न होऊं शकणार नाहींत! इतके लोक एकत्र जमल्यानंतर आपल्या सगळ्यांच्यामध्यें मिळून काय सामर्थ्य उत्पन्न झालें आहे याची कल्पना त्या समुदायांतील लोकांना कदाचित् नसेल. परंतु दुरून ह्या जनसमुदायाकडे, ह्या लोकसमुद्राकडे मी पाहत असतां मला याची बरोबर कल्पना येत आहे. हा संघ काय करणार नाहीं! हा समुद्राप्रमाणें ज्याच्यावर वळेल त्याला सफाई बुडवून टाकील, आणि पर्वताप्रमाणें ज्याच्यावर कोसळेल त्याला सपशेल चिरडून टाकील. हा समुदाय जें मनांत आणील तें करील. लाख लोकांच्या नजरेला काय अदृश्य असणार? लाख लोकांच्या एकवटलेल्या बुद्धीला काय अगम्य असणार? लाख लोकांच्या पायांना काय अनुल्लंघनीय असणार? आणि लाख लोकांच्या हातांना काय अप्राप्य असणार? इतक्या लाखों लोकांनीं मनावर घेतलें तर जेथें समुद्राचे खळगे आहेत तेथें दुसरे पर्वत रचतील, आणि जेथें पर्वतांचे

उंचवटे आहेत, तेथें समुद्राएवढाले खोल खळगे ते खणतील. जेथें जंगलें आहेत तेथें शहरें उभारतील, आणि शहरांचीं जंगलें करून सोडतील. अशा समुदायांच्या अद्भुत सामर्थ्याला कोण भिणार नाहीं ? आणि अशा सामर्थ्यवंत समुदायाला संतुष्ट ठेवण्यासाठीं आपल्या हाडाचीं काडें कोण करणार नाहीं ? इतक्या मोठ्या जनसमुदायाच्या ओघाला कांहींच अशक्य नाहीं. अशा अनेक कल्पना माझ्या मनामध्यें चालल्या असतां हजारों चालतीं बोलतीं सामर्थ्यें माझ्या पुढून चाललीं होतीं. आपण सामर्थ्य आहों, आपण शक्ति आहों, व आपण बुद्धि आहों, हा उमज त्यांपैकीं कोणालाच पडला नव्हता. तरी पण हा उमज नसला तरी अंगांत असलेलें सामर्थ्य, शक्ति आणि बुद्धि हीं नाहींशा होतात असें नाहीं. अशा स्थितींत तो लाखों लोकांचा समुदाय वाजतगाजत आणि नाचतबागडत चालला होता. तो उत्सवाचाच दिवस असल्यामुळें बहुतेकांनीं आपले उंची कपडेलत्ते आपल्या अंगावर घातले होते, व कित्येकांनीं आपली संपत्तीही आपल्याबरोबर चालविली होती. दोनतीन तासपर्यंत जिकडे तिकडे मनुष्यांच्या गर्दीशिवाय दुसरें कांहीं दिसतच नव्हतें, व मधून मधून हें मनुष्यांचें किर्र जंगलच आहे कीं काय असा मला भास होई. अशा प्रकारची ही लाखों मनुष्यांची गर्दी कांहीं वेळपर्यंत चोंहोकडे पसरलेली होती. परंतु संध्याकाळची वेळ होत चालली तसतशी ह्या मनुष्यांच्या समुद्राला ओहोटी लागूं लागली. सगळें मैदान जें अगदीं फुललेलें दिसत होतें त्याला तुरळकपणामुळें शोभा येऊं लागली व कांहीं वेळानें एक गेला, दोन गेले, दहा गेले, असे जातां जातां सर्व लोक तेथून निघून गेले, मी ज्या जनसमुद्राच्या लाटांकडे आणि तुफानाकडे पाहत होतों तो समुद्र थोडक्याच वेळांत अगदीं सफाई आटून गेला ! आणि तें वाळवंट माणसांवांचून अगदीं कोरडें ठणठणीत होऊन पडलें. मी एकटा मात्र काय तो तेथें उरलों. त्या लोकांच्याबरोबर सूर्यही अस्ताला गेला, आणि रात्रीच्याबरोबर माझ्या मनांतील विचारतरंगांना फिरून प्रारंभ झाला. मी आपल्या मनाशीं म्हटलें :— हे लोक काय झाले ? एवढे लोक येथें जमले होते, ते कोठें गेले ? हे कशाला एकत्र जमले होते ? आणि ह्यांची काय कार्यसिद्धि झाली म्हणून हे घरोघर गेले ? ह्यांनीं केवढें सामर्थ्य एकत्र केलें होतें ! पण तें सामर्थ्य आतां कोठें आहे ? बर्फाच्या पर्वताप्रमाणें तें यांनीं वितळून कां वायां जाऊं दिलें ? यांच्या समुदायापासून उत्पन्न झालेल्या ह्या सामर्थ्याला कांहीं

कर्तव्यकर्म करावयाचें नाहीं काय ? इतक्यांत मला मीं आपल्या वाटेनें पाहिलेल्या देखाव्यांचें स्मरण झालें. आणि फिरून मीं आपल्या मनाशीं म्हटलें कीं, मातीचे कण, पाण्याचे थेंब, वायूचे परमाणु, आणि चंद्राचे किरण ह्यांनासुद्धां कांहीं तरी कर्तव्यकर्म परमेश्वरानें लावून दिलेलें आहे, आणि त्याप्रमाणें ते तें करीतही आहेत, असें असून ह्या हिंदुस्थानांतील मनुष्यांनाच मात्र आपलें असें कांहीं तरी कर्तव्यकर्म नाहीं काय? सृष्टीमध्यें जिकडे जिकडे पाहावें तिकडे तिकडे प्रत्येक वस्तु आपल्या अंगचें सामर्थ्य कांहीं तरी उपयोगाला लावीत आहे. मातीचे कण आपल्या अनेक उपयुक्त राजकीय वस्तूंचें संरक्षण करीत आहेत, पाण्याचे थेंब अवाढव्य लोखंडी चाकांना गरगर फिरवीत आहेत, वायूचे परमाणु गलबतांना हांकून नेत आहेत आणि चंद्राचे किरण सर्व प्राण्यांना प्रकाश देत आहेत. प्रत्येक वस्तु आपल्या सामर्थ्याचा कांहीं तरी उपयोग करीत आहे. परंतु हे लोक मात्र त्या सामान्य नियमाला अपवाद दिसतात. ह्या जनसमुदायांतील एकेकटा मनुष्य घेतला तर तो कदाचित एकटा मातीचा कण, पाण्याचा थेंब, वायूचा परमाणु किंवा चंद्राचा किरण ह्यांच्याप्रमाणें दुबळा असेल. पण जेथें असले लाखों मनुष्यरूपी परमाणु एकत्र होतात, तेथें त्यांच्या हातून काय होणार नाहीं ? किल्ल्याप्रमाणें तोफांनीं त्यांची छाती फुटत असतांही आणि सुरंगांनीं त्यांचीं धडें उडत असतांही ते पाहिजे त्याचें संरक्षण करतील, धबधब्याप्रमाणें पाहिजे त्या कडयावरून खोल उडया टाकून वाटेल तितक्या मोठया चक्रालाही ते गरगर फिरवूं शकतील, वायूप्रमाणें ते पाहिजे तेवढें मोठें वादळ उत्पन्न करून त्या तुफानी हवेमध्यें वाटेल त्याला ते रसातळाला नेऊन पोंहोचवितील किंवा ढगांमध्यें भिरकावून देतील, आणि चंद्राप्रमाणें त्यांनीं मनांत आणल्यास ते सर्व जगावर ज्ञानाचा प्रकाश पाडून भलत्याच मार्गाला लागलेल्या वाटसरूंना योग्य वाट दाखवून देतील. एवढें मोठें सामर्थ्य असतांना त्या सामर्थ्याचा कांहीं एक उपयोग न करतां हे लोक चार चहूंकडे वितळून जातात, ही केवढया दुःखाची गोष्ट आहे ! केवढया सामर्थ्याचा ढीग जमलेला आणि तो कांहीं एक उपयुक्त गोष्ट केल्यावांचून मृगजळाप्रमाणें अदृश्य होतो हा किती खेदजनक विचार आहे ! ह्या सामर्थ्याच्या भांडवलावर अनेक मोठमोठया पेढया चालतील, असे विचार मनांत येत आहेत न येत आहेत, तोंच तें सगळें भांडवल बुडून जावें हा व्यापाराला केवढा

धक्का! इतकें मोठें सामर्थ्य, पण तें कांहीं केल्यावांचून लयाला जातें, असल्या ह्या सामर्थ्याला परमेश्वराच्या शासनाची कांहींच भीति नाहीं काय? वारासुद्धां फुकट वाहत नाहीं. तोदेखील कांहीं तरी मनुष्याचें काम करून देतो. नदी-सुद्धां फुकट वाहत नाहीं. तीदेखील जातां जातां मनुष्याचें कांहीं तरी हित साधून जाते. जड वस्तुदेखील मनुष्याचें हित साधण्याकरितां अशा रीतीनें खपत असतां सचेतन मनुष्यांच्या समुदायाच्या एकवटलेल्या सामर्थ्यानें मात्र आपला कांहीं एक उपयोग करूं न देतां जसें उत्पन्न व्हावें तसें लयाला जावें, ही केवढी शोकास्पद गोष्ट आहे! ह्या सामर्थ्याचा उपयोग करण्याचें कोणी कल्पक मनुष्यानें मनांत आणिलें तर केवढें हित साधण्याचा संभव आहे! ह्या लाखों लोकांच्या समुदायामध्यें केवढी विद्युच्छक्ति आहे आणि केवढी मानसशक्ति आहे ह्याची कोणालाही कल्पना नाहीं. सतार ही काय असते? एक भोपळा, दोन बांबू, चार लांकडाच्या फळ्या आणि कांहीं तारा यांच्यापेक्षां सतारीमध्यें आणखी जास्त काय असतें? पण ह्याच वस्तु एकत्र जमा झाल्या म्हणजे त्या काय सुंदर आवाज उत्पन्न करतात! मात्र कोणी कुशल वाजविणारा भेटला पाहिजे. तसाच कुशल वाजविणारा जर कोणी भेटेल तर ह्या लाखों लोकांच्या समुदायानें बनलेल्या सतारीमधूनही तो असे कांहीं सुंदर आवाज काढील, कीं ते ऐकून सर्व जग थक्क होऊन जाईल. परंतु तसा कर्तबगार मनुष्य कोठें आहे! जिनें अतिशय मधुर ध्वनि उत्पन्न केले असते त्या सतारीचा भोपळा फोडून टाकला म्हणजे ती जशी निरुपयोगी होते त्याप्रमाणें ह्या लाखों लोकांनीं बनलेल्या सतारीचे घटकावयव निरनिराळे निरनिराळ्या दिशेनें निघून गेल्यामुळें ज्यापासून अत्यंत मधुरता उत्पन्न झाली असती त्या ठिकाणीं आतां अत्यंत भेसूर अशी शांतता उत्पन्न झाली आहे. असे अनेक विचार मनामध्यें येत असतां मी आपल्या राष्ट्रीय हिताच्या नुकसानीबद्दल खेद करीत आपल्या घराकडे जाण्याकरतां वळलों.

---

# कॉंग्रेस आणि तिचे पुढारी : : १२

कॉंग्रेसचा हंगाम जवळ जवळ येत चालला आहे, व त्या मानानें थोडीबहुत तयारीही मद्रासेस चालली आहे. परंतु कॉंग्रेससंबंधानें लोकांमध्यें जितका हुरूप असावयाला पाहिजे तितका तो मुळींच दिसून येत नाहीं. हुरुपाच्याऐवजीं तिकडे भांडणांनाच जोर आलेला आहे. पुण्यांत कॉंग्रेस झाली, त्या वर्षी पुण्यांत भांडणें झालीं म्हणून पुण्यानें आपलें नांव बद्दू करून घेतलें, सबब पुण्याला फिरून कॉंग्रेस बोलाविण्याला तोंड उरलें नाहीं व बोलाविली तरी कोणी देणारही नाहीं, अशा प्रकारचे उद्गार पुण्यास कॉंग्रेस झाल्यानंतर बरेच दिवस ऐकूं येत होते. व त्या वेळीं पुण्यांतील लोकच भांडखोर म्हणून असें झालें, असें कदाचित कित्येकांना वाटलें असेल. परंतु आतां तो समज कोणाच्या मनांत अजून टिकला असेल किंवा नाहीं, याच्याबद्दल शंकाच आहे. पुण्यांतील कॉंग्रेसनंतर आजपर्यंत सात आठ ठिकाणीं कॉंग्रेसच्या सभा झाल्या. त्या त्या ठिकाणीं अंतःस्थिति पाहिली असतां तेथेंही पुण्यासारखीच हकीकत दिसून येते. बहुतेक ठिकाणीं आंतून भांडणें आहेतच. कोठें तीं जास्त विकोपास गेलीं व कोठें तीं कमी प्रमाणानें थांबलीं, इतकाच काय तो फरक. कॉंग्रेसचा निरुपयोगीपणा पूर्णपणें मनांत बिंबलेला असल्यामुळें ती पुण्यांत यावी, अशी पुण्यांतील फारशी कोणाची इच्छा नाहींच; परंतु फक्त भांडणांचा प्रश्न घेतला, तर कॉंग्रेस पुण्याला मिळूं नये, या गोष्टीला जितकीं कारणें आहेत, तितकींच कारणें तीं इतर ठिकाणांनाही आहेत. कलकत्ता आणि मद्रास या ठिकाणीं कमी भांडणें आहेत असें नाहीं. परंतु आतां अंतस्थ भांडणाच्या सबबीवर कॉंग्रेस भांडखोर ठिकाणांना द्यावयाची नाहीं, असें धोरण ठेविल्यास हळूहळू कॉंग्रेस बंद करण्याचाच प्रसंग येऊन ठेपणार आहे, निदान मद्रासला

तरी फिरून काँग्रेस देऊं नये असा निश्चय करणें भाग पडावें, इतक्या थराला मद्रासमधील हल्लींचीं भांडणें येऊन पोंहोचलेलीं आहेत. मागच्या मद्रासच्या काँग्रेसच्या वेळीं तेथें भांडणें होतीं, व हल्लींही तेथें फारशी सुधारणा झाली आहे असें दिसत नाहीं. मि. जी. सुब्रह्मण्य अय्यर यांचा काँग्रेसशीं कोणत्या प्रकारचा संबंध आहे, हें काँग्रेसचे रिपोर्ट ज्यांनीं पाहिले असतील त्यांना सहज समजणार आहे. तरी पण त्यांच्यासारखे गृहस्थ आपसांत भांडणाला प्रवृत्त झाले ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे व त्यामुळें हल्लीं मद्रासला पक्षभेद आणि मतभेद यांचें प्राबल्य बरेंच झालें आहे; व त्याचे परिणाम यंदाच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष कोणाला नेमावें, ह्या प्रश्नावर होऊं लागले आहेत. तरी पण बहुतकरून मि. लालमोहन घोस हेच यंदाच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होतील, असा अदमास दिसत आहे. तूर्त राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष नेमणें, सभेची कांहीं पूर्वतयारी करणें, सभेंत कांहीं भाषणें करणें आणि सभेचा रिपोर्ट करणें, अशा प्रकारचीं कांहीं ठराविक कामें झालीं आहेत. त्यांत कांहीं मोठेंसें अवघड आतां सतरा अठरा वर्षांच्या अनुभवानें राहिलेलें नाहीं. तीं ठराविक कामें करण्याचीदेखील अलीकडे अतिशय मारामार पडूं लागली आहे. मग काँग्रेसचें खरें काम करण्याविषयीं किती पंचाईत असेल हें तर सांगावयासच नको. काँग्रेसला हल्लीं वळण लावून देणारा असा कोणी पुढारी नाहीं. ह्यूमसाहेब हे पूर्वीं एकदां काँग्रेसचे सेक्रेटरी होते. त्यांनीं जें वळण लावून दिलें आहे, तें ही काँग्रेस आज अठरा वर्षें गिरवीत बसली आहे. आज अठरा वर्षांच्या अनुभवानें कोणत्या गोष्टी निरुपयोगी झाल्या आहेत आणि कोणत्या गोष्टींमध्यें सुधारणा केली पाहिजे, ह्याचा विचार करून त्याप्रमाणें फेरफार करण्याला समर्थ असा एकही पुढारी आज काँग्रेसमध्यें नाहीं. ह्यूमसाहेबांनीं बसवून दिलेल्या नाटकाचा प्रयोग दरवर्षीं डिसेंबर महिन्यांत बरोबर रीतीनें वठवून दिला जातो, याच्यापलीकडे काँग्रेसमधील वक्तृत्ववान् नटांची मजल कधींही गेली नाहीं, व हल्लींच्यापेक्षां निराळ्या रीतीनें पुढारी पुढें आल्यावांचून तशी स्थिति घडूनही येणें शक्य नाहीं. हल्लींही ह्यूमसाहेबांच्या पाठीमागें चांगले पुढारी आपल्याला कोणी नाहींत असें नाहीं. परंतु इतर बाजूंनीं होणारी द्रव्यप्राप्ति सोडून देऊन बुडीत धंद्यामध्यें पुढाकार घेण्याची कोणाचीही इच्छा नाहीं. प्रसिद्ध काँग्रेसभक्त आणि काँग्रेसच्या स्टँडिंग कौन्सिलपैकीं एक, मद्रासचे

प्रसिद्ध आनंदाचार्लू, यांनीं या राष्ट्रीय सभेच्या दुःस्थितीवद्दल नुकताच एक लेख प्रसिद्ध केला आहे त्यांत हल्लीं काँग्रेसला पुढारी नाहीं, हीच रड गायिलेली आहे. ह्यूमसाहेब हे जनरल सेक्रेटरी असतांना सर्व हिंदुस्थानाकरितां म्हणून त्यांच्या हाताखालीं कोणी तरी जॉइंट जनरल सेक्रेटरी द्यावा म्हणजे तो त्या साहेबांच्या हाताखालीं तयार होऊन पुढें चांगला पुढारी बनेल, अशी एक कल्पना सुमारें १०।११ वर्षांच्या पूर्वीं निघाली होती. त्या वेळची एक हकीकत मि० आनंदाचार्लू यांनीं दिलेली आहे, ती विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्या वेळीं ती जागा मि. आनंदाचार्लू यांना देण्यांत आली. हें जॉइंट ज. सेक्रेटरीचें काम आपल्या हातून व्हावयाचें नाहीं, असें मि. आनंदाचार्लू यांना वाटत होतें व म्हणून ते ती जागा पत्करण्याला कांकूं करीत होते. त्या वेळीं पाठीमागून झालेले न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे हे मि. आनंदाचार्लू यांना आश्वासन देऊन असें म्हणाले कीं, मी एकदोन वर्षांमध्यें पेन्शन घेऊन रिकामा होतों, तेथपर्यंत तुम्ही हें काम कसें तरी चालवा, नतर मी सगळ्या हिंदुस्थानाकरितां जॉइंट जनरल सेक्रेटरीचें काम आपल्याकडे घेतों, व मग मी आपला सर्व वेळ ह्याच कामामध्यें खर्च करीन. मि. आनंदाचार्लू हे म्हणतात कीं, न्यायमूर्तींनीं आपणास अभिवचन दिलें होतें. परंतु तें वचन त्यांच्याकडून कितपत शेवटास गेलें हें आपल्याला सगळ्यांना माहीतच आहे. न्यायमूर्ति रानड्यांसारखे गृहस्थदेखील हायकोर्टांतील जज्जाच्या पगाराच्या पाशांत गुंतून स्वदेशहित साधण्याच्या हेतूनें केलेला निश्चय आणि दिलेलें आश्वासन विसरून जातात, इतकी जेथें धनलोलुपता भरली आहे तेथील देशांतील लोकांना चांगले पुढारी मिळत नाहींत आणि तेथें सरकारला मात्र चांगले नोकर मिळतात ह्याबद्दल कोणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. मेल्या म्हशीला पायलीभर दूध होतें, असें सांगण्याचा सर्वत्रच रिवाज आहे. व तसेंच न्यायमूर्तींच्या संबंधानेंही होणें अगदीं इष्ट आहे. असें असतांना त्यांच्या ह्या धनलोभीपणाच्या गोष्टी एकेक बाहेर काढणें बिलकुल उचित नाहीं. अशा दृष्टीनें पाहिलें असतां मि. आनंदचार्लू यांनीं ही जी हकीकत सांगितली ती अगदीं गैर आहे असें म्हणावें लागतें. शिवाय हल्लीं इकडे त्यांचें स्मारक करण्याचें घाटत आहे आणि हें स्मारक कशाकरितां होत आहे? तर ते मोठे देशाभिमानी होते आणि स्वदेशकल्याण करण्यासाठीं घस्‌सोसण्याला त्यांनीं

कधींही मागें पाहिलें नाहीं; जो शब्द त्यांच्या मुखांतून गेला तो एखाद्या महर्षीप्रमाणें त्यांनीं कधीं अन्यथा ठरूं दिला नाहीं; इत्यादि त्यांच्या महर्षिप्राय सद्गुणांकरितां हें स्मारक चाललें आहे. अजून त्यांचें गुणवर्णन करणाऱ्या लेजिस्लेटिव वक्त्यांच्या तोंडांतले शब्द श्रोत्यांच्या कानांतून गुणगुणावयाचे थांबले नाहींत, अजून त्यांच्या स्तुतितत्पर लेखांनीं भरलेल्या वर्तमानपत्रांचा वाण्याच्या दुकानांत प्रवेश झाला नाहीं, आणि अजून त्यांच्या स्मारकाकरितां वर्गणी मागण्यासाठीं पुढें पसरलेला याचकहात मागें वळला नाहीं, इतक्यांतच मद्रासच्या कोपऱ्यांतून मि. आनंदाचार्लूसारख्या अशंकनीय गृहस्थाकडून न्यायमूर्तींचे असले गुणानुवाद बाहेर पडले तर स्मारकाची इमारत कशी उभारणार? मुंबई इलाख्यामध्यें न्यायमूर्ति लवकरच पेन्शन घेऊन नंतर गग काय काय अद्भुत् चमत्कार घडवून आणणार आहेत याच्याबद्दल अनेक ापा मारण्यांत येत असत. परंतु मद्राससारख्या दूरच्या इलाख्यांतील आणि मि. आनंदाचार्लूसारख्या थोर गृहस्थाजवळसुद्धां पेन्शन घेतल्यावर असें करावयाचें आहे, आणि तसें करावयाचें आहे अशा थापा मारण्यांत आल्या होत्या. ही गोष्ट कळून आल्यानंतर कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. असल्या महर्षींचीं स्मारकें खुशाल होवोत. कारण त्या स्मारकांच्या निमित्तानें एखादा टाउन हॉल झाला तर तो तरी निदान दगडाचा बनविलेला असूनही खात्रीनें लोकहिताच्या जास्त उपयोगीं पडेल. परंतु स्मारकाची खटपट करणारांनीं आपल्या स्मरणीय महर्षीसंबंधींच्या असल्या गोष्टी जितक्या बाहेर न येतील तितक्या त्या न येऊं देण्याविषयीं खटपट केली पाहिजे. नाहीं तर त्यांचे प्रयत्न व्यर्थ होणार आहेत. पुढारी होऊं पाहणाऱ्या लोकांची ज्या देशामध्यें अशा प्रकारची स्थिति आहे, तेथें कॉंग्रेसला १९ वर्षें झालीं तरी तिजवर एकदेखील फळ आलें नाहीं व तें झाड दिवसेंदिवस वठत चाललें आहे ह्यांत मोठेंसें आश्चर्य तें काय? कॉंग्रेसला पुढारी मिळत नाहींत, म्हणून ओरड! पण हायकोर्टाला नेटिव जज्ज मिळत नाहींत किंवा श्रीमंत पक्षकारांना नेटिव बॅरिस्टर मिळत नाहींत असें कधीं झालें आहे काय? यांतील इंगित काय आहे हें कोणाच्याही लक्षांत येईल. देशहिताच्या गोष्टी बोलणें आणि सरकारी चाकरी करणें, असा जोंपर्यंत आपल्यांतील श्रेष्ठ लोकांचा वर्तनक्रम चालला आहे, व असल्या वर्तनक्रमाबद्दल जेथें स्मारकाचा मान मिळत आहे, तेथें लोकांनीं दरमहा

चारपांच हजार रुपयांवर, सरकारच्या मर्जीवर, पदव्यांवर, कौन्सिलमधील जागांवर आणि लेव्हीच्या आमंत्रणांवर पाणी सोडण्याला काय म्हणून तयार व्हावें ? सरकारनें ज्याचा मान केला त्याचेच लोकांनीं देव्हारे माजवावयाचे आणि सरकारनें ज्याला वाईट म्हटलें त्यांना सदोदित पाण्यांत पाहावयाचें, अशा प्रकारची जेथील लोकांची बक्षीस द्यावयाची रीत आहे, तेथील लोकांना चांगले पुढारी कसे मिळावे ? अशा गुलामगिरीला चटावलेल्या लोकांमध्यें सरकारी नोकरच उत्तम पैदा व्हावयाचे ! जें आपण लावावें तेंच रुजतें. तेथें दुसरीं फळें कशीं येणार ? ज्या लोकांनीं सरकारी नोकर हेच आपले देव म्हणून मानले, त्यांना खरे, स्वतंत्र आणि केवळ स्वदेशहित पाहणारे लोकनायक कसे मिळणार ? सरकारी नोकरींत राहून देशहिताचीं कामें करतां यावयाचीं नाहींत असें नाहीं. सरकारची मर्जी संतुष्ट राखल्यानेंच आपला अंतीं फायदा आहे, सध्यां सरकारची मर्जी मोडून चालण्याचा काळ नाहीं, असलीं जीं कित्येक शहाणपणाचीं म्हणून तत्त्वें आपल्यामध्यें अलीकडे प्रचारांत आलीं आहेत तीं आपल्या मनावर प्रत्यहीं अबाधित रीतीनें ठसविलीं जात असतां आपल्यांत खरे लोकनायक निर्माण होत नाहींत, आणि कोणाच्या अंगामध्यें त्या लोकनायकत्वाच्या जागेला लागणारे कांहीं गुण असले तरी त्यांच्यानें मोठ्या पगाराची एखादी सरकारी जागा आली तर ती सोडवत नाहीं, या गोष्टीबद्दल आपल्याला आश्चर्य काय म्हणून वाटावें ? आणि असलीं वरच्यासारखीं तत्त्वें मान्य करीत असतां आपल्यामध्यें चांगले लोकनायक उत्पन्न व्हावे, अशी आपण काय म्हणून आशा करावी ? तशी आशा करण्याला आपल्याला काय अधिकार आहे ? वरच्यासारख्या तत्त्वांच्या वातावरणांत खऱ्या लोकनायकत्वाचीं रोपें कधींही जगत नाहींत. ही गोष्ट लक्षांत बाळगून ह्या तत्त्वांचा खरा अर्थ काय आहे, याचें आपण शोधन केलें पाहिजे. हीं तत्त्वें कोणी शोधून काढलीं ? आणि तीं प्रचलित करणारांचा काय हेतु असला पाहिजे ? न्यायमूर्तींसारख्या सरकारी चाकरीच्या जाळ्यांत पाय सांपडलेल्या लोकांनीं, आपली चाकरी तर जाऊं नये आणि लोकांचेही पुढारी म्हणवून घेण्याची आपल्याला संधि मिळावी, अशा हेतूनें हीं तत्त्वें अमलांत आणलीं आहेत हें उघड आहे. असलीं स्वदेशहितविघातक तत्त्वें अमलांत आणून या लोकांनीं कदाचित् आपलें हित साधून घेतलें असेल व

सरकारचेंही बरेंच हित साधण्याला ते कारणीभूत झाले असतील; परंतु त्यांनीं स्वदेशाचें मात्र ह्या तत्त्वांनीं अत्यंत नुकसान करून ठेविलें आहे. स्वतः त्यांच्या हातून तर कांहीं झालें नाहींच, पण पुढील पिढीच्या हातूनही विशेष कांहीं होऊं नये, अशी त्या सद्गृहस्थांनीं आपल्या तत्त्वांच्या द्वारानें तजवीज करून ठेविली आहे. त्यांनीं प्रचलित केलेल्या खोटया तत्त्वांचीं पाळेंमुळें लोकांच्या मनांतून पूर्णपणें खणलीं गेल्यावांचून नवीन तऱ्हेचे लोक आणि लोकनायक पैदा होण्याची आशा नाहीं. वरील तत्त्वांचा लोकांच्या मनावर जोंपर्यंत अंमल आहे, तोंपर्यंत सरकारनें पसंत करून दिलेलींच माणसें लोकांनीं आपले पुढारी म्हणून मानून घेतलें पाहिजे. हा इंग्रजांच्या रुपयांचा लोभ फार दुर्धर आहे. त्यांनीं भारून दिलेला रुपया ज्याच्या हातांत पडला, त्याचा हात खऱ्या स्वदेशहिताच्या कामीं मोडलाच म्हणून समजावें. अशा प्रकारचे रुपये ज्यांच्या पोटांत शिरले ते लोकांचे पुढारी काय होणार ? आणि त्यांच्यापासून काँग्रेससारख्या संस्थांचें हित काय होणार ? वास्तविक काँग्रेस-सारख्या ज्या संस्था युरोपियनांनींच आम्हांला काढून दिल्या आहेत त्या आमच्या खऱ्या फायद्याच्या आहेत किंवा नाहींत, याबद्दलची शंका उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. साहेबांपैकींच कांहीं साहेब आमच्या बाजूला मिळून आपल्या देशबांधवांविरुद्ध तुमचा उत्कर्ष करण्याविषयीं आम्ही प्रयत्न करीत आहों, असें दाखवितात हें कसें, हीच शंका प्रथमतः उत्पन्न होते. साहेब म्हणजे कांहीं हिंदुस्थानांतील फितुरी आणि स्वदेशद्रोही लोकांप्रमाणें नव्हेत, कीं ज्या योगानें आपल्या देशबांधवांविरुद्ध आम्हांला मदत करण्याला ते तयार होतील. अशी शंका उत्पन्न झाली म्हणजे मग ही काँग्रेसची संस्था आमच्या हातांत कां देण्यांत आली असावी, या प्रश्नाचा विचार करण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. व त्या प्रश्नाचें उत्तर शोधून काढण्याकरितां त्या वेळच्या परिस्थितीकडे थोडेंसें वळणें जरूर आहे. काँग्रेस ही सर्व हिंदुस्थानकरितां खरी, परंतु प्रथमतः ती मुंबईमध्येंच सुरू करण्यांत आली ती कां ? मुंबई-मध्येंच मोठेमोठे लोक होते आणि कलकत्ता, मद्रास वगैरे शहरें ओसाड पडलीं होतीं असें मुळींच नाहीं. मग मुंबई इलाख्यावरच एवढी मेहेरबानी कां ? ह्या प्रश्नाचें उत्तर मुंबई इलाखा आणि इतर इलाखे ह्यांच्यामध्यें जें अंतर होतें त्यामध्यें आहे. काँग्रेसची चळवळ ज्या वेळीं मुंबईत पहिल्यानें सुरू झाली

त्याच्या आधीं मुंबई इलाख्यामध्यें काय गोष्टी घडून येत होत्या ? बऱ्याच ठिकाणच्या शेतकरी लोकांमध्यें दारिद्र्यामुळें व उपासमारीमुळें अतिशय असंतोष उत्पन्न होऊन मारामाऱ्या, दरवडे आणि दंगे यांना सुरवात झाली होती. यानंतर कांहीं वर्षांनीं बहुतेक त्याच मुलखांत वासुदेव बळवंताच्या बंडाचा फैलाव झाला. पहिल्यामध्यें फक्त शेतकरी लोकच होते. परंतु दुसऱ्या बंडामध्यें पुष्कळ सुशिक्षित लोकही सामील आहेत अशी सरकारला जबरदस्त शंका आली होती, असें सरकारनें न्यायमूर्ति रानड्यांच्या एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं बदल्या केल्या, व इतर कित्येक गोष्टी केल्या त्यावरून स्पष्ट दिसत आहे. त्या वेळीं महाराष्ट्रांतील शेतकरी लोक तर उघड उघडच बिथरले होते. व सरकारला आलेला संशय खरा असेल तर सरकारनें सुशिक्षितपणानें नामर्द करून ठेवलेले लोकही बंडें करण्याच्या खटपटींस लागले होते, असें दिसतें. शेतकरी लोक आणि सुशिक्षित लोक हेच काय ते कोणत्याही देशांत झाले तरी मुख्य आधारभूत असे दोन वर्ग होत. त्यांचीच जर अशी स्थिति झालेली असेल, तर त्यांच्या मानेवर बसवलेलें राज्य ढांसळून पडण्याला किती अवकाश आहे ! ही स्थिति धूर्त सरकारनें ओळखली, आणि आपल्या स्थैर्या-करितां उपाय योजण्याला सुरवात केली. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांच्या घरांतील संपत्ति कोणी लांबविली आणि त्यांना भिकारी कोणी केलें, या प्रश्नांचीं बरोबर उत्तरें काय आहेत, हें आतां इंग्लिश लोक कांहींही म्हणत असले तरी, बहुतेकांना कळून चुकलें आहे. वास्तविक शेतकऱ्यांच्या गरीबीचा खरा दोष सावकारांकडे नव्हता. ते या बाबतींत निव्वळ संन्याशासारखे होते. तरी पण अखेरीस त्यांच्याच बापड्यांच्या कपाळीं सूळ आला ! सावकार लोकांनीं शेतकऱ्यांना बुडविलें, असा जिकडे तिकडे गवगवा करून देऊन सावकारांच्या कचाटींतून शेतकऱ्यांना सोडविण्याकरितां म्हणून दक्षिण महा-राष्ट्रामध्यें ‘ अग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट ’ या नांवाचा एक कायदा काढला. अशा रीतीनें आपला दोष सावकारांचे माथ्यावर घालून सरकार दयाळु, मम-ताळु, कनवाळु, कृपाळु आणि मायाळु बनलें ! शेतकऱ्यांच्या खांद्यावर सावकार बसलेले, आणि सावकारांच्या खांद्यावर सरकार बसलेलें, अशा समाजरचनेच्या चित्राची कल्पना आपल्या डोळ्यांपुढें आणा ! अशा स्थितींत माझ्यावर अति-शय भार पडून मी मरतों, अशी ओरड खालचा शेतकरी करतो तेव्हां, त्याला

सरकार सांगतें कीं, बाबा, तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. तुझी कंबर अगदीं मोडून गेली असेल यांत शंका नाहीं. तुझ्या खांद्यावर हा केवढा लठ्ठ सावकार बसला आहे पहा. त्याच्या वजनाखालीं तूं अगदीं चुरून गेला असशील. मला तुझी फार दया येते! आतां तुझ्यावर पडणारें ओझें कमी करण्याकरतां ह्या सावकाराच्या अंगावर उंची वस्त्रें, सोनें, रत्नें, मोतीं वगैरे कांहीं जड वस्तु आहेत, त्या मी त्याच्या अंगावरून काढून, हे शेतकऱ्या, तुझें ओझें थोडेंसें तरी हलकें व्हावें येवढ्याखातर मी आपल्या अंगावर घालून घेतों, असें म्हणण्यासारखेंच वरील कृत्य होतें. सरकार सावकाराच्या खांद्यावर बसलें आहे म्हणून शेतकऱ्याला सावकाराचें ओझें दुप्पट वाटतें ह्या गोष्टीकडे स्वाभाविकपणें वळणारें लक्ष भलतीकडेच वळवून शेतकऱ्यांचें ओझें कमी करण्यासाठीं सावकारांच्या अंगावरचें सोनें आपल्या अंगावर घालून घेणें याच्यासारखी खुबीदार युक्ति दुसऱ्या कोठें क्वचितच आढळेल. तरी पण हिंदुस्थानांतील अडाणी लोकांना चकवावयाला आणखी काय पाहिजे? ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्टनें व दुसऱ्या कांहीं किरकोळ उपायानें सर्वत्र शांतता झाली आणि शिवाय सरकार ममताळु म्हणून चोंहोकडे द्वाही फिरली! अशा रीतीनें शेतकरी लोक कसेबसे थंडावले. परंतु त्या वेळच्या सुशिक्षित लोकांची महत्त्वाकांक्षा मात्र तेवढ्यानें थंडावली नाहीं. शेतकरी लोकांच्या अवनतीचीं खरीं कारणें काय आहेत आणि त्या कारणाचें निरसन झाल्यावांचून आपल्या देशांतील शेतकरी लोकांची स्थिति कां सुधारावयाची नाहीं इत्यादि गोष्टी सुशिक्षित लोकांना त्या वेळीं समजत होत्या. कै. न्यायमूर्ति रानडे हे प्रथमपासूनच सुशिक्षित लोकांचे पुढारी होते, व तें त्यांचें स्थान त्यांनीं या वेळींही आपणांकडेसच कायम ठेविलें होतें. त्या वेळच्या त्या सुशिक्षित मंडळीमध्यें तत्कालीन परिस्थितीसंबंधानें बराच असंतोष उत्पन्न झालेला असावा व त्या असंतोषाचें पर्यवसान वासुदेव बळवंतच्या बंडामध्यें झालें असावें, असें सरकारच्या हातून त्या वेळीं घडलेल्या कृतीवरून दिसतें. वासुदेव बळवंतच्या बंडाच्या रूपानें दक्षिण महाराष्ट्रामध्यें जी असंतोषाची ज्वाळा पेट घेत होती ती फुंकर घालून सरकारनें कशी विझविली वगैरे गोष्टी सर्वांना माहीतच आहेत. सरकारसारख्या प्रभंजनाला असली लहानशी ज्योत मालवून टाकणें फारसें अवघड होतें असें नाहीं. तरी पण हे सुशिक्षित लोक आपल्या राजकीय परिस्थितीबद्दल असंतुष्ट होत चालले आहेत, ही गोष्ट

सरकारनें पक्की लक्षांत घेतली. त्या वेळीं ज्या हातांनीं पोलादाचीं शस्त्रें उचलली होतीं ते हात तोडून टाकण्याला फारसे कठीण नव्हते. पण त्या वेळीं ज्या मनांनीं असंतोषाचीं शस्त्रें उचललीं होतीं त्यांचा उच्छेद करणें फार कठीण होतें. कारण असलीं मनें त्या वेळीं पुष्कळ असून तीं पुष्कळ ठिकाणीं पसरलीं होतीं त्यांचा उपशम करणें जरूर होतें. म्हणून वासुदेव बळवंत आणि त्यांचे अनुयायी यांना पकडण्याकरतां जसे कांहीं साहेब सोडण्यांत आले त्याचप्रमाणें सुशिक्षितत्वामुळें असंतुष्ट झालेल्या लोकांचे पुढारी आणि त्या पुढाऱ्यांचे अनुयायी ह्यांचीं बिथरलेलीं मनें पकडण्याकरितांही कित्येक साहेब लोक सोडण्यांत आले, अशी कोणी कल्पना केली तर ती इंग्लिशांच्या राजनीतीच्या फारशी विरुद्ध जाईल असें नाहीं. ह्यूमसाहेबाचें नांव पुढें जितकें लोकप्रिय झालें तितकें तें पूर्वीं खास नव्हतें, वासुदेव बळवंतच्या बंडानंतर दोनतीन वर्षांमध्येंच काँग्रेस ही संस्था अस्तित्वांत आली. हिंदुस्थानांतील सुशिक्षित मुलें आपल्याला खरोखरीचा घोडा पाहिजे, म्हणून मनांत हट्ट धरून बसलीं होतीं. इतक्यांत एक धूर्त दाई पुढें सरसावली. तिनें चिंध्या, काटक्या, शेण वगैरे जिनसांचा एक घोडा बनवून त्या मुलांपुढें आणिला, आणि ‘ बाळांनो, रडू नका, हा घ्या मीं तुम्हांला घोडा आणिला आहे ’, अशी त्यांची समजूत घालून त्यांच्या हातांत तिनें तो शेणाचा घोडा दिला, आणि तेव्हांपासून आपल्याला काँग्रेस मिळाली. व त्यामुळें खऱ्या घोड्याचें स्वरूप मनांतून नाहींसें होऊन हिंदुस्थानांतील सुशिक्षित मुलें ह्याच शेणाच्या चित्राबरोबर आज अठरा वर्षें खेळत आहेत, व आणखीही कित्येक वर्षें अशींच खेळत राहतील, अशी आशा आहे. असो. सुशिक्षित लोकांच्या मनामध्यें जो असंतोष उत्पन्न झाला होता आणि त्यांच्या मनाला जें वांकड्या वाटेचें वळण लागत होतें, त्या सगळ्याचें परिमार्जन होऊन आजकाल सर्व सुशिक्षित लोक ब्रिटिश मायेच्या जाळ्यांत सांपडून पाण्यावर कांठ्या मारीत बसण्याचें निरुपयोगी आणि निरुपद्रवी काम करण्यामध्यें पूर्णपणें व्यग्र झालेले आहेत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. असलें हें शेणाच्या बनविलेल्या घोड्याचें खेळणें हिंदुस्थानांतील सुशिक्षित मुलांच्या हातीं ह्यूमसाहेबांनीं दिलें नसतें तर केवढे अनर्थ गुदरले असते याची कल्पनाही करणें शक्य नाहीं. सर्व हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांच्या असंतोषाची ज्वाळा तेव्हांपासून आज

७

अठरा वर्षेंपर्यंत अव्याहत रीतीनें वाढूं दिली असती तर तिचा फैलाव कोठ-पर्यंत झाला असता, तिनें काय काय ग्रासलें असतें आणि तिनें कशाकशाची रक्षा करून टाकली असती, याची कल्पना तरी कोणाला आहे काय? सर्व हिंदुस्थानांतील समजदार लोकांची संपत्ति, विद्या, उत्सुकता आणि महत्त्वा-कांक्षा यांचा प्रचंड ओघ सुमारें वीसबावीस वर्षांपूर्वी जिकडे वाहत होता तिकडेच तो तेव्हांपासून आजपर्यंत एकसारखा वाहूं दिला असता तर त्यानें आपल्या जोरानें काय काय वाहून नेलें असतें, आणि काय काय बुडवून टाकलें असतें, याची कल्पना कोण करूं शकणार आहे? परंतु आपल्या सुदैवानें आज हे सगळे अनर्थ टळून आपण आत्यंतिक सुखाचा आस्वाद घेत आहोंत याबद्दल आपण परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत; आणि ज्यांच्या शहाण-पणानें आपल्यावरचा हा अघोर प्रसंग टळला त्यांच्या दूरदृष्टीपणाची आणि कारस्थानकौशल्याची आपण सदोदित तारीफच करीत राहिलें पाहिजे.

अशा रीतीनें व अशा हेतूसाठीं जी काँग्रेस बहुधा अस्तित्वांत आली असावी, ती मरगळत चालली तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. आप-ल्याला वाटतें कीं, आपल्याला हा जो घोडा दिलेला आहे, यावर बसून आपण कांहीं तरी प्रगति करावी. परंतु ती व्हावी कशी? आपल्याजवळ हल्लीं जो शेणाचा घोडा आहे, तो आपल्याला एक खेळणें म्हणून दिलेला आहे. आपण त्या वेळच्या समजुतीप्रमाणें प्रगतीची जी खटपट करीत होतों, तिजपासून परा-वृत्त होऊन शेणाच्या घोड्याच्या भोंवतीं भोंवतीं फिरून आपण आपला काल-क्षेप करावा याचसाठीं आपल्याला तो दिलेला आहे, आपल्या प्रगतीसाठीं तो दिलेला नव्हे. अशा स्थितींत प्रगति होणें नाहीं व ती झाली नाहीं म्हणून त्याबद्दल खेदही मानण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्यांनीं खरोखर अभ्यास कर-ण्याचे कष्ट केले नाहींत त्यांनीं परीक्षा पास होत नाहीं म्हणून दुःख तरी काय म्हणून मानावें?

---

## सेंट डॉमिनगोमधील एक रात्र : : १३

हल्लीं इंग्लंडच्या जशा निरनिराळ्या ठिकाणीं वसाहती आहेत, तशा पूर्वी फरेंचांच्याही कित्येक ठिकाणीं होत्या. त्यांपैकीं सेंट डॉमिनगो या ठिकाणीं फरेंचांची वसाहत फारच महत्त्वाची होती. उत्तर अमेरिकेच्या आग्नेय कोपऱ्यामध्यें वेस्ट इंडीज या नांवाचीं जीं बेटें आहेत, त्यांपैकीं हेटी या नांवाचें जें एक बेट आहे त्यांतील सेंट डॉमिनगो हें एक मुख्य शहर आहे. या शहरामध्यें मूळची वस्ती म्हटली म्हणजे निग्रो लोकांची होय; परंतु कोलंबसानें अमेरिकेचे दरवाजे युरोपियन लोकांना खुले करून दिल्यापासून पुष्कळ युरोपियन लोक ज्याप्रमाणें अमेरिकेंतील इतर ठिकाणीं राहिले होते, त्याप्रमाणें फरेंच लोक सेंट डॉमिनगो येथें वसाहत करून राहिले होते. युरोपियन लोक एखाद्या ठिकाणीं तळ देऊन राहिले म्हणजे त्यांचा कावा कसा असतो, हें कोणाला सांगावयास पाहिजे असें नाहीं. आपण हल्लींच्या सिलोन किंवा आसामाकडे पाहिलें म्हणजे त्या वेळच्या फरेंच लोकांनीं सेंट डॉमिनगो येथील निग्रो लोकांची काय दशा करून टाकिली होती, याची आपल्याला थोडीशी तरी कल्पना येईल. तेथील निग्रो लोकांना फरेंच लोकांनीं पूर्णपणें आपले गुलाम बनवून ठेविलें होतें. त्यांच्यापासून ते हवे तसे श्रम घेत असत आणि त्यांच्या श्रमावर पैसे मिळवून ते श्रीमंत होत असत. इतर बाजारच्या जिनसांप्रमाणें त्या निग्रो लोकांचा गुलाम म्हणून नेहमीं क्रयविक्रय होत असे. फरेंच लोकांचे राजकीय, धार्मिक, वगैरे जे कांहीं कायदे होते त्यांचा फायदा ह्या निग्रो लोकांना कधींही देण्यांत येत नसे, किंवा त्यांना आपल्यापाशीं कोणत्याही प्रकारची खासगी मिळकत बाळगण्याचा हक्क नसे. त्यांना फरेंच लोक निवळ पशूप्रमाणें वागवीत असत. जर कोणी निग्रो गुलामानें यदाकदाचित् लग्न केलेंच तर त्याची बायको आणि

मुलें यांच्यावर त्यांचे धनी जे फरेंच लोक त्यांची सत्ता असे. आणि त्या नवराबायको आणि मुलांना विकण्याची वेळ आली तर तीं निरनिराळ्या ठिकाणीं विकलीं जात असत, आणि त्यांचीं नैसर्गिक प्रेमबंधनें अशा रीतीनें मुद्दाम तोडून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत येत असे; व असें; करण्यांत आपण कांहीं पाप करीत आहों ही कल्पनामुद्धां कधीं त्या फरेंच लोकांच्या मनाला शिवत नसे. त्या फरेंच लोकांची त्या निग्रो गुलामांबद्दल अशीच कल्पना होती कीं, हे आपल्यासारखे मनुष्यप्राणी नाहींत. मनुष्य आणि जनावरें यांच्या दरम्यानची ही कांहीं तरी एक जात आहे, असें समजून त्याप्रमाणें त्यांना वागविण्यांत येत असे. पूर्वीं ग्रीसमधील मोठमोठ्या लोकांच्याजवळ हीलट्स म्हणून लोक असत, किंवा हल्लीं इंग्लिश लोकांपाशीं हिंदुस्थानची प्रजा आहे, त्याचप्रमाणें त्या वेळीं फरेंच लोकांच्या हाताखालीं असले निग्रो गुलाम किती तरी होते! परमेश्वरानें निर्माण केलेल्या मनुष्यांना अशा वाईट रीतीनें वागविण्याचा वास्तविक पाहतां कोणालाही अधिकार नाहीं. तरी पण फरेंच लोक त्या वेळीं ह्या निग्रो लोकांना तशा रीतीनें वागवीत होते. आणि फिरून त्या दुष्कृत्याचें समर्थन करण्यासाठीं ते परमार्थाच्या लांब लांब गोष्टीही सांगत असत. आपण हिंदुस्थानावर राज्य कां करीत आहों, याच्याबद्दल इंग्लिश लोक ज्याप्रमाणें कारण सांगतात कीं, इंडियन लोकांच्या सुरक्षितपणासाठीं आम्हांला ही गोष्ट करणें भाग पडत आहे, आम्हीं यांची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली नाहीं तर दुसरे लोक येऊन यांना छळतील म्हणून आम्हीच यांच्यावर राज्य करीत आहों; त्याचप्रमाणें त्या वेळचे फरेंच लोक, आम्ही या निग्रो गुलामांचें जें संरक्षण करीत आहों, तें केवळ परोपकारासाठीं निरपेक्षबुद्धीनें करीत आहों, असें ब्रह्मज्ञान सांगत असत. स्वार्थासाठीं दुष्कृत्यें करून फिरून त्यांना परोपकाराचें नांव द्यावयाचें ही लबाडी युरोपियन राष्ट्रांना फार दिवसांपासून साधलेली आहे. दक्षिण आफ्रिकेंतील वसाहतींमध्यें हल्लीं इंडियन लोकांना जसा कांहीं मान नाहीं, त्यांनीं युरोपियन लोक सांगतील तेथें राहावें, देतील तें खावें आणि हुकूम बजावतील तें काम करावें, त्याप्रमाणेंच सेंट डॉमिनगो येथील निग्रो लोकांची स्थिति. ऑस्ट्रियांतील लोक हल्लीं जसे एशियाटिक लोकांना तुच्छ मानितात, तसेच फरेंच लोक निग्रो लोकांना त्या वेळीं तुच्छ मानीत असत. परंतु त्यांच्यापासून आपल्या

उंसाच्या मळ्यांची लागवड करून घेण्याला मात्र फ्रेंच लोकांना कांहीं हरकत वाटत नव्हती. युरोपियन अलीकडे बहुतेक बाबतींत आपणा नेटिवांना ज्या रीतीनें वागवितात, त्याच रीतीचें अवलंबन निग्रो लोकांना वागविण्यामध्यें फ्रेंच लोकांनीं केलेलें होतें. सारांश, त्या वेळचें सेंट डॉमिनगो म्हणजे हल्लींचें एक हिंदुस्थानच होय. हिंदुस्थानांतील आपण आपली हल्लींची स्थिति लक्षांत आणिली असतां सेंट डॉमिनगोमधील निग्रो गुलाम कसे होते, हें आपल्याला अगदीं बरोबर कळून येईल.

असो. अशा स्थितीमध्यें सेंट डॉमिनगोमधील निग्रो लोक आपले दिवस कंठीत असतां १७८९ सालीं फ्रान्समध्यें एक राज्यक्रांति झाली. फ्रेंच लोक बाहेर जसे इतरांवर जुलूम करीत होते त्याचप्रमाणें फ्रेंच लोकांवरही फ्रान्समध्यें त्यांचे राजे जुलूम करीत होते. त्या जुलमापासून मुक्त होण्याकरितां फ्रान्समधील तत्त्ववेत्त्यांनीं नवीन नवीन तत्त्वें शोधून काढिलीं. शूर पुरुषांनीं त्या तत्त्वांची अंमलबजावणी करून दाखविली. सर्व लोक सारखे आहेत ह्या तत्त्वाचा फैलाव होऊन फ्रान्स देशामध्यें राज्यक्रांति झाली. फ्रेंच लोकांनीं राजाचे तुरुंग फोडिले आणि खुद्द राजालाच एका राजवाड्यामध्यें कैदी करून ठेविलें. त्या वेळीं इतर ठिकाणच्या लोकांना अशी आशा वाटूं लागली कीं, आतां पृथ्वीच्या पाठीवरील जुलमाचा अंमल संपला. आणि आतां ह्यापुढें जिकडे तिकडे न्याय, नीति व धर्म यांच्या तत्त्वावर आणि समान हक्कांच्या धोरणावर सर्व लोक एक-मेकांशीं वागणार. परंतु ही आशा इतर ठिकाणच्या लोकांपेक्षां सेंट डॉमिनगो-मधील निग्रो लोकांच्या मनामध्यें जास्त प्रबळ झाली होती. आपणा हिंदुस्थानां-तील लोकांना असें वाटतें कीं, इंग्लिश लोक हे प्रतिनिधिसत्ताक राज्यपद्धतीचे अभिमानी असल्यामुळें आपल्यालाही तो हक्क ते देतील, व शिक्षणाचें महत्त्व त्यांना कळलेलें असल्यामुळें आपल्या इकडेही शिक्षणाचा प्रसार ते मोठ्या नेटानें करतील, त्याप्रमाणेंच निग्रो लोकांना वाटत होतें कीं, सर्व लोक सारखे आहेत. हें तत्त्व जर फ्रान्समध्यें एवढें प्राबल्य पावलें आहे, तर आपल्या येथील फ्रेंच लोकही त्याच तत्त्वाचा अंगीकार करून येथील गुलामगिरीची पद्धत बंद करतील. परंतु निग्रो लोकांची ही आशा सफळ झाली नाहीं. इंग्लिश लोक इंग्लंडमध्यें समान हक्काविषयीं आणि न्यायाविषयीं कितीही बढाया मारीत असले, तरी तें हिंदुस्थानांत आल्यावर तीं उदात्त तत्त्वें बऱ्याच प्रसंगीं गुंडाळून

ठेवितात, त्याचप्रमाणें त्या वेळीं फरेंच लोकांची स्थिति झालेली होती. फरेंच लोक फरान्समध्यें समान हक्कासाठीं राजाच्या उरावर बसण्याला तयार झाले होते. परंतु तेच फरेंच लोक सेंट डॉमिनगोमधील निग्रो लोकांना यत्किंचितही सवलत देण्याला तयार नव्हते. यामुळें ते निग्रो लोक अतिशय त्रासून गेले.

आपली जशी हल्लीं एक खोटी कल्पना आहे कीं, आपल्या मागण्यांची येथें कांहीं दाद लागली नाहीं तर आपण विलायतेस जावें आणि तेथील लोकांपुढें तोंडें वांकडीं करावीं म्हणजे आपलें म्हणणें मान्य होईल, त्याप्रमाणेंच त्या निग्रो लोकांच्या डोक्यामध्येंही कोणी हेंच वेड भरवून दिलेलें होतें; व त्यामुळें आपले कोणी तरी प्रतिनिधी फरान्समध्यें गेले तर आपली कार्यसिद्धि होईल अशी एक वेडगळ कल्पना त्यांच्या मनानें घेतलेली होती. त्याप्रमाणें ओजे या नांवाचा एक इसम फरान्समध्यें दाद मागण्याला गेला. आपल्या इकडे साहेब लोक येऊन राहतात आणि कधीं कधीं त्यांचें वांकडें पाऊल पडून आपल्या इकडील महारणी, चांभारणी वगैरेच्या पोटीं छोटे साहेब जन्मास येतात, आणि ते पुढें हाफकॅस्ट वगैरे नांवानें प्रसिद्ध होतात. त्याप्रमाणें सेंट डॉमिनिगोमध्यें फरेंच लोक आणि निग्रो लोक यांच्या शरीरसंबंधापासून मुलॅटो या नांवाची एक जात उत्पन्न झालेली होती. ते धड साहेबांतही मोडत नसत आणि धड काळ्या गुलामांमध्येंही मोडत नसत. अस्सल गोरे लोक ते आपल्याहून कमी दर्जाचे म्हणून त्यांचा तिरस्कार करीत आणि काळे गुलाम ते कमअस्सल बीजाचे म्हणून पाण्यांत पाहत. अशा स्थितींत ते मुलॅटो लोक कधीं फरेंच लोकांशीं मिसळून राहत आणि कधीं त्यांनीं झिडकारिलें म्हणजे निग्रो लोकांमध्यें येऊन मिसळत. प्रस्तुतच्या भांडणामध्यें ते निग्रो लोकांच्याच बाजूला येऊन मिळाले होतें. त्या मुलॅटो जातींपैकीं ओजे हा एक होता. हल्लीं हिंदुस्थानांतील गुलामांच्या हिताकरितां म्हणून ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी या नांवाची जशी एक संस्था विलायतेस स्थापन झालेली आहे, त्याचप्रमाणें सेंट डॉमिनगो येथील गुलामांच्या हिताकरितां त्या वेळीं फरान्समध्यें Society of the Friends of the Blacks या नांवाची संस्था झालेली होती, व त्या वेळच्या फरेंच रेव्होल्यूशनमधील मोठमोठे अतिरथी आणि महारथी हे त्या संस्थेचे सभासद होते. त्यांची ओजे यानें फरान्समध्यें येऊन गांठ घेतली. फरान्समध्यें त्या वेळीं राजाचा अंमल नसून लोकांनीं निवडलेल्या आणि समान हक्कांची बजावणी करणाऱ्या

सभासदांची एक सभा होती. तिचा सर्व फ्रान्स देशावर निःपक्षपातीपणाचा आणि सर्व लोक सारखे आहेत या धोरणावर अंमल चालला होता. त्या सभेपुढें येऊन ओजे यानें विनंति केली कीं, सर्व लोक सारखे आहेत, आणि सर्वांचे हक्क सारखे आहेत, असें जर तुम्ही म्हणतां तर मग तुमची सेंट डॉमिनगो येथील जी वसाहत आहे, तेथें हे नियम तुम्ही कां लागू करीत नाहीं? जर समान हक्काचा कायदा हा ईश्वराच्या घरचा कायदा आहे, तर मग तो सेंट डॉमिनगोमध्येंच कां मोडला जावा? असे अनेक प्रश्न त्यानें त्या सभेपुढें ठेविले परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. त्या वेळीं ओजे यानें त्या सभेपुढें असें बोलून दाखविलें कीं, मी जी तुमच्यापाशीं मागणी मागत आहे, ती न्यायाची आहे. परंतु आमच्या मागण्याला यश येण्याला जर फक्त न्यायच पुरेसा होत नसेल, आणि त्याच्या मदतीला जर हस्तसामर्थ्याचीही अपेक्षा असेल तर त्याचीही आमच्यापाशीं तयारी आहे. असें म्हणून तो सेंट डॉमिनगो येथें परत आला. त्या वेळीं फ्रान्समधील उदात्त तत्त्वांचा सेंट डॉमिनगोमध्यें फारच विपर्यास झालेला त्याच्या दृष्टीस पडला. निग्रो लोकांवर अतिशय जुलूम होऊं लागले होते व त्या जुलमाखालीं निग्रो लोक अतिशय टेकीस आले होते. सर्व लोक सारखे आहेत आणि सर्वांना स्वतंत्र होण्याचा सारखाच हक्क आहे, असें फ्रेंच लोक म्हणतात, तर निग्रो लोकांनींही स्वतंत्र कां होऊं नये, असे प्रश्न ओजे याच्या मनामध्यें उद्भवूं लागले. आणि त्याप्रमाणें त्यानें पूर्ण कायदे-शीर रीतीनें बंडाचें निशाण उभारलें. त्यानें आपल्याजवळ दोनशें लोक गोळा केले, आणि त्यांचा पुढारी होऊन त्यानें तेथील फ्रेंच अधिकाऱ्यांसमोर आपलें म्हणणें मांडलें. फ्रान्समधील राज्यकारभार चालविणाऱ्या सभेनें जीं तत्त्वें मान्य केलीं आहेत, तींच तुम्हीं आम्हांला या वसाहतीमध्येंही लागू केलीं पाहिजेत. आम्हांला स्वतंत्र केलें आहे, असा एक जाहीरनामा काढून ती गोष्ट तुम्ही प्रसिद्ध करा. परंतु तुम्ही जर या गोष्टीला हरकत घ्याल तर आम्ही आपल्यांतील प्रतिनिधी निवडून काढूं आणि तुमच्याशीं लढण्याला तयार होऊं. गोरे फ्रेंच लोक म्हणतात कीं, ह्या काळ्या निग्रो गुलामांच्या बरोबरीच्या योग्यतेला आपण येणें आणि त्यांच्याजवळ बसणें हें आम्हांला कमीपणाचें वाटतें. परंतु आम्ही त्यांना असें विचारतों कीं, सर्व लोक सारख्या दर्जाचे आहेत ह्या तत्त्वाचें प्रतिपादन करून फ्रान्समधील भिकारी लोक जेव्हां तेथील सरदार आणि

धर्माधिकारी लोकांच्या बरोबरीला जाऊन बसूं लागले, त्या वेळीं त्या सरदारांना आणि धर्माधिकाऱ्यांना काय वाटलें असेल, याचा यांनीं कांहीं विचार केला होता काय? जर सर्व लोक सारख्याच दर्जाचे आहेत हें तत्त्व मान्य करावयाचें आहे, तर मग काळे गुलाम कमी दर्जाचे आणि त्यांचे गोरे धनी श्रेष्ठ दर्जाचे, हा भेद कोठून आला? अशा रीतीनें ओजे यानें आपलें म्हणणें तेथील अधिकाऱ्यांपुढें मांडलें. परंतु अधिकाऱ्यांनीं त्या जमलेल्या लोकांना हाकलून लावण्याकरितां आपले कांहीं शिपाई पाठविले. त्यांचा ओजे यानें पराभव केला. तेव्हां फिरून जास्त लोक पाठविण्यांत आले. त्या वेळीं ओजे आणि त्याच्या पक्षाकडील सर्व लोक निरुपाय होऊन पळून गेले आणि ओजे हा त्याच बेटांतील स्पॅनिश लोकांच्या हद्दींत जाऊन दडून राहिला. त्याला पकडून देणाराला बक्षीस लावण्यांत आलें. सर्व लोक सारख्याच दर्जाचे आहेत हें तत्त्व फरान्समध्यें सर्वमान्य झालें होतें. परंतु तें तत्त्व आम्हांला लागू करा, असें ओजे यानें म्हटल्याबरोबर तो मात्र गुन्हेगार झाला! त्या वेळीं फरान्समध्यें जे हुकमत चालवीत होते त्यांना अधिकार कोणी दिला होता? बंड करूनच त्यांनीं तो अधिकार आपल्यालाच मिळवून घेतला होता. परंतु त्याच रीतीनें ओजे हा करूं लागल्याबरोबर तो मात्र अपराधी ठरला, ही युरोपियन लोकांची समान हक्काची आणि सारखेपणाची कशी मजा आहे पहा! स्पॅनिश लोकांनीं ओजे याला आश्रय देऊं नये, म्हणून पुष्कळ प्रयत्न करण्यांत आले. आज ज्यानें काळे निग्रो लोक फरेंच गोऱ्या लोकांविरुद्ध उठविले आहेत तो उद्यां स्पॅनिअर्ड गोऱ्या लोकांविरुद्ध त्यांना उठविणार नाहीं कशावरून? असल्या मनुष्यापासून फरेंच काय आणि स्पॅनिअर्ड काय, सगळ्याच गोऱ्या लोकांना सारखेंच भय आहे. यासाठीं त्याला तुम्ही आमच्या स्वाधीन करा, असा युक्तिवाद सांगितल्यामुळें स्पॅनिश लोकांनीं ओजेला फरेंचांच्या हवालीं केलें. नंतर त्याची चौकशी दोन महिनेपर्यंत चालली होती. सेंट डॉमिनगोमधील गोरे लोक अगदीं उतावीळ झाले होते व आपल्या बरोबरीचे हक्क मागणाऱ्या ह्या उद्दाम मनुष्याचें डोकें केव्हां एकदां उडविलें जाईल असें त्यांना होऊन गेलें होतें. अखेरीस चौकशी होऊन निकाल झाला. असल्या खटल्यांतून काय निकाल व्हावयाचा हें सांगितल्याशिवायच कळण्यासारखें असतें. ज्या कृत्याबद्दल फरान्समध्यें लफाएट, मिरॅबो हे मोठे देशभक्त म्हणून त्यांची दिगंत कीर्ति झाली, त्याच कृत्याबद्दल

सेंट डॉमिनगोमध्यें ओजेला देहान्तशासनाची शिक्षा मिळावी, असा ह्या जगांतील न्यायाचा चमत्कार आहे! ओजे तुरुंगांत असतांना त्याच्या शत्रूंनीं त्याला अतिशय छळलें. व त्यानें आपल्या साथीदारांचीं नांवें सांगावीं म्हणून त्याचे फार हाल करण्यांत आले; त्या वेळीं त्यानें पुढें लिहिल्याप्रमाणें उत्तर दिलें :—तुमची आशा व्यर्थ आहे. अशा रीतीनें माझे हाल केले असतां मी आपल्या साथीदारांचीं नांवें तुम्हांला सांगेन ही आशा तुम्ही सोडून द्या. मी एकाही साथीदाराचें नांव सांगणार नाहीं. मी कोणाचें म्हणून नांव सांगूं? माझ्या पक्षाचे साथीदार जिकडे तिकडे पसरलेले आहेत. मनुष्यप्राण्यांचा छळ करणारे असे जे जुलमी अधिकारी त्यांच्या जुलमाचा द्वेष करणारे लोक जेथें जेथें आहेत तेथें तेथें माझे साथीदार आहेतच. यानंतर तो दुसरें कांहीं एक बोलला नाहीं. फक्त त्यानें पुढील उद्‌गार काढले. ते हे कीं, सर्व लोक सारख्या दर्जाचे आहेत, आणि प्रत्येकाला स्वतंत्र होण्याचा हक्क आहे. अखेरीस त्याला एखाद्या बदमाष गुन्हेगाराप्रमाणें मरणाची शिक्षा देण्याचें कायम ठरलें. त्या वेळीं तो म्हणाला :—माझे सर्व देशबांधव स्वतंत्र व्हावे आणि ते सगळे सारख्या दर्जाचे व्हावे ही जी माझ्या अंतःकरणांतील इच्छा ती शेवटास नेण्याकरितां मी प्रयत्न करीत असतां तुम्ही मला गुन्हेगार ठरवून माझी इतर सामान्य गुन्हेगारांमध्यें गणना करूं पाहतां, हें तुम्हांला उचित नाहीं. असो. तुम्ही माझा जीव घेत आहां, खुशाल घ्या, परंतु तेवढ्यानें तुम्ही निर्भय झालां, असें मात्र समजूं नका. माझें जें रक्त तुम्ही जमिनीवर सांडाल, त्या रक्तापासून माझा सूड उगविणारे पुरुष उत्पन्न झाल्यावांचून कधीं राहावयाचे नाहींत. असें म्हणून तो मरणाला सिद्ध झाला. त्याला देहान्तप्रायश्चित्त दिल्याबद्दलची बातमी फरान्समध्यें पोंचल्यानंतर तेथें त्याच्याबद्दल दोन मतें पडलीं. कोणी म्हणूं लागले कीं, ओजे हा गळेकापू होता, आणि त्याबद्दल त्याचा शिरच्छेद झाला हें योग्यच झालें. दुसऱ्या पक्षाचें असें म्हणणें पडलें कीं, ओजेबद्दल असें मत देणें बरोबर नाहीं. जर ओजे अपराधी असेल तर आपणही सर्व त्याच्यासारखे अपराधी आहों असें म्हटलें पाहिजे. जो आपल्या देशबांधवांकरितां स्वातंत्र्य मिळवून देण्याची खटपट करीत होता त्यानेंही जर त्या कृत्याबद्दल सुळावर चढलें पाहिजे, तर आपण सर्व फरेंच लोकांनींही तेथेंच चढावयाला नको काय?

अशा रीतीनें फरान्समध्यें ओजेबद्दल दोन भिन्न भिन्न मतें झालीं होतीं. परंतु सुदैवानें सेंट डॉमिनगोमधील त्याच्या देशबांधवांमध्यें त्याच्याबद्दल एकच मत होतें. ओजे हा आपल्या सगळ्या निग्रो लोकांच्या स्वतंत्रतेसाठीं झटत होता, तो मोठा देशभक्त होता, व तो आपलें सर्वांचें हित करणारा असा आपला मित्र होता अशी त्याच्याबद्दल डॉमिनगोमधील सर्व निग्रो लोकांची पूर्ण पूज्य-बुद्धि होती. आणि म्हणूनच ओजेच्या मृत्यूचा सूड घेण्याचा त्या सर्व लोकांनीं निश्चय केला. सर्व लोक सारख्या दर्जाचे आहेत, आणि सर्वांना स्वतंत्र होण्याचा हक्क आहे. ही फरेंच तत्त्ववेत्त्यांचीं तत्त्वें सेंट डॉमिनगोमधील निग्रो लोकांच्या मनांत शिरल्यापासून तीं तत्त्वें त्यांना दिवसा स्वस्थ बसूं देत नव्हतीं, आणि रात्रीं स्वस्थ झोंप लागूं देत नव्हतीं. हीं तत्त्वें खरीं आहेत आणि गोऱ्या लोकांच्या बरोबरीचे आणि स्वतंत्र होण्याचा हक्क आपल्याला आहे, अशी त्या लोकांची खात्री होऊन गेली होती. आपला अमुक एक हक्क आहे, अशी एखाद्याच्या मनाची खात्री झाली आणि तो हक्क त्याच्या शत्रू-कडून त्याला प्राप्त झाला नाहीं, म्हणजे त्याच्यासारखा भयंकर मनुष्य दुसरा कोणी नाहीं. तो आपल्या हक्कासाठीं काय करील आणि काय न करील याचा कांहीं एक नेम नाहीं. अशा स्थितींत शहाण्या माणसानें त्याचा हक्क त्याला द्यावा हाच उत्तम मार्ग होय. परंतु फरान्स स्वतःच्या स्वतंत्रतेसाठीं इतकें उत्सुक झालेलें असूनही आपण अंगीकारिलेलीं तत्त्वें डॉमिनगोमधील निग्रो लोकांना लावावीं, ही बुद्धि फरेंच लोकांना होईना. फरेंचांसारख्या उदार आणि उदात्त लोकांना आणि ते स्वतः राज्यक्रांतीच्या लहरीमध्यें असतांही आपल्याबरोबरीचे हक्क आपल्या कॉलनींतील मूळच्या लोकांना देण्याची बुद्धि होईना, तर मग ती इतरांना कोठून होणार! सारांश, सारखे हक्क, स्वतंत्रता, वगैरे गोष्टी ह्या अशा आहेत कीं, त्या मागून कोणी कोणाला देत नाहींत. त्या स्वतःकरितां ज्यांच्या त्यांनीं स्वकष्टानें पैदा करून घेतल्या पाहिजेत. हें तत्त्व डॉमिनगोमधील निग्रो लोकांना कळलें. ते लोक ज्या दुबळ्या स्थितीमध्यें होते त्या स्थितींत सर्व लोक सारख्या दर्जाचे आहेत आणि सर्वांना स्वतंत्र होण्याचा हक्क आहे, हीं तत्त्वें लोकांना कितीही कळलेलीं असलीं, तरी त्यांची अंमलबजावणी करून घेण्याला त्यांच्यापाशीं कांहीं एक साधन नसतें. अशा स्थितींत बंड हेंच त्यांचें साधन असतें. ही गोष्ट लक्षांत आणून सेंट डॉमिनगो-

दिकांचें नांवहि न राहतां राजा आणि प्रजा या दांपत्याचा गांधर्व पद्धतीनें विवाह होऊन तीं उभयतां या पृथ्वीवर चिरकाल सुखानें नांदत असावींत.

———

## बॉक्सर पुढाऱ्यांचें देहान्तशासन : : १६

नाहीं होय करतां करतां अखेरीस चीनमधील बारा प्रमुख लोकांना ठार मारण्याबद्दल सर्व ख्रिस्ती राष्ट्रांनीं आपल्या मनाचा निश्चय केला, व त्याप्रमाणें त्यांनीं त्यांपैकीं दोघांना तर येशूख्रिस्ताच्या भेटीला पाठविलें. त्याबद्दलची हकीकत इंग्रजी पत्रांतून हल्लीं प्रसिद्ध झाली आहे. गेल्या जुलई महिन्यांत ज्या ठिकाणीं परकीय प्रधानांचा खून झाला होता, त्याच ठिकाणीं ह्या लोकांना देहांतशासन देण्यांत आलें. दुपारीं तीन वाजावयाचे सुमारास युरोपियन राष्ट्रांचे कामगार व प्रमुख चायनीज अधिकारी त्या ठिकाणीं जमले. त्या ठिकाणाभोंवतीं लष्करी लोकांनीं गराडा दिलेला होता. व त्या लष्करी लोकांच्या सभोंवतीं इतर तमाशा पाहण्याकरितां जमलेल्या लोकांचा मोठा समुदाय होता. व गर्दींतून आपल्याला कदाचित् चांगलें दिसणार नाहीं, म्हणून पुष्कळ लोक घरावर चढून बसले होते. ज्यांना शासन द्यावयाचें होतें, ते चिनी सरदार जपानी शिपायांच्या एका तुकडीच्या पाहऱ्यामध्यें होते, व त्या जपानी शिपायांनींच त्यांना मारावयाच्या ठिकाणीं आणलें. प्रेसिडेंट ऑफ दि मिनिस्ट्री ऑफ जस्टिस ( न्यायखात्याचे मुख्य ) हे अधिकारी सरकारच्या वतीनें तेथें हजर होते. त्यांनीं त्यांच्या मरणाची शिक्षा त्यांना वाचून दाखविली. पहिल्यानें सरदार चिसू ह्यांचें डोकें उडविण्यांत आलें. ह्यांच्या शरीराचा बांधा उंच असून अंगावरील पोषाख सरदारी थाटाचाच होता. त्यांचें वय बरेंच असून त्यांच्या दाढीचे केस पिकलेले होते. [illegible] ख्रिश्चन

न्यायदेवतेपुढें कशाचाच उपयोग झाला नाहीं. आणि एका क्षणामध्यें त्यांचें डोकें धुळीमध्यें येऊन पडलें. नंतर दुसरा बॉक्सर लोकांचा पुढारी सूचेंग याला पुढें आणलें. ह्याच्याबद्दल इंग्लिश पत्रें असें वर्णन देतात कीं, तो आधींच भीतीनें अर्धमेला झालेला होता. व त्याचे डोळे मिटलेले होते. इंग्लिश पत्रांचे असेहि तर्क आहेत कीं, त्याच्या मरणाच्या पूर्वी त्याला कोणी तरी चोरून अफू आणून दिलेली असली पाहिजे. त्यांचा देहांत झाल्यानंतर लष्करी लोक निघून गेले व तमासगीर चायनीज लोक पुढें सरसावले. त्या गर्दींतून मयत माणसांच्या आप्तांना त्यांचीं प्रेतें उचलून नेण्याला मात्र बराच त्रास पडला. ही हकीकत वाचली म्हणजे ह्यांत ख्रिस्ती लोकांच्या क्रूरपणाचा अधिक तिरस्कार करावा, किंवा चिनी लोकांच्या नेभळटपणाबद्दल जास्त कींव यावी, हें ठरविणें फार कठीण आहे. सर्व चीन देश—चीनचा राजा, चीनची राणी, आणि चीनचे लोक—हे सर्व जण युरोपियन राष्ट्राच्या विरुद्ध लढाई करण्यासाठीं हातांत शस्त्र घेऊन उठले होते असें जर आहे, तर न्यायखात्याचा चिनी मुख्य अधिकारी चीन सरकारच्या तर्फेनें सदर बॉक्सर पुढाऱ्यांना देहांत शासनाच्या शिक्षेचा हुकूम वाचून दाखविण्यासाठीं येतो, ह्याचा अर्थ काय? सर्वांनीं मिळून केलें आणि अखेरीस आपण न्यायाचा हुकूम फरमाविण्यासाठीं पुढें येऊन दुसऱ्यांना मात्र तोंडघशीं दिलें, असें हें होत नाहीं काय? पण हेंहि असो. चिनी सरकारला एकंदर स्थिति लक्षांत आणून तसेंहि करणें कदाचित् भाग पडलें असेल. परंतु बॉक्सर पुढाऱ्यांचीं डोकीं उडविण्याच्या वेळीं तमाशा पाहणाऱ्या चिनी लोकांची इतकी गर्दी कशाला? तो तमाशा होता काय? आपल्या पुढाऱ्यांना मारलेलें पाहणें, हा जर तमाशा म्हणून चिनी लोकांना वाटत असेल, तर चिनी लोकांनो! तुमच्या अभ्युदयाचे दिवस आमच्यासारखेच अजून फार लांब आहेत. ज्या गोष्टी नुसत्या ऐकल्यापासून देखील तुमचीं मनें होरपळून जावयाला पाहिजे होतीं, त्या गोष्टी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहण्यासाठीं तुम्ही घरावर चढतां, ह्याच्यापेक्षां राष्ट्राच्या पतित अवस्थेबद्दल आणखी दुसरें प्रमाण काय पाहिजे? युरोपियन राष्ट्रें जें करीत आहेत, तें ठीकच आहे. पण चिनी लोकांनों, तुम्ही करीत आहां तें तितकेंच ठीक आहे काय? तुम्ही कोणाचीं डोकीं उडविलेलीं पाहावयाला जातां? जे तुमच्या उत्कर्षासाठीं आपल्या जिवावर

डॉमिनगोचें लोकसत्तात्मक राज्य या नांवानें त्यांची स्वातंत्र्याची इमारत जगाच्या इतिहासामध्यें मह्शूर आहे.

---

## उच्च पर्वताच्या उच्च शिखरावर : : १४

१७८१ मध्यें सत्तरींतील राणे व सरदेसाई यांनीं बंड करून त्या प्रांतांतील फिरंगी लोकांचा अधिकार नष्ट करण्याचा प्रसंग आणला होता. गोवें सरकारनें त्यांना वैठा पगार, मोकाशे, इनामें वगैरे देण्याचें कबूल करून शांत केलें. १८५२ सालीं राणे व सरदेसाई यांच्या कांहीं मागण्या गोव्याच्या सुभेदारानें अमान्य केल्या, म्हणून दिपाजी राणे यांचे नेतृत्वाखालीं त्यांनीं फिरून बड केलें. बंडवाल्यांनीं श्रीमंतांची मालमत्ता लुटली. राण्यांच्या नांवाखालीं लुटारू लोकांनीं पुष्कळ धुमाकूळ घातला. गोंव्याच्या सरकारनें लष्करी कायदा जारी करून बंडवाल्यांचा पाठलाग सुरू केला. या वेळीं फिरंगी सैन्यांत देशी लोकांचा मोठा भरणा होता. पाठलाग करतांना सरकारी लोकांची बंडवाल्यांबरोबर गाठ पडली तर ते बंडवाल्यांना पळून जाण्यास संधि देऊं लागले. अनेक बंडवाल्यांना गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. शेवटीं सरकारनें दिपाजीबरोबर तह करून त्यास पेन्शन ठरवून दिलें आणि नंतर बंड शांत झालें.

पुढील प्रसंग हा एका गृहस्थाच्या आत्मचरित्रांतील एक लहानसा भाग आहे. तरी पण त्यापासून वाचकांना क्षणभर करमणूक आणि बोध प्राप्त होणार नाहीं असें नाहीं. सदर गृहस्थ म्हणतोः—

मी मूळचा गोवें प्रांतीचा राहणारा. माझी जात ब्राह्मण. लहानपणीं आईबापांनीं घरांत जुन्या चालीचें थोडेंसें शिक्षण मला दिलें होतें; व नंतर पोर्तुगीज सरकारच्या शाळेंत मला थोडेंसें पाश्चिमात्य शिक्षणाचेंही वळण लागलें होतें. हें आपलें आणि लोकांचें, घरचें आणि बाहेरचें, असें दोन्ही प्रकारचें शिक्षण मिळून मला माझ्या विसाव्या वर्षाच्या सुमारास जगांत काय

चाललें आहे, याच्याबद्दल थोडथोडे कळूं लागलें. मला इतिहास वाचण्याची बरीच गोडी असे. त्यामुळें आपण कोण, आपला देश कोणता, तो हल्लीं कोणत्या स्थितींत आहे, वगैरे गोष्टींबद्दलचेही विचार तेव्हांपासून माझ्या मनांत येऊं लागले. प्रथमतः हे विचार फारसे वारंवार माझ्या मनांत येत नसत. परंतु इतिहासाच्या पुस्तकांतून मन काढून वस्तुस्थितीचीं पुस्तकें वाचण्याकडे मी आपल्या डोळ्यांचा जसजसा जास्त उपयोग करूं लागलों, तसतसे हे विचार माझ्या मनांत आल्यापासून मला एक प्रकारचें स्फुरण आलें. माझी दृष्टि विस्तीर्ण झाली. माझ्या आशा अपरंपार झाल्या. आपल्यापुढें कर्तव्यकर्माचें अतिशय मोठें विस्तीर्ण मैदान आहे, व त्यामध्यें आपण स्वैरगतीनें संचार करूं, अशी माझ्या मनाला मोठी उमेद वाटूं लागली. परंतु ही मनोराज्याची स्थिति फार दिवसपर्यंत टिकली नाहीं. हळूहळू मला जगाचा अनुभव येऊं लागला; व माझ्या प्रांतांतील लोकांच्या स्वभावाचें परिज्ञान मला दिवसेंदिवस जास्त येऊं लागलें. आणि त्यामुळें आपल्या मनांतील आशा सफळ होण्याचा कांहीं एक रंग नाहीं, असें माझ्या मनाला उत्तरोत्तर वाटूं लागलें. हल्लीं सर्वच हिंदुस्थान देश परकीय लोकांचा गुलाम बनून राहिला आहे. तेव्हां आतां हिंदुस्थानच्या अमुक एक भागाला शेखी मिरविण्याला विशेष जागा आहे, असें नाहीं. परंतु तीन-चारशें वर्षांपूर्वीं तशी स्थिति नव्हती. अशा त्या वेळीं गुलामगिरीचा पहिला शिक्का आमच्या गोवें प्रांतावर बसला ! आम्ही सगळ्यांत पहिले गुलाम ! परकीयांनीं येऊन पहिल्यानें आपलें पाश्चिमात्य राज्य स्थापन करून ज्या प्रदेशाला पावन केलें तो आमचा गोव्याचा प्रदेश होय ! हिंदुस्थानच्या गुलामगिरीच्या रांगेंत अग्रगामीपणाचा मान आम्हांला ! हिंदुस्थानांतील सर्व गुलाम एकत्र बसून गुलामगिरीचे वेदोक्त मंत्र म्हणण्याचा प्रसंग आल्यास ‘ श्रीमन्महा० ’ म्हणून सुरवात करण्याचा अधिकार आमचा ! अल्बुकर्क आणि सेंट झेविअर यांच्या हातांत राज्यविस्तार आणि धर्मप्रसार या दोन बाबतींमध्यें सांपडलेलीं आम्ही मेंढरें किती उत्तम आहों, हें युरोपियन जगाच्या निदर्शनास आणून देऊन, फरेंच, इंग्लिश वगैरे लोकांना आम्ही हिंदुस्थानांत येण्याविषयीं बोलावणें धाडलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं ! आमच्यासारखेच हिंदुस्थानांतील बाकीचे लोक अजागळ आहेत व आमच्यासारखीच हिंदुस्थानांतील बाकीची जमीन

कोपरानें खणली जाण्यासारखी आहे हें आम्हीं इतर पाश्चिमात्य राष्ट्रांना दाखवून दिलें, आम्हीं त्यांना हिंदुस्थानचे बंद असलेले दरवाजे उघडून दिले! इतकें आमच्या हातून झालें असूनही आम्ही हिंदुस्थानचें काय काय अकल्याण करण्याला कारणीभूत झालों आहों, याची माझ्या देशबांधवांपैकीं कोणालाही कल्पना येत नाहीं, हें पाहून मला अतिशय वाईट वाटूं लागलें. माझ्या जन्मभूमीनें आपल्याला लागलेला गुलामगिरीचा डाग धुऊन टाकण्यामध्यें पहिला नंबर मिळवावा, अशी माझी महत्त्वाकांक्षा होती; परंतु त्याचीं कांहीं एक चिन्हें न दिसतां उलट परकीय आणि स्वकीय लोकांच्या कामवासना तृप्त करून पापाचरण वाढविण्याच्या कामामध्येंच माझ्या जन्मभूमीचा पहिला नंबर लागलेला पाहून तर माझी अतिशयच निराशा झाली. आशेपासून निराशा म्हणजे पर्वताच्या शिखरापासून पर्वताच्या पायथ्यापर्यंतचा कडेलोटच होय. ह्या कडेलोटामुळें माझ्या मनाच्या अगदीं चिंधड्या होऊन गेल्या, व स्वदेशांत चैन पडेनासें झालें. तेव्हां घायाळ झालेल्या आणि ठेचलेल्या मनाला औषधोपचार करण्यासाठीं म्हणून उरलेलें आयुष्य तीर्थयात्रा करण्यांत घालवावें असें मनांत आणून मी घरांतून बाहेर पडलों व बरींच वर्षें अशा रीतीनें घालविलीं.

परंतु सुमारें सात-आठ वर्षांपूर्वीं मला अशी बातमी कळली कीं, आपल्या प्रांतांतील कांहीं शूर मराठे सरदारांनीं गोव्यामध्यें फिरून आपलें स्वराज्य स्थापन करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. ही बातमी ऐकून फिरून माझी चित्तवृत्ति पालटली व मीं आपल्या जन्मभूमीला परत येण्याचा निश्चय केला. उत्तर हिंदुस्थानांतून कोंकणाच्या सरहद्दीपर्यंत येण्याला मला बरेच दिवस लागले. परंतु अखेरीस मी आपल्या जन्मभूमीच्या जवळ जवळ येत चाललों तेव्हां कोंकण आणि देश यांना एकमेकांपासून विभक्त करणारा सह्याद्रि पर्वत मला वाटेंत लागला. त्या पर्वतावर चढतां चढतां मी अगदीं थकून गेलों. तरी पण पायांना होत असलेले श्रम तेथील एकंदर वनश्रीच्या योगानें माझ्या मनाला फारसे जाणवले नाहींत. एक डोंगर चढून जावें, तों दुसरा डोंगर त्याच्यापुढें उभा आहेच, असा क्रम चालला होता. अखेरीस कितीही डोंगर ओलांडले तरी हे संपावयाचेच नाहींत, असें मला वाटूं लागलें. तरी पण मनुष्याची सहनशक्ति ही सर्वांना ओलांडून जाईल, यांत शंका नाहीं. मी निराश न होतां तशीच पुढें वाट चालू लागलों तरी डोंगरांचीं वळणें संपेनात. दऱ्या, खोरीं,

डोंगर, कडे, खिंडी हीं एकामागून एक आपलीं तयारच आहेत? तशांतच संध्याकाळची वेळही अगदीं जवळ जवळ येत चालली; आणि मधूनमधून वन्य श्वापदांच्या आरोळ्याही दुरून ऐकू येऊं लागल्या. अशा परिस्थितींत माझ्या मनांतील धैर्य संपत आलें तरी पण वाट सपेना. अखेरीस एक दोन वळणांतून वर चढून गेल्यानंतर जवळच मला एक खिंड दिसली व तेथें या उच्च पर्वताच्या उंचीचा शेवट झाला असावा असें माझ्या मनानें घेतलें. म्हणून कसाबसा मी तेथपर्यंत एकदांचा गेलों.

मी तेथें गेल्यावर मात्र माझ्या सर्व श्रमांचा परिहार झाला. तेथील एका उंच आणि स्वच्छ अशा खडकावर मी विश्रांति घेण्याकरितां बसलों. त्या वेळीं तेथून जी अपूर्व शोभा दिसत होती तिची इतरांना कल्पना येण्याला त्यांनीं तसल्याच एखाद्या ठिकाणीं जाऊन बसलें पाहिजे. एवढा वेळपर्यंत माझे डोळे आणि माझी जन्मभूमि यांच्यामध्यें जें एक डोंगराचें शिखर आड आलेलें होतें, तें एखाद्या रंगभूमीवरील पडद्याप्रमाणें बाजूला सरून जाऊन माझ्या दृष्टीला तेथून किती तरी आल्हादकारक देखावे दिसूं लागले! त्या डोंगराच्या आडून निघून मी त्या खिंडीच्या तोंडाशीं गेलों, तों माझ्या जन्मभूमीवरून वाहत आलेला वारा मला पहिल्यानें भेटला. त्या माझ्या देशबांधवानें—मी ज्या जन्मभूमींत जन्म पावलों त्याच जन्मभूमींत जन्म पावलेल्या त्या वाऱ्यानें—माझ्या सर्व अंगाला आलिंगन दिलें, आणि खऱ्या बंधूप्रमाणें वाटेच्या अतिशय श्रमामुळें माझ्या शिरोभागावर उत्पन्न झालेले घर्मबिंदु त्यानें आपल्या हातानें पुसून टाकिले. त्या वेळीं मला जो आनंद झाला, तो काय सांगावा! त्या वाऱ्याची झुळूक माझ्या अंगाला लागतांक्षणींच हा माझ्या देशचा वारा म्हणून मीं त्याला ओळखिलें. आणि आपल्या देशबांधवाप्रमाणें मी त्याच्यासंबंधानें प्रेम प्रदर्शित करूं लागलों. मला माझी जन्मभूमि सोडून वीस पंचवीस वर्षें होऊन गेलीं होतीं. तेव्हां इतक्या अवधीनंतर मला माझ्या जन्मभूमीकडचा वारा भेटला तोदेखील मला अधिक वाटला. अशा रीतीनें ह्या एका प्रथमदृष्ट देशबांधवाची भेट झाल्यानंतर मी आपली दृष्टि माझ्यासमोर दिसणाऱ्या अफाट आणि हृदयंगम अशा त्या भूप्रदेशाकडे वळविली. पुष्कळ दिवसांनीं भेटलेल्या त्या वाऱ्यानें आधींच माझी मनोवृत्ति अगदीं उल्लसित होऊन गेली होती. संध्याकाळचा मंद वायु वाहूं लागला

असतां त्याजवर लहान मुलांनीं सोडलेला पतंग जसा उच्छृंखल वृत्तीनें वर-खालीं उड्या मारीत असतो त्याप्रमाणें माझ्या मनाची त्या वेळीं स्थिति झाली होती. तो मंजुळ वारा, तो रमणीय प्रदेश, ती शांत वेळ, तें शून्यस्थान, तें निर्जन अरण्य, आणि ती अद्भुत सृष्टिरचना या सगळ्यांनीं मिळून माझें मन क्षणभर माझ्या पंचभौतिक देहांतून काढून कोणीकडे नेलें होतें, आणि ते त्याचें काय करीत होते याचें मला त्या वेळीं बिलकुल भान नव्हतें. नदीच्या पृष्ठभागावर पुराच्या पाण्यांत उत्पन्न झालेल्या भोंवऱ्यांत जसें एखादें फूल सांपडावें, किंवा जमिनीच्या पृष्ठभागावर दोन दोहोंकडून वाहत येणाऱ्या वाऱ्यांच्या संघर्षणा-पासून उत्पन्न होणाऱ्या धुळीच्या भोंवऱ्यामध्यें जसें एखादें कोंवळें पान सांपडावें, त्याप्रमाणें तेथील त्या देखाव्याच्या, सौंदर्याच्या आणि शांततेच्या भोंवऱ्यामध्यें माझें मन सांपडून तें चक्राकार भ्रमण करीत करीत किती उंच उडालें होतें आणि त्याची काय दशा झाली होती, याची मला कांहीं एक कल्पना नव्हती. तरी पण माझ्या डोळ्यांनीं आपला व्यापार बंद ठेवला नव्हता. आपल्या जन्म-भूमीचें पुष्कळ वर्षांनीं फिरून दर्शन होणार, म्हणून माझे डोळे अधिक उत्सुक झालेले होते. इतक्यांत त्या खिंडीच्या रूपानें त्या पर्वतानें आपला दरवाजा उघडून त्याच्या दोन फळ्या दोहोंकडे सारून माझी जन्मभूमि मला दाखविली, तेव्हां माझा आनंद माझ्या पोटांत राहीनासा झाला. माझी जन्मभूमि तेथून माझ्या-समोर दिसू लागली. ज्या नद्यांचें मी अनेक वेळां पाणी प्यालों होतों, ज्यांच्या पाण्याचें माझ्या अंगामध्यें रक्त बनलें होतें, आणि ज्यांच्या पाण्यामध्यें मी लहानपणीं आपल्या सोबत्यांसह शाळेंत जाण्याचें चुकवून पोहत बसत असे, त्या माझ्या जन्मभूमींतील नद्या तेथून मला दिसल्या. परंतु मी जेथें होतों, तेथून त्या फार दूर होत्या. त्यामुळें त्यांचे सूक्ष्म झालेले आणि नागमोडी चळणानें वाहत जाणारे प्रवाह मला अगदीं हुबेहूब सर्पाकृति दिसत होते. तसेंच त्या पर्वताच्या शिखरावरून माझें गांव, त्याच्याच पिछाडीला असलेला माझा लहानसा डोंगर, आणि त्यावरचीं माझीं लहान लहान झाडें, मी पक्कीं ओळखलीं. ज्या देशांतून मी लहानपणीं नाचलों बागडलों आणि हिंडलों फिरलों, आणि ज्या शेतांतील धान्यानें माझ्या अंगांतील मांसाची रचना केली, तीं शेतें मीं तेथून पाहिलीं. ह्याच्यापेक्षां पलीकडचें वास्तविक माझ्या डोळ्याला कांहीं दिसत नव्हतें, किंवा माझ्या कानाला कांहीं ऐकूं येत नव्हतें. तरी पण

इतक्या अंतरावरून दिसण्याला अशक्य अशा गोष्टी मी पाहत होतों, आणि ऐकूं येण्याला अशक्य अशा गोष्टी मी ऐकत होतों, असें मला वाटलें. तेथून मीं आपल्या घरचीं सर्व माणसें पाहिलीं. वडील माणसांना मीं प्रणिपात केले आणि माझ्या गुडघ्याशीं येऊन उभ्या राहिलेल्या लहान लहान मुलांना मीं वर उचलून त्यांचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेतलें. मला पाहून हंबरणाऱ्या माझ्या गोठ्यांतील गाईच्या पाठीवरून मीं हात फिरविला, आणि त्यांच्या नवीन प्रसूत झालेल्या कालवडींना पुष्कळ वेळ गोंजारून कोंवळा चारा खाण्याला त्यांना शिकविलें. माझे पूर्वींचे मित्र मला भेटावयाला आलेले मीं पाहिलें; व त्यांनीं मध्यंतरीं झालेल्या घडामोडींच्या सांगितलेल्या हकीकती मीं ऐकल्या. आमच्या शेजारचीं पाजारचीं अनेक वृद्ध माणसें जग सोडून गेल्याची दुःखकारक बातमी मीं ऐकली आणि त्यांच्या ऐवजीं माझ्या ओळखीचीं नसलेलीं अशीं अनेक नवीन नवीन लहान मुलें या जगांत आलेलीं मीं पाहिलीं. लहान झाडें मोठीं झालेलीं आणि मोठीं झाडें वाळून गेलेलीं, नवीन घरें जुनीं होत चाललेलीं आणि जुनीं घरें नाहींशीं झालेलीं, नवीं शेतें पाडलेलीं आणि जुन्या शेतांचे बांध बदललेले, जेथें पूर्वीं चांगली वाट होती तेथें गवत उगवलेलें आणि नवीन ठिकाणींच वाटा मळलेल्या, असे माझ्या गांवामध्यें अनेक प्रकारचे फेरफार झालेले मला त्या पर्वताच्या शिखरावरून दिसले!

असा हा सगळा प्रकार मी आपल्या दृष्टीनें आणि कल्पनेनें पाहून मनामध्यें फारच गहिंवरलों. माझी जन्मभूमि ही अजूनही गुलामगिरीमध्येंच होती; व आपल्या पायांतील गुलामगिरीच्या बिडया तोडून टाकण्यासाठीं ती कांहीं प्रयत्न करीत नाहीं, म्हणून रागानें संतापून व तिचा त्याग करून आज वीस-पंचवीस वर्षेंपर्यंत मी दूर देशांत राहून तीर्थयात्रा करीत हिंडत होतों. तरी पण प्रत्येक तीर्थाच्या पाण्यांत आपलें मन मलिन वस्त्राप्रमाणें धुऊन प्रत्येक देवाच्या चरणीं तें एखाद्या निर्मल पुष्पाप्रमाणें अर्पण करण्यामध्यें मी नेहमीं व्यग्र झालेलों असतांनाही रात्रीं निजलों म्हणजे ज्या जन्मभूमीची मला सदोदित स्वप्नें पडत असत, आणि तिच्यावरील परकीय जुलूम पाहून मी स्वप्नामध्येंही रडत असे, ती माझी जन्मभूमि मला प्रत्यक्ष दिसल्यानंतर माझ्या मनाला काय वाटलें असेल, हें मी शब्दांनीं सांगणें शक्य नाहीं. पूर्वीं जशी मला ती प्रियकर वाटत होती, तशीच ती ह्या वेळेसही वाटली, व तिला उद्देशून माझ्या तोंडून असे उद्गार

निघालें कीं, तुझ्यावर परकीयांचा जुलूम होत असला आणि तूं परकीयांच्या अमलांत असलीस, तरीही तूं मला माझ्या प्राणाप्रमाणें प्रिय आहेस. तुझ्यावर परकीय लोक जुलूम करताहेत, म्हणून तर मीं तुझ्याबद्दल मनामध्यें जास्त प्रेम बाळगून तुला तुझ्या हालांतून सोडविण्याचा जास्तच प्रयत्न केला पाहिजे. तो प्रयत्न माझ्या हातून सफळ झाला नाहीं, तर तूं माझ्या ज्या असंख्य देशबांधवांना जन्म दिला आहेस, आणि ज्यांच्या शरीरांतील हाडें हीं तुझ्यांतील तत्त्वांपासून बनलेलीं आहेत, त्यांच्यापैकीं कोणी तरी तुझे पांग फेडणारा निघेल यांत शंका नाहीं. अशा रीतीनें माझ्या जन्मभूमीचें शांतवन करून मीं आपली दृष्टि दुसरीकडे वळविली.

मी ज्या ठिकाणीं उभा होतों, त्या ठिकाणावरून पाहिलें असतां पृथ्वी आणि आकाश यांच्या बहुतेक मध्यभागीं मी होतों असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतक्या उंच ठिकाणावर चढून गेलेल्या मनुष्याचें लक्ष पूर्वसंबंधानुसार पृथ्वीतलाकडे कांहीं वेळपर्यंत लागलें तरी तें आकाशांतील आणि आसपासच्या सृष्टिसौंदर्याकडे फिरून माघारें वळणार नाहीं, हें अगदीं अशक्य आहे. पृथ्वीतलावरून माझें मन निघून आसमंतात् पसरलेल्या व भूतलापासून तो गगनतलापर्यंत भरून राहिलेल्या सृष्टिचमत्कारांकडे लागलें. माझा देह जड आहे, ही कल्पना मी क्षणभर विसरलों. आणि तेथें स्वैर गतीनें संचार करणाऱ्या वाऱ्याप्रमाणें मीही जिकडे तिकडे फिरत आहें, असें मला वाटलें. त्या स्थळाचा अद्भुतपणा पाहून माझें डोकें भ्रमण पावूं लागलें. मी जेथें उभा राहिलों होतों, तेथून मला दोन-तीनशें तरी दऱ्या दिसत होत्या. एखाद्या गर्विष्ठ माणसाप्रमाणें आपल्या माना वर करून माझ्यासभोंवतीं डोंगर तर किती बसले होते, याची गणना त्या माझ्या गोंधळून गेलेल्या मनाला मुळींच करतां येईना. तसेंच कित्येक डोंगरांच्या शिखरावरून मोठमोठ्या राजांनीं बांधलेले किल्लेच पांच-पन्नास मला दिसत होते. पूर्वींच्या राजांनीं एकही असा डोंगर ठेवला नव्हता कीं, जेथें माऱ्याची जागा असून त्यांनीं त्यावर किल्ला बांधला नव्हता. जिकडे पाहावें तिकडे डोंगर, किल्ले, कडे, दऱ्या, खोरीं, यांच्याशिवाय दुसरें कांहीं दिसतच नव्हतें. दऱ्यांतून आणि खोऱ्यांतून संध्याकाळचा काळोख भरत चालला होता. आणि कांहीं किल्ले व डोंगरांचीं शिखरें यांच्यावर मला अस्तास जात चाललेल्या सूर्याच्या प्रकाशाचीं

कांहीं चिन्हें दिसत होतीं. परंतु संध्याकाळचा काळोख आणि धुकें यांच्या-योगानें सूर्यबिंब बहुतेक निस्तेज होऊन गेलें होतें; व एखाद्या ओसाड दिवाण-खान्यांत एकटीच हंडी लावून ठेवलेली असावी, त्याप्रमाणें त्या शून्य आकाशा-च्या छतापासून खालीं लोंबत असलेल्या सूर्यबिंबाची स्थिति झालेली होती. त्या वेळीं आकाशांत कोणीही नव्हतें. रात्रीचीं नक्षत्रें अजून दिसूं लागलेलीं नव्हतीं. येथून तेथून सर्व आकाश अगदीं शून्य आणि भयाण दिसत होतें. आकाशांत संचार करणारे पक्षीही तेथें कोणी दृष्टीस पडत नव्हते. बहुतकरून संध्याकाळ जवळ आल्यामुळें न संपणाऱ्या आकाशमार्गांत चालून चालून दमून ते आपापल्या घरट्यांतून स्वस्थ जाऊन बसले असावेत. सारांश, माझ्याशिवाय त्या सगळ्या प्रदेशामध्यें दुसरें कोणीही नव्हतें. त्या पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या खेडेगांवांतील एखाद्या कुत्र्याच्या भुंकण्याचा मात्र ध्वनि एखादे वेळीं मध्येंच कानावर येई. याशिवाय त्या विस्तीर्ण प्रदेशामध्यें दुसरा कसलाही आवाज ऐकूं येत नव्हता, किंवा दुसरा कोणी मनुष्य दृष्टीस पडत नव्हता. तें शून्य आकाश, तें निस्तेज सूर्यबिंब, ती आकाशांतील अफाट पोकळी, ती पर्वतांचीं उंच उंच शिखरें, ते राजांनीं बांधलेले जुनाट किल्ले, त्या डोंगरांच्या पोटांतील खोल खोल दऱ्या, त्या दऱ्यांच्या पोटांतून वर उसळत येणारा काळोखाचा लोट, तो पृथ्वीतलावर पसरलेला भयाणपणा, आणि त्यांतच माझी जन्मभूमि पाहून मनावर झालेले ते संस्कार, ह्या सगळ्यांच्या मध्यभागीं संध्या-काळच्या वेळीं मी एकटा उभा राहिलों असतां त्या वेळीं माझी काय स्थिति झाली असेल, हें सांगतां येणें फार कठीण आहे. तो देखावा पाहून परमात्म्या-चें विश्वस्वरूप माझ्यापुढें पसरलें आहे, असें मला वाटलें. ही जी अवाढव्य जड सृष्टि माझ्यासभोंवतीं पसरलेली होती, ती सर्व चैतन्यमय आहे, असें मला भासूं लागलें. पर्वत पर्वताशीं बोलत आहेत, किल्ले त्यांना माना डोलवीत आहेत, आकाशाच्या पोकळींतील प्रत्येक परमाणु चैतन्य-युक्त होऊन नाचत आहे, वारे आकाशांतील निरोप घेऊन तें सांगण्याकरितां पृथ्वीकडे धांव घेत आहेत, असा मला भास झाला. बाहेरची अद्भुत सृष्टि-रचना पाहून माझ्या आंतील मन डळमळूं लागलें. माझ्यासभोंवतीं जीं पंचमहाभूतें आपलें अक्राळविक्राळ स्वरूप प्रकट करून सर्वत्र पसरलीं होतीं, त्यांना या माझ्या पंचभौतिक देहांतील पंचमहाभूतांनीं ओळखिलें. जीं हीं बाहेर

इतक्या स्थूल रूपानें पसरलेलीं आहेत, तींच आपण सूक्ष्म रूपानें या शरीरामध्यें कोंडलेलीं आहों, अशी त्यांची खात्री झाली. आणि त्या पंचमहाभूतांच्या या ज्या लहान लहान कुप्या भरून परमेश्वरानें माझ्या शरीरांतील नाड्यांतून निरनिराळ्या ठिकाणीं ठेवल्या होत्या त्या सर्व कुप्या ताड्कन् फोडून टाकून माझ्या शरिरांतील सूक्ष्म पंचमहाभूतें जणूं काय माझ्यासभोंवतीं बाहेर पसरलेल्या त्या स्थूल पंचमहाभूतांच्या समुद्रामध्यें एकतानता पावून जातात कीं काय, असें मला वाटलें. अशी स्थिति झाल्यामुळें माझा देहावरील अभिमान गळला. माझ्यांत आणि माझ्याबाहेर सर्व एकच आहे, अशी चित्तवृत्ति झाल्यामुळें माझ्या मनाची भीति उडून गेली. माझ्या पायाखालीं जमिनीचा आधार आहे, असा मला भास झाला. मी पर्वताच्या शिखरावरून खालीं पडेन, ही माझी स्मृति नाहींशी झाली, व मी वाऱ्याप्रमाणें आकाशाच्या पोकळींत तरंगत आहे, असा मला भास झाला. मी पर्वताच्या शिखरावरून खालीं पडेन, ही माझी भ्रांति लयाला गेली. कारण खालीं पडणार कोठून? आणि काय खालीं पडणार ? खालीं म्हणजे काय, आणि वर म्हणजे काय? आणि जर याबद्दल मला भीति वाटावी तर मग तशीच ती त्या पर्वतालाही कां वाटूं नये? असे प्रश्न माझ्या मनांत उद्भवूं लागले. मी त्या पंचमहाभूतांशीं एकरूप झालों. मी आपलेपणा विसरून गेलों. त्या योगानें माझ्यामध्यें अष्टसिद्धींच्या योगानें उत्पन्न होणारें अणिमालघिमादिकांचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे, असें मला वाटूं लागलें. मी आकाशासारखा सर्वव्यापी होईन, मी वायूसारखा सर्वत्र संचारी होईन, मी सूर्यासारखा प्रकाशमान होईन, मी जलासारखा पाहिजे तिकडे वाहत जाईन, किंवा पृथ्वीसारखा सर्वांना आधारभूत होईन, मी जें पाहिजे तें करीन, असें मला वाटूं लागलें. योगसाधनानें, प्राणाच्या अवरोधानें आणि इडापिंगलांच्या नियमनानें असली दिव्य शक्ति पुष्कळ अभ्यासानंतर प्राप्त होते म्हणून म्हणतात. परंतु त्या दिव्यशक्तीचा एक नवीनच दरवाजा या वेळीं माझ्यापुढें उघडला. शुद्ध सत्त्व गुण माझ्या चित्तवृत्तींत प्रकाशित होऊन बाहेरचें सर्व विश्व हें मीच आहे, आणि मी हेंच बाहेरचें विश्व आहे, असें मला दिसूं लागलें. त्यामुळें सर्व भेदभाव निरास पावला आणि त्या पर्वताच्या शिखरावर मींच निर्माण करून घेतलेल्या त्या सुखाच्या समुद्रांत मी क्षणभर अत्यंत आनंदानें पोहत राहिलों.

मला या वेळीं होत असलेला हा आनंद दुसऱ्या कोणाला तरी अनुभवण्याला द्यावा, अशी इच्छा होऊन मीं आपल्या आजूबाजूला पाहिलें. मीं आपल्या आवडत्या माणसांना मोठ्या मोठ्यानें हांका मारल्या. मीं आपल्या जिवलग स्नेह्यांना मोठ्या आदरानें बोलाविलें. कोणी तरी तेथें येऊन त्या सुखाचा अनुभव घ्यावा अशी माझी इच्छा होती. पण तेथें कोण येणार ? माझ्याजवळ कोणीही नव्हतें व माझ्या हांका कोणालाही ऐकूं जाण्यासारख्या नव्हत्या. परंतु मला अशी खात्री वाटत होती कीं, त्या ठिकाणीं येऊन तें परमेश्वराचें विश्वस्वरूप जर कोणी पाहाते तर ते साधूच बनले असते, जीवन्मुक्त झाले असते, त्यांचीं हीं संसारबंधनें तुटून ते ह्या दुःखांच्या यातनांतून उद्धरून गेले असते ! कारण या ठिकाणावरून संसारांतील मनोविकार तुच्छत्व पावून कसे निरसून जातात, याचा अनुभव मलाही येत होता. एका दोनचार पैशांच्या किंमतीच्या जिनसासाठीं माझें कांहीं दिवसांपूर्वीं दुसऱ्या एका इसमाशीं भांडण झालें होतें, व त्यामुळें मी त्याच्यावर क्रुद्ध होऊन त्याचा द्वेष करीत असे. त्या प्रसंगाची मला येथें आठवण झाली तेव्हां, तो प्रसंग मीं प्रस्तुतच्या या प्रसंगाच्या शेजारीं आणून मांडिला. तेव्हां माझ्या मनाची काय स्थिति झाली ! मला आपल्या पूर्वीच्या राग, द्वेष आदिकरून मनोविकारांबद्दल शरम वाटूं लागली व हंसूं येऊं लागलें. मीं आपल्या मनाशीं म्हटलें; एवढी थोरली संपत्ति माझ्यापुढें असतां मी यःकश्चित् चार दिडक्यांच्या जिनसासाठीं वेड्यासारखा काय भांडत बसलों होतों ? हें सर्व परमेश्वराचें ऐश्वर्य, ही दिव्य विभूति, हें निरतिशय प्रेम, हीं सर्व माझीं असतां एका क्षुद्र वस्तूसाठीं मीं लोभ धरावा, ती न मिळाली म्हणजे दुसऱ्यावर क्रोध करावा, आणि त्या क्रोधामुळें त्याचा द्वेष करण्याला प्रवृत्त व्हावें, हें केवढें अज्ञान आहे ? अशा विचारानें माझे मनोविकार गळून गेले, माझा अहंभाव निरसन पावला, माझ्या सांसारिक वासनांचे ओघ आटून गेले, आणि माझ्या ऐहिक बंधनाच्या शृंखला तुटून पडल्या. संसारांत मिथ्या स्पृहणीय वाटणाऱ्या गोष्टींसंबंधानें अशा रीतीनें दृष्टि फिरून जाऊन निर्विकार झाल्यानंतर मी ज्या ईश्वरी साम्राज्याच्या गादीवर जाऊन बसलों तेथून या जगाकडे जेव्हां मी पाहूं लागलों, तेव्हां या कुलुंग्या सार्वभौमांचीं साम्राज्यें, अत्यंत साहसी राष्ट्रांचे अतिशय वाढलेले म्हणून समजलेले जात असलेले व्यापार, श्रीमंतांच्या संपत्त्या, राजांचे खजिने वगैरे, सर्व

वस्तु अत्यंत क्षुद्र, तुच्छ, आणि घाणेरड्या दिसूं लागल्या. अशा प्रकारच्या या स्थानाचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला व तेव्हां ही गोष्ट माझ्या मनांत आली कीं, त्रिपथी, गिरनार, अबू, गंगोत्री, बदरीकेदार वगैरे ठिकाणच्या यात्रा करण्याविषयीं आपल्यामध्यें जें सांगितलें आहे, त्यांतील वर्म हेंच होय, कीं बद्रिकाश्रमाला जाऊन नारायणाचें दर्शन घेतलें म्हणजे मनुष्य मुक्त होतो तो कसा होतो, याची प्रतिक्रिया या वेळीं माझ्या मनांत पूर्णपणें ठसली. आणि या स्थळीं मला आणून अशा प्रकारचें ज्ञानामृत पाजून ज्या परमेश्वरानें मला ही दिव्य दृष्टि दिली, त्याचे आभार मानण्याकरितां फिरून मीं आपलें मन एकाग्र केलें. डोळे उघडे असून मला बाहेरचें कांहीं दिसत नाहींसे झालें. माझ्या हृदयाकाशांतील संकुचित जागा बाहेरील आकाशाप्रमाणें विस्तृत झाली. तेथें अंधकार होता तो हळूहळू नाहींसा होत जाऊन तो सर्व प्रदेश पूर्व दिशेप्रमाणें तेजोमय झाला. आणि त्यामध्यें मला माझ्या इष्ट देवतेची मूर्ति क्षणैक दृश्यमान होऊन निरुपम सुखाचा मी अनुभव घेऊं लागलों.

परंतु दुर्दैवानें ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. मी जेथें होतों, त्याच्या खालच्या एका दरींतून एकाएकीं बंदुकीचे कांहीं आवाज ऐकूं येऊन त्यांनीं माझ्या समाधीचा भंग केला. मीं डोळे उघडून पाहिलें, तों बंदुकीच्या धुराचे लोट माझ्याही डोळ्यांच्या वर चाललेले मला दिसले. तो धूर दिसतो आहे, तोंच गडबडीनें डोंगर चढून वर येत असलेल्या लोकांचीं पावलें ऐकूं येऊं लागलीं. तेव्हां मीं खालीं पाहिलें, तों त्या डोंगरांतून अनेक लोक आपला प्राण बचावण्यासाठीं सैरावैरा पळत सुटलेले माझ्या दृष्टीस पडले. त्यांतील एकजण मी बसलों होतों तेथेंच धांपा टाकीत आला. त्याच्या तोंडून हा काय प्रकार आहे तें सर्व मला कळलें. दादा राणे वगैरे मंडळींनीं पुढाकार घेऊन गोव्यामध्यें राज्यक्रांति करण्याचा जो घाट घातला होता, तो आपल्या लोकांच्या कमकुवतपणामुळें, नवीन शस्त्रांच्या अभावामुळें आणि आपसांतील फितुरीमुळें सर्वस्वीं कसा फसला, याची हकीकत मला कळली. मी त्याला आणखी कांहीं प्रश्न विचारणार, तों तो पाठलाग करणाऱ्या शत्रूच्या भयानें पळून जाऊन कोठें दिसेनासा झाला. तेव्हां आपल्या जन्मभूमीची मीं येथूनच शेवटची भेट घेतली, आणि आपले इष्ट हेतु सिद्धीस जाण्याकरितां परमेश्वर प्रसन्न करून घ्यावा म्हणून मीं फिरून आपल्या तीर्थप्रवासाला पूर्वीप्रमाणें सुरवात केली.

## आपल्या वडील बंधूंची मातृभक्ति : : १५

ब्रिटिश साम्राज्याचें जें जाळें आज सर्व जगभर पसरलें आहे, त्या जाळ्यामध्यें आपणच एकटे सांपडलों आहों असें नाहीं. आपल्याप्रमाणेंच दुसरेही कित्येक प्राणी त्यामध्यें गुरफटलेले आहेत. अशा स्थितींत ब्रिटिश साम्राज्याला अनुलक्षून पाहिलें असतां त्या साम्राज्याशीं त्यांचे व आपले संबंध सारखेच असले पाहिजेत, हें उघड आहे. त्या संबंधांपैकीं मुख्य संबंध म्हटला म्हणजे राजनिष्ठेचा होय. ब्रिटिश साम्राज्यांतील कॉलनीज आणि डिपेन्डन्सीज वगैरे सगळ्यांनीं त्या साम्राज्याबद्दल आपली राजनिष्ठा दाखविली पाहिजे. ब्रिटिश साम्राज्य ही एक मोठ्या पोटाची आई आहे, व ऑस्ट्रिया, कानडा वगैरे सारख्या कॉलनीज, आणि हिंदुस्थानसारख्या डिपेन्डन्सीज ही त्या आईचीं मुले, आणि परस्पर एकमेकांचीं भावंडें होत. अशा नातेवाईकपणाच्या संबंधामध्यें मुलांनीं आईवर राजनिष्ठेच्या रूपानें जी भक्ति प्रदर्शित करावयाची ती आपलें एक कर्तव्यकर्म म्हणूनच केली पाहिजे. व त्याप्रमाणें आपण हिंदुस्थानांतील लोक आपली भक्ति होईल तितक्या कसोशीनें व्यक्त करीत आहों. आपण किती राजनिष्ठा दाखवीत आहों, याच्याबद्दल हिंदुस्थानची सांप्रतची स्थिति ज्यांना माहीत आहे, त्यांना निराळें सांगावयास नको. तरी पण असल्या कामांत आपण धाकटे भाऊ आहों हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. कॉलनीज हे आपले वडील भाऊ होत. आपण किती झालों तरी धाकटे भाऊ असल्यामुळें राजनिष्ठेच्या सारख्या अगम्य आणि दुर्घट शास्त्रामध्यें आपल्या हातून केव्हां तरी चुका होणें साहजिक आहे. म्हणून आपण नेहमीं आपले वडील भाऊ आपल्या आईपाशीं कसे वागत असतात इकडे लक्ष ठेवणें फार जरूरीचें

आहे. तसें केल्यानें आपल्या राजनिष्ठेमध्यें कोणत्याही प्रकारची कमतरता उरणार नाहीं. आणि आपल्या वडील भावांवर आपली आई जशी सदासर्वदा सुप्रसन्न असते, त्याप्रमाणें ती आपल्यावरही होईल. शिवाय धाकट्या भावांनीं वडील भावांचें वळण गिरवावयाचें नाहीं, तर कोणाचें गिरवावयाचें? आजकाल आपण पाहतों कीं, आपले वडील भाऊ जे कॉलनीजमधील गोरे लोक, त्यांच्या-वर प्रत्येक कामांत आपल्या आईची बहाल मर्जी असते. आणि आपल्यासंबंधानें पाहावें तों ती जेव्हां तेव्हां आपल्यावर रुष्ट झालेली असते. यावरून आपलें कांहीं तरी चुकत असलें पाहिजे, व आपल्या वडील भावांसारखी राजनिष्ठा आपल्याला दाखवितां येत नसली पाहिजे, म्हणूनच ही आपली आई जेव्हां तेव्हां आपल्यावर रागावत असते, व त्यांच्यापेक्षां आपल्याला वाईट रीतीनें वागवीत असते, असें दिसतें. यासाठीं आपल्या राजनिष्ठेमध्यें काय चूक होत आहे, हें तपासून पाहून त्या चुकीची दुरुस्ती आपण आपल्या वडील भावांची राजनिष्ठा पाहून त्याप्रमाणें ताबडतोब केली पाहिजे.

परंतु आपले वडील भाऊ फार वस्ताद आहेत. त्यांची राजनिष्ठा बनविण्याची काय कृति आहे ती ते सहसा आपल्या नजरेस पडूं देत नाहींत; तरी पण एखादे वेळीं गैरसावध रीतीनें बोलत असतांना त्यांच्या तोंडांतून त्यांच्या कृतीचे दर्शक असे कांहीं उद्गार बाहेर पडतात त्यांजकडे आपण फार बारकाईनें पाहिलें पाहिजे, व राजनिष्ठेसंबंधाचे त्यांचे ते विचार आणि आपले विचार यांची आपण फार काळजीपूर्वक रीतीनें तुलना करून पाहिली पाहिजे.

आपण हिंदुस्थानांतील लोक ब्रिटिश साम्राज्यरूपी आपल्या आईला जितकें मानतों, तितके आपले वडील भाऊ तिला मुळींच जुमानीत नाहींत. आपले एक सर्वांत वडील भाऊ म्हणजे आपले दादा आहेत, त्यांनीं तर आपल्या आईची फारच शोभा केलेली आहे. यांचें आणि आपल्या आईचें कांहीं दिवसापूर्वीं अगदीं हाडवैर माजलें होतें व त्यांचें भांडण एकमेकांचे जीव घेण्यापर्यंत आलें होतें. ते आपले दादा आपल्या आईपासून विभक्त झाले, आणि तेव्हांपासून ते स्वतंत्रपणें राहूं लागले आहेत. हे आपले दादा म्हणजे अमेरिकेंतील युनायटेड स्टेट्स होत, हें इतिहासज्ञ वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. या दादांचें पाहून आपले दुसरेही वडील बंधु आपल्या आईपाशीं तशाच रीतीनें वागूं पाहत आहेत व त्यांची समजूत करण्याकरितां आईही बऱ्याच गोष्टी त्यांच्या कलानें

घेत आहे. परंतु हें त्या मायलेंकरांचें रहस्य फार दिवस टिकेल असें दिसत नाहीं. थोरल्या दादांच्याप्रमाणें ऑस्ट्रेलिया, कानडा, वगैरे आपले वडील भाऊ हेही केव्हां तरी एके दिवशीं आपल्या आईपासून वेगळे होणार हें खास. कारण तशीं कित्येक चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. हिंदुस्थानांत आपण आपल्या तोंडानें इंग्लिशांना सांगत असतों कीं, आम्ही तुमच्यासंबंधानें फार राजनिष्ठ आहों; पण असली भाषा कॉलनीजमधील लोक क्वचितच वापरतात. त्यांच्या राजनिष्ठेसंबंधानें उलट इंग्लिश लोकच आपल्याभोंवतीं दिवे ओवाळून घेत असतात. इंग्लिश लोकच त्यांना म्हणत असतात कीं, ' You colonials are so loyal ! ' इंग्लिशांनीं आपल्यासंबंधानें असे उद्गार काढले असते, तर आपण हिंदुस्थानच्या पोटीं जन्म घेऊन आपल्या जन्माचें सार्थक केलें, असें आपल्याला वाटलें असतें. परंतु कॉलनीजमधील गोऱ्या लोकांना वरील वाक्य ऐकून मोठा संताप येतो. ( Beneath such remarks the supersensitive colonial smarts. ) नुकत्याच संपलेल्या दक्षिण आफ्रिकेंतील लढाईमध्यें कॉलनीजमधील लोकांनीं इंग्लंडवर पुष्कळ राजनिष्ठा दाखवून मदत केली, त्यावरून कलोनिअल लोकांची आपल्यावर नेहमींच तशी राजनिष्ठा राहील असा इंग्लिशांना एक भ्रम आहे. परंतु हा भ्रम फार वेळपर्यंत टिकावयाचा नाहीं. इंग्लंडला हा भ्रम असला तर त्यापासून कॉलनीजचें कांहीं बिघडत आहे असें नाहीं. परंतु कॉलनीज इंग्लंडसंबंधानें राजनिष्ठ आहेत, ह्या कल्पनेला बिलकुल आधार नाहीं. Colonies are not loyal to England. The feeling throughout the Commonwealth and New Zealand is first an intense local patriotism for their own colony or state. वरील वाक्यांतील भावार्थ असा आहे कीं, कॉलनीजमधील लोकांना इंग्लंडबद्दल राजनिष्ठा मुळींच वाटत नाहीं. ते आपल्या लोकसत्तात्मक राज्याबद्दल किंवा संस्थानाबद्दल राजनिष्ठ आहेत. कॉलनीजमधील लोक पहिल्यानें आपल्या कॉलनीजचें हित साधणार, तें साधल्यानंतर ब्रिटिश साम्राज्य जें एवढें मोठें वाढलें आहे त्याचें हित साधल्यास ते करणार, आणि सगळ्यांच्या शेवटीं इंग्लंडला आपली मूळची जन्मभूमि म्हणतात म्हणून त्या इंग्लंडचें शक्य तेवढें हित ते साधणार ! म्हणजे आधीं आपलें संस्थान, मग आपलें सगळ्यांचें मिळून झालेलें साम्राज्य,

आणि मग इंग्लिशांचें इंग्लंड, अशा रीतीनें कलोनिअल लोक आपल्या राजनिष्ठेचा क्रम ठेवणार. आपल्या हिंदुस्थानांतील राजनिष्ठेचा क्रम याच्या अगदीं उलट आहे. कलोनिअल लोकांच्या क्रमांत त्यांच्या स्वतःचा देश पहिल्यानें येतो, परंतु आपल्या क्रमामध्यें आपल्या हिंदुस्थान देशाचें नांव पहिल्यानें तर नाहींच, परंतु सरते शेवटीं देखील येतां कामा नये. हिंदुस्थानांतील लोकांनीं हिंदुस्थान देशावर प्रीति करावयाची म्हणजे काय! त्यांनीं असले कांहीं एक वेडेचार करतां कामा नये. त्यांची सगळी प्रीति पहिल्यानें इंग्लंडकरितां असली पाहिजे, दुसऱ्यानें ब्रिटिश साम्राज्याकरितां असली पाहिजे, तिसऱ्यानें त्या ब्रिटिश साम्राज्यांतील प्रत्येक युरोपियन मनुष्याकरितां असली पाहिजे, आणि चौथ्यानें त्यांचे कुत्रे, त्यांचे बूट, त्यांचे मार, त्यांचीं आपोआप उडणारीं पिस्तुलें, वगैरे जिनसांकरितां असली पाहिजे. या व्यवसायामध्येंच आपण आपली सर्व प्रीति खर्चीं घातली पाहिजे व तिचा एक थेंबही आपल्या स्वतःच्या देशाकरितां शिल्लक उरवितां कामा नये, अशी आपली प्रीतीची वांटणी आहे. परंतु कॉलनीजमधील लोकांना याच्या अगदीं उलट वाटत असतें. त्यांच्या विचाराची दिशा अगदीं भिन्न आहे. त्यांच्या अंतःकरणाचें चित्र पुढील वाक्यामध्यें फार चांगल्या रीतीनें व्यक्त केलेलें आहे. In the heart of every member of the wide dominion lies an affection for his own race, his own country, his own people, a love for his own land and an irradicable belief in its particular destiny प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें आपली जात, आपला देश, आपले लोक, आपली जन्मभूमि, आणि त्या जन्मभूमीचा पुढें मागें केव्हां तरी अभ्युदय होणार आहे अशाबद्दलचा अढळ निश्चय यांच्याबद्दलची एक प्रकारची प्रीति प्रतिबिंबित झालेली असते. हा जो सिद्धान्त वरील इंग्रजी वाक्यामध्यें नमूद केलेला आहे तो इतर ठिकाणीं जरी खरा असला, तरी हिंदुस्थानांत हल्लीं तो अगदीं सपशेल खोटा ठरत आहे. इतकी आपल्याला इंग्लंडबद्दल राजनिष्ठा वाटूं लागली आहे.

कॉलनीजनीं बोअर लढाईच्या वेळीं इंग्लिशांना मदत केली म्हणून इंग्लंडच्या प्रत्येक लढाईचे वेळीं ते तशीच मदत करतील, असा बिलकुल नियम नाहीं. ज्या लढाईपासून साम्राज्याला फारशी भीति नाहीं, अशा लढाईमध्यें

कॉलनीज इंग्लंडच्या साहाय्याला मुळींच येणार नाहींत. परंतु इंग्लंडची लढाई कोणाशीं उपस्थित होते ह्याच्याबद्दल कांहीं एक नियम नाहीं. ती लढाई तिऱ्हाइताशीं झाली तर कांहीं हरकत नाहीं. परंतु कर्मधर्मसंयोगानें इंग्लंडच्या कॉलनीजपैकींच एखाद्या कॉलनीशीं जर इंग्लंडला लढाई करणें प्राप्त झालें तर त्या वेळीं बाकीच्या कॉलनीजमधील लोक कोणीकडे वळतील? आतां 'राजनिष्ठा' 'राजनिष्ठा' म्हणून मोठा थोरला बुडबुडा दिसत आहे, तो अशा वेळीं कितपत टिकेल? The loyalty towards England would not survive five minutes after the first angry word was spoken इंग्लंड आणि एखादी कॉलनी यांच्यामध्यें भांडण सुरू होऊन पहिला रागाचा शब्द तोंडांतून बाहेर निघाल्यापासून कॉलनीजची राजनिष्ठा पांच मिनिटेंसुद्धां टिकावयाची नाहीं, असें इंग्लंडच्या कॉलनीजमधील लोकांचें मत आहे. आणि इंग्लंड व एखादी कालनी ह्यांच्यामध्यें कांहीं मतभेद उत्पन्न झाला तर बाकीच्या कॉलनीजमधील मतांचा ओघ इंग्लंडकडे न वळतां तो इंग्लंडच्या विरुद्ध जाणार, याविषयीं कलोनियल लोकांना यत्किंचितही शंका नाहीं. कारण इंग्लंडचे विचार ज्या दिशेचे आहेत, त्या दिशेहून अगदीं भिन्न दिशेनें इतर कॉलनीजचे विचार चालले आहेत. आणि म्हणून पुढेंमागें एखाद्या कॉलनीनें इंग्लंडची सत्ता धाब्यावर बसविली तर बाकीच्या कॉलनीज त्याच गोष्टीचें अनुकरण करून इंग्लंडवर उठतील आणि जिकडून तिकडून इंग्लंडवर काहूर उसळून सोडतील.

कॉलनीजमधील लोकांचे हे विचार पाहून इंग्लंडच्या साम्राज्याचा पाया किती डळमळीत आहे, याची हिंदुस्थानांतील लोकांना थोडीबहुत तरी कल्पना येईल. इंग्लिश लोक दिल्लीच्या राजमहालांत दरबार भरवोत, किंवा मस्कतच्या बंदरांत आगबोटीवर दरबार भरवोत, कॉलनीजच्यासंबंधानें पाहतांना इंग्लिशांचे पाय लंगडे झालेले आहेत, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं व इंग्लिश लोक जरी कॉलनीजची मनधरणी करून एशिया खंडामध्यें जुलूम करीत आहेत आणि नवीन राज्यें मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत, तरी ही त्यांची स्थिति फार दिवस टिकणार नाहीं. कॉलनीजचें साम्राज्याबद्दलचें मत असें आहे कीं, The Empire is in a position of very unstable equilibrium. The vast loosely aggregated organisation is

not a living thing. It lies open at any moment to the blow that may shatter it to scattered units. ब्रिटिश साम्राज्य डळमळत आहे, त्याच्यांत जीव नाहीं आणि त्याला जरा धक्का लागला तर तें सगळें कोसळून जाऊन त्याचे तुकडे होतील, इतक्या नाजुक स्थितीला तें साम्राज्य येऊन पोंहोचलें आहे असें कलोनियल लोकांना वाटूं लागलें आहे. आणि या डळमळूं लागलेल्या इमारतीला कोसळून पाडण्याकरितां पहिला धक्का कोण मारणार? एशियाटिक किंवा इजिप्शन, किंवा ब्रह्मी किंवा तिबेटी लोक नव्हेत. हें कृत्य कॉलनीजच करण्याच्या तयारींत आहेत. त्यांच्या ह्या विचाराची दिशा पुढील कित्येक वाक्यांवरून स्पष्ट होण्यासारखी आहेः— We cannot afford to be supplicants for imperial favours nor to determine our policy according to the dictates of British statesmen....The Colonials think it inconsistent with their dignity as nations to have no share in the government of the Empire, of which they form so important a part....The Colonies are no longer content to be sleeping partners in the Empire. आम्ही तुमच्यापासून देणग्या मिळविण्याकरितां तुमच्यापुढें नाकें घासणार नाहीं, किंवा ब्रिटिश मुत्सद्दी ज्याप्रमाणें हुकूम करतील त्याप्रमाणें आम्ही आपलें धोरण ठेवण्याला तयार होणार नाहीं; ब्रिटिश साम्राज्याच्या राज्यकारभारामध्यें आपल्याकडे कांहींच अधिकार नसावा, हें आम्हा कॉलनीजला लाजिरवाणें आहे; तुम्हीं साम्राज्याची पाहिजे तशी व्यवस्था लावावी आणि आम्हीं स्वस्थ झोंप घेत पडावें, असें आम्हांला इतःपर बिलकुल पसंत नाहीं; अशा अर्थाचे वरील उद्गार आहेत. कॉलनीजमधील लोक म्हणतात कीं, आमच्या वसाहती जोंपर्यंत लहान होत्या, तेथील लोकसंख्या थोडी होती, आणि तेथील संपत्ति बेताबेताची होती, तेथपर्यंत इंग्लिश लोक आम्हांला जसे वागवीत आले तसे आम्ही वागलों. परंतु आतां आम्ही लहान मुलें नाहीं, आम्ही मोठे झालों आहों, आतां तुम्ही आम्हांला मुलांप्रमाणें वागवून चालावयाचें नाहीं, आतां आम्हांला तुम्ही आपल्या धंद्यामध्यें सारख्या हक्काचे वांटेकरी केलें पाहिजे, नाहीं तर आम्ही तुमच्यापासून वेगळे सरूं, आणि स्वतंत्र होऊन स्वराज्याचा निराळा धंदा सुरू करूं, अशी कलोनियल लोकांच्या विचाराची दिशा आहे.

ही दिशा आपणा हिंदुस्थानांतील लोकांना अगदीं अपूर्व आणि अपरिचित आहे. आपण एकदां लहान मुलें होतों, परंतु आतां मोठे झालों आहों, असें कॉलनीजमधील लोकांना वाटतें; परंतु आपले विचार अगदीं विपरीत आहेत. 'वित्तेशानां खलु वनो यौवनचदन्यदस्ति' यांत कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें यक्षांना जसें यौवनावांचून दुसरें वयच नसतें, तसें आपणा हिंदुस्थानांतील लोकांनाही बाल्याशिवाय दुसरें वयच नाहीं, असें वाटत आहे. कितीही वर्षे आपण वाढलों, कितीही पावसाळ्यांनीं आपल्या डोक्यावर पाऊस पाडला, तरी इंग्रजांच्या छत्राखालीं आपण कुकीं मुलेंच आहों असें आपल्याला सदोदित वाटतें; जणुं काय परमेश्वरानें हिंदुस्थानांतील लोकांना प्रौढावस्था कायमचीच नाकारली आहे! अशा कल्पनांच्या वजनाखालीं दिवसेंदिवस खुरटत चाललेल्या लोकांना ब्रिटिश साम्राज्याखालील दुसरे लोक लहानाचे मोठे झालेले पाहून मोठा अचंबा वाटेल यांत शंका नाहीं.

आपल्याला कलोनियल लोकांची दुसरीही एक कल्पना विलक्षण वाटेल. आपल्या कॉंग्रेसची आणि आपल्या पुढाऱ्यांची आजकाल काय महत्त्वाकांक्षा आहे? आपल्याला काय प्राप्त झालें म्हणजे आपल्या राजकीय इच्छा अगदीं कळसाला जाऊन पोंहोचल्या, असें आपल्याला आज वाटत आहे? पार्लमेंटमध्यें आपले मेंबर जाऊन बसले म्हणजे आपण कृतकृत्य झालों व आपल्या देशाचें सर्व कांहीं हित साधलें, अशी आज आपली समजूत आहे. पण या समजुतींत हंशील किती आहे ह्याचा आपण कधीं विचार केला आहे काय? ज्या मृगजळामागें धांवत सुटण्याविषयीं साहेबांनीं एकदां आपल्याला शिकविलें आहे, त्यामागें आपण धांवत राहिलों आहों. पण ह्या पार्लमेंटमध्यें सभासद होण्याच्या मृगजळाची किंमत इतर ठिकाणचे साहेब लोक किती समजतात हें आपण कधीं पाहिलें आहे काय? कॉलनीजमधील साहेब लोकांचें इंग्लिश पार्लमेंटमध्यें सभासद होण्यासंबंधानें मत पुढीलप्रमाणें आहे: Do the colonies want representation in the Imperial Parliament? Frankly the Colonies do not. The colonies have too poor an opinion of that unwieldy council to ask permission to be swamped beneath its multitude of councillors. The colonies are not interested in the

local concerns of the united kingdom...And the colonies have no intention of being made the tools of a local party warfare, in which they have not the least concern. आम्हांला ब्रिटिश पार्लमेंटमधील मेंबर होण्याची मुळींच इच्छा नाहीं. तेथें जाऊन आम्हांला करावयाचें आहे काय? त्या पार्लमेंटचें आम्हांला मुळींच महत्त्व वाटत नाहीं. जेथें ग्रेट ब्रिटनच्या शेंकडों सभासदांच्या रामरगड्यामध्यें आमचे एक दोन मेंबर गेले तरी ते निवळ चिरडून जाणार, त्या पार्लमेंटमध्यें सभासद पाठविण्याची आम्हांला परवानगी द्या, अशी दांत विचकून विनवणी करण्यांत काय अर्थ आहे? शिवाय ब्रिटिश पार्लमेंटमध्यें बहुतेक साऱ्या वर्षभर केवळ त्यांच्या स्थानिक प्रश्नांचाच खल चाललेला असतो, तोच ऐकत बसण्यासाठीं आम्हांला तेथें जाऊन करावयाचें आहे काय? तसेंच लिबरल आणि कॉन्सरव्हेटिव या दोन पक्षांचीं तेथें जीं रोज भांडणें चाललीं असतात आणि ज्यांपासून आमचें कांहीं एक हित व्हावयाचें नाहीं, त्यांत कोठल्या तरी एका पक्षाच्या हातांतील कळसूत्री बाहुली होऊन राहण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं; असे कलोनियल लोकांचे पार्लमेंटसंबंधाचे विचार आहेत.

अशा प्रकारच्या बरोबरीच्या गोष्टी सांगून आपले वडील भाऊ आपल्या आईशीं वर्दळीवर येण्याच्या बेतांत आले आहेत. आम्हांला सारखा वांटा द्या नाहीं तर आम्ही वेगळे सरूं, असा त्यांनीं बोलण्याचा घाट घालण्याला सुरवात केली आहे. परंतु आई आणि तिचीं सर्व मुलें यांच्यामध्यें जी सारखी वांटणी व्हावयाची, त्या वांटणींत आपण काळे लोक हें जें धाकटें भावंड तें मात्र काळजीपूर्वक रीतीनें वगळलें जावें अशी आपल्या वडील भावंडांची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे. One of the other groups, that comprising India and Egypt, is not colonised, but occupied, and therefore is excluded from the suggested federation of the whites. युनायटेड किंगडम ह्या मातुश्री आणि दक्षिण आफ्रिकेंतील वसाहती, ऑस्ट्रेलिया, कानडा, न्यूफौंडलंड व न्यूझीलंड हीं गोऱ्या रंगाचीं वडील भावंडें एवढ्यांनीं आपसांत वांटणी करून घ्यावी आणि हिंदुस्थान, ईजिप्त वगैरे ठिकाणचीं जीं काळ्या रंगाचीं लहान भावंडें

त्यांना मात्र या वांटणींतील कांहीं एक देण्याचें कारण नाहीं, अशी वाटाघाट सुरू आहे. ही वांटणी आतांच होत आहे असें नाहीं. परंतु ती केव्हां तरी होणार हें खास. आणि ती जेव्हां होईल तेव्हां, हिंदुस्थानांतील लोकांनो, तुमच्या तोंडाला पानें पुसलीं जाणार हेंही खास. अशी जर स्थिति आहे. आणि आपले वडील भाऊ जर उघड उघड रीतीनें आपला वेवारसा स्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत, तर आपण धाकट्या भावांनीं स्वस्थच बसावयाचें काय? आपण आपली वांटणी मिळविण्याचा कांहीं प्रयत्न करावयाला नको काय? व तो आपण कसा करणार? आपल्या वडील भावांना ज्या विचारांनीं आणि ज्या मतांनीं सारखी वांटणी मागण्याचा आज अधिकार प्राप्त झाला आहे, त्याच विचारांचा आणि त्याच मतांचा आपण अंगीकार केल्यास आपणही आपल्याला तसा दिवस कधीं तरी आणून घेणार नाहीं काय? आणि तो आनंदाचा, सौख्याचा, भाग्योदयाचा, उत्कर्षाचा आणि भरभराटीचा दिवस आपल्या राष्ट्राला केव्हां तरी एकदां लवकरच यावा, अशी आपली सर्वांची इच्छा नाहीं काय? ह्या प्रश्नाला हिंदुस्थानच्या सर्व भागांतून ‘आहे’ हेंच उत्तर आलें पाहिजे.

---

# पितृतर्पण : : १६

पेशव्यांच्या वेळेला दक्षिण महाराष्ट्रांतील अनेक कुळें अतिशय मोठ्या भरभराटीस येऊन पोंहोचली होतीं. पण त्या वेळची भरभराट आजपर्यंत क्वचितच टिकलेली असेल. जे त्या वेळीं लक्षाधीश होते, त्यांच्यावर आज बहुतेक भिक्षेचीच पाळी आलेली आहे. हल्लींच्या रियासतींत ज्यांचीं नांवें प्रख्यातीस आलेलीं आहेत, त्यांचीं घराणीं पेशवाईंत कोणाला ठाऊकही नव्हतीं, त्याचप्रमाणें पेशवाईंत प्रख्यातीस आलेल्या घराण्यांपैकीं हल्लीं लोकांना मुळींच माहीत नाहींत अशींही कित्येक घराणीं सांपडतील. हरिपंतांचें घराणें हें अशांपैकींच एक होतें; त्यांचे पणजे सवाई माधवरावांच्या कारकीर्दीमध्यें फारच पुढें सरसावलेले होते. व नेहमीं दरबारांत असल्यामुळें नानांचा धूर्त-पणा, त्यांची कर्तबगारी, त्यांची दूरदृष्टि वगैरे सर्व गोष्टी यांना नेहमीं पाहा-वयाला मिळत असत. त्यामुळें त्यांच्या मनावर त्याचा फारच चांगला परिणाम झाला होता. श्रीमंतांपाशीं त्यांचा नेहमीं प्रवेश असे. श्रीमंतांसारखे धनी आणि नानांसारखे कारभारी अशी जोडी जुळली असतां आणि ती परमेश्वरानें पुष्कळ दिवसपर्यंत कायम ठेविली असतां आपण आपलें स्वराज्य जिकडे तिकडे वाढवूं आणि आपली हिंदुपदपादशाही आपण जिकडे तिकडे स्थापन करूं. दक्षिणेस सेतुबंधही आपल्या गतीला बंधन करणार नाहीं, आणि उत्तरेस अटक नदीही आपल्या भराऱ्यांना अटक करूं शकणार नाहीं, अशा अनेक प्रकारच्या महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनामध्यें घोळत असत. परंतु सवाई माधव-रावांनीं कारंज्यावर उडी घेतली आणि नाना फडणविसांना बाजीरावानें अटकेंत ठेविलें, तेव्हां हरिपंतांच्या पणजोबांच्या सर्व आशा जागच्या जागीं विराम पावल्या. आपण अमुक करूं आणि तमुक करूं, अशा महत्त्वाकांक्षेच्या सहस्र कल्पना त्यांच्या डोक्यामध्यें पूर्वीं उत्पन्न होत असत; परंतु त्या सर्व जागच्या

जागीं नाहींशा झाल्या. निराशेचा धक्का फार भयंकर आणि असह्य असतो. हरिपंतांच्या पणजोबांना सवाई माधवराव खालीं पडले असें वाटलें नाहीं, तर महाराष्ट्राचें स्वराज्यच खालीं पडलें असें वाटलें आणि नाना फडणवीस अटकेंत पडले नाहींत तर हिंदुस्थानचें स्वातंत्र्यच अटकेंत पडलें असें भासलें. स्वराज्याच्या आणि स्वातंत्र्याच्या जोरावर आपण पृथ्वीही सर्व पादाक्रांत करूं, अशी जी त्यांना उमेद होती ती नाहींशी होऊन, त्यांच्या अंतःकरणाला फार मोठा धक्का बसला, व त्यामुळें दुसऱ्या बाजीरावसाहेबांच्या पहिल्या अमदानींतच त्यांचा बऱ्याच अल्पवयामध्यें अंत झाला. हरिपंतांच्या घरांत जीं कांहीं जुनीं दप्तरें उरलीं होतीं त्यांतील पत्रें व त्या वेळचे लिहून ठेवलेले दुसरे लेख वाचण्याचा हरिपंतांना फार नाद असे. त्या कागदपत्रांत पणजोबांच्या मरणानंतरचा एक उल्लेख त्यांना असा सांपडला कीं, पणजोबांची और्ध्वदेहिक क्रिया चालली असतां त्यांच्या पिंडाला कांहीं केल्यानें कावळा शिवेना, तेव्हां अखेरीस दर्भाचा कावळा करून पिंडस्पर्श करणें भाग पडलें होतें. ह्या क्रियेच्या वेळीं त्यांचा मुलगा, म्हणजे हरिपंतांचे आजोबा हे वयानें लहानच होते. कांहीं दिवसांनीं ते मोठे झाले, परंतु त्यांच्या वडिलांप्रमाणें त्यांचा राजद्वारीं फारसा प्रवेश झाला नाहीं. बाजीरावी कारकीर्द चालली असतां त्याच्या दरबारामध्यें त्या वेळच्या शहाण्या मनुष्याचा शिरकाव झाला नाहीं, तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. परंतु त्या वेळीं सर्व हिंदुस्थानचें कल्याण करण्यासाठीं आणि आपल्या देशाचें राज्य दुसऱ्यांच्या हातीं देण्यासाठीं माल्कमसाहेबांच्या नजरेखालीं जी कांहीं हिंदुस्थानची कल्याणकारक आणि पुढारी ब्राह्मण सरदार मंडळी प्रयत्न करीत त्यांच्या टोळीमध्यें हे सामील झाले नाहींत हेंच मोठें भाग्य होय, असें त्या वेळच्या स्थितीवरून म्हणावें लागतें. वडिलोपार्जित संपत्तीवर हे बरीच श्रीमंती भोगीत होते. पण होळकरांनीं पुणें लुटलें तेव्हां यांच्या वाड्यांतील पैशाची बरीच अडगळ नाहींशी होऊन सर्व वाडा खुला होऊन राहिला होता. नंतर जें कांहीं इनामी गांवांचें वगैरे स्थावर उत्पन्न होतें, तेवढ्यावर ते आपला संसार चालवीत होते व पुढें ते फारसे कोणत्याही भानगडींत पडले नाहींत. त्यांनीं आपल्या थोरल्या मुलाला मात्र इंग्रजी शिक्षण देण्यासाठीं बराच पैसा खर्च केला, व हरिपंतांच्या वडिलांनीं त्याचें चीजही चांगलें केलें. परंतु ते इंग्रजीच मात्र चांगले शिकले, त्याच्यापलीकडे

त्यांनीं दुसऱ्या कशाचाही विचार केला नाहीं. इंग्रजी बोलणें, इंग्रजी लिहिणें, इंग्रजी खाणें, इंग्रजी पिणें, इंग्रजी निजणें, इंग्रजी बसणें, इंग्रजी उठणें वगैरे सर्व गोष्टींत ते इंग्रजी धर्तीवर वागत असत. हे पहिल्या अमदानींतील इंग्रजी शिकलेले असल्यामुळें बहुतेक आचारविचारामध्यें ते साहेब बनून गेले होते हें साहजिकच होतें. परंतु त्यांचे चिरंजीव हरिपंत हे मात्र आपल्या वडिलांच्या वळणावर गेले नाहींत. ते इंग्रजी शिकले नव्हते असें नाहीं, तरी पण कामापुरतें इंग्रजी आणि बाकी सर्व आपलें अशी त्यांच्या मनाची प्रवृत्ति असे. वडिलांनीं बराच पैसा मिळवून ठेविला असल्यामुळें त्यांनीं नोकरीची मुळींच हांव धरिली नाहीं. नेहमींचें गृहकृत्य करून जो वेळ सांपडे, तो ते देवधर्मांत घालवीत असत. सकाळीं स्नानसंध्या आणि दुपारून पुराण, कीर्तन अशा प्रकारची त्यांची दिनचर्या होती. कृष्णेच्या शीतोदकाचें त्यांचें प्रातःस्नान क्वचित् चुकलें असेल. स्नान झाल्यावर ते कृष्णेच्या कांठच्या एका महादेवाच्या देवळांत बसून आपलीं नित्यकर्में करीत असत. एके दिवशीं नित्याप्रमाणें स्नानसंध्या वगैरे होऊन त्यांनीं ब्रह्मयज्ञाला आरंभ केला. हरिपंतांचा हा कांहीं पहिलाच ब्रह्मयज्ञ नव्हता. शेंकडों वेळां त्यांनीं ऋषींच्या आणि पितरांच्या नांवानें पाणी सोडलें असेल. पण कल्पना कशा उत्पन्न होतात ह्याबद्दलची ज्यांना माहिती आहे त्यांना पुढील गोष्टीचें फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. एके दिवशीं कृष्णेच्या कांठीं महादेवाच्या देवळांत नित्याप्रमाणें ब्रह्मयज्ञ करीत असतां पितृत्रयीचा उच्चार करून त्यांना पाणी दिल्यानंतर ते मध्येंच एकदम स्तब्ध झाले, शब्द कंठांतील गहिंवरामुळें पालटून गेला, नेत्रप्रांतामध्यें बारीक अश्रुबिंदु उत्पन्न झाले, चेहऱ्यावर औदासीन्य दिसूं लागलें, पितरांना पाणी देण्याकरितां अंगठा खालीं फिरविलेला उजवा हात ताम्हनावरच राहिला व डाव्या हातांत धरलेली पळी जशीच्या तशीच निश्चल झाली. बाहेर असें स्थित्यंतर चाललें असतां आंतून हरिपंतांच्या मनांत विचारांचा उमाळा आला. ते आपल्यापाशीं म्हणाले:—मी हें काय करीत आहें? पितृतर्पण! पितृतर्पणाचा अर्थ काय? पितरांची तृप्ति करणें हा पितृतर्पणाचा अर्थ नव्हे काय! ह्या अर्थाचें पितृतर्पण मी करीत आहें काय? माझ्या कोणत्या कृतीनें माझे पितर तृप्त होतील? अशी मी कोणती कृति करीत आहे कीं जिच्या योगानें माझ्या पितरांनीं तृप्त व्हावें? पंचपात्रींतील पाणी पळीनें ताम्हनांत सोडलें

म्हणजे माझे पितर तृप्त होतील काय ? मुलांच्या हातून वडिलांना फक्त हें पळीभर पाणीच पाहिजे असतें काय ? ‘ अस्मत् पितरं......स्वधा नमस्तर्पयामि ’ असा संकल्प म्हणून मी पुढें चालतों. पण मी जेव्हां ‘ तर्पयामि ’ असें म्हणतों तेव्हां माझे पितर तृप्त होतात काय ? माझे पितर तृप्त होतात किंवा नाहीं याबद्दल मीं कधीं विचार केला नाहीं. नुसत्या ‘ तर्पयामि ’ या शब्दानें किंवा आणखी दोन पळ्या पाण्यानें ते कसे तृप्त व्हावेत ? खरें पितृतर्पण हें नव्हे. आपल्या वाडवडिलांच्या ज्या इच्छा अतृप्त राहिल्या असतील, त्या त्यांच्या वंशजांनीं आपल्या सदाचरणारानें आणि कर्तबगारीनें तृप्त केल्या तरच तें खरें पितृतर्पण होय. नाहीं तर या भांड्यांतील पाणी त्या भांड्यांत ओतल्यानें पितृतर्पण कसें व्हावें ? जुन्या कागदपत्रांत मीं असें वाचलें आहे कीं, माझ्या प्रपितामहांच्या पिंडाला कावळा स्पर्श करीना. पण तो कावळा त्यांच्या पिंडाला कां शिवेना ? त्यांच्या कांहीं तरी इच्छा अर्थात् अतृप्त राहिल्या असल्या पाहिजेत, म्हणून कावळा त्यांच्या पिंडाला शिवेना. त्या त्यांच्या इच्छा कोणी तृप्त केल्या आहेत ? त्यांच्या कुळांत त्यांच्यापासून माझ्यापर्यंत आजपावेतों बरेच पुरुष निर्माण झाले असतील, पण त्यांनीं त्यांच्या इच्छा तृप्त करण्यासाठीं काय केलें आहे ? मला वाटतें, माझ्या प्रपितामहांच्या नांवानें आज जर पिंड तयार केला अणि तो स्मशानांतील कावळ्यांच्यापुढें नेऊन ठेविला, तर आजचा देखील कावळा त्यांच्या त्या पिंडाला स्पर्श करणार नाहीं. इच्छा अतृप्त राहिलेल्या माझ्या प्रपितामहांचा आत्मा अजूनही त्या पिंडाभोंवतीं घिरट्या घालीत बसला असेल व तो कोणत्याही सजीव कावळ्यांना जवळ येऊं देणार नाहीं, असें मला खात्रीनें वाटतें. त्यांचा आत्मा आज शंभर वर्षेंपर्यंत जर अशा अतृप्त अवस्थेमध्यें घिरट्या घालीत बसला असेल तर मी हें पळीपंचपात्रीमध्यें पितृतर्पण करून काय कामाचें ? लोक पोटीं पुत्रसंतान कशाकरितां मागत असतात ? त्यांची क्रिया त्यांच्या मुलांनीं चालवावी, त्यांच्या इच्छा त्यांच्या मुलांनीं तृप्त कराव्या, आणि त्यांचा लौकिक त्यांच्या पाठीमागें त्यांच्या मुलांनीं जास्त वृद्धिंगत करावा, व सदाचार, न्याय, स्वधर्म, आणि नीति ह्यांच्या मार्गानें वागून ह्या जगामध्यें आपल्या कुळाची कीर्ति कायम राखावी म्हणून. मग तो हेतु असल्या पितृतर्पणानें कसा शेवटास जाणार ? आमच्या वाडवडिलांनीं आमच्यासाठीं देवाला नवस केले असतील, आणि

आमच्या कुळांतील माउल्यांनीं आमच्यासाठीं पिंपळाचे पार झिजविले असतील; व त्या वेळीं त्यांची इच्छा अशी असेल कीं, आपल्या पोटीं पुत्र होऊन तो आपल्या इच्छा तृप्त करील. पण आईबापांनो, तुम्ही अशी आशा बाळगण्यांत अगदीं चुकतां! पळीभर पाण्यानें तुमची तहान भागत असेल तेवढें पाणी कदाचित् तुमचा मुलगा सुधारक नसल्यास तुम्हांला मिळेल. पण मुलगा जर देशांतील सामाजिक स्थितीची सुधारणा करण्यांत गुंतला असेल तर तुम्हांला तें पळीभर पाणी मिळण्याचीही मारामार आहे. पण हें चांगलें नव्हे. पुत्रानें पितरांचें तर्पण न करावें तर दुसरा कोण करणार? माझ्या प्रपितामहांची इच्छा काय होती, माझ्या पितामहांची इच्छा काय होती, आणि माझ्या पित्याची इच्छा काय होती, हें लक्षांत न आणतां व त्या सर्व इच्छा तृप्त करण्याविषयीं कांहीं एक प्रयत्न न करतां तांब्यांतलें पाणी पंचपात्रींत आणि पंचपात्रांतील पाणी ताम्हनांत अशा प्रकारचा पोरखेळ जर मी खेळत बसलों, तर माझे पितर मजवर तृप्त होतील किंवा क्रुद्ध होतील, ह्याचा विचार मीं केला पाहिजे. मी आपल्या प्रपितामहांच्या इच्छा तृप्त न करून त्याला आपल्या पिंडाभोंवतीं आणखी किती दिवसपर्यंत घिरट्या घालावयाला लावणार? त्यांच्या या सूक्ष्म लिंगदेहांतील नाजुक अवयव शंभर वर्षें घिरट्या घालून घालून बहुधा अगदीं थकून गेले असतील. तरी पण मला अकरुणाला त्यांची करुणा येत नाहीं. ते जर आज जिवंत असते आणि मी जर आज बाल्यावस्थेच्या दुबळ्या स्थितीमध्यें असतों, तर मला दोन पावलें जास्त रांगतांना पाहून त्यांना गहिंवर आला असता, आणि मला कडेवर उचलून घेऊन आणि माझें चुंबन घेऊन त्यांनीं मला मोठ्या प्रेमानें म्हटलें असतें कीं, "बाळा नको रे रांगूं, ये मी तुला कडेवर घेतों, मी असतांना तूं आपल्या चिमुकल्या पायांना काय म्हणून श्रम द्यावेस!" असे उद्गार त्यांनीं खात्रीनें काढले असते. पण मला मात्र निष्करुणाला त्यांची करुणा येत नाहीं. त्यांना मीं आज शंभर वर्षें घिरट्या घालीत ठेविलें आहे आणि आणखी किती वर्षें ठेवीन ह्याचाही कांहीं नेम नाहीं. आणि शिवाय अशा प्रकारचा मी एकटाच खात्रीनें नसेन. माझ्याप्रमाणेंच ज्यांचे प्रपितामह आणि पितामह आपल्या पिंडाभोंवतीं घिरट्या घालीत बसले असतील असे किती तरी लोक सांपडतील! मेलेल्या माणसांच्या मनांतून ज्या गोष्टी असतात त्या जिवंत माणसांना सुचविण्याचें

त्यांचे कांहीं प्रकार आहेत. त्या प्रकारांनीं मेलेले प्रपितामह आणि पितामह आपआपल्या वंशजांना आपलें हृद्गत कळवीत असतील. कोणी पहांटेच्या शांत स्वप्नांत येऊन बोलत असतील, कोणी भयंकर मध्यरात्रीच्या गाढ झोंपेमध्यें भय दाखवून निजलेल्यांना जागें करीत असतील, कोणी संध्याकाळच्या काळोखा-मध्यें दूर उभे राहून खुणांनीं आपला मनोदय व्यक्त करीत असतील, व कोणी दिवसासही दिसत असतील. अशा अनेक उपायांनीं मृतांच्या भाषेनें मेलेलीं माणसें त्यांच्या दृष्टीनें सजीव असलेल्या माणसांशीं अनेक वेळां बोललीं असतील. पण त्यांच्या इच्छा तृप्त करण्याकडे व तशा प्रकारचें पितृ-तर्पण करण्याकडे माझ्याप्रमाणेंच कोणाचेंही लक्ष गेलेलें नाहीं. काशीवरून गयेला जातात व तेथें गेल्यानें पितर तृप्त होतात अशीही एक समजूत आहे. परंतु इच्छा तृप्त झाल्यावांचून तृप्ति कशी उत्पन्न व्हावी ! गयावर्जन किंवा पंच-पात्रींतील तिळोदक यांनीं मनांत असलेली इच्छा कशी तृप्त व्हावी ? व तृप्ती-वांचून तर्पण कसलें ? पूर्वजांच्या हेतूच्या तृप्तीनें तर्पण, तिळोदकाचें तर्पण खरें नव्हे. पितरांचें तर्पण जसें आमच्या हातून अशक्य, तसेंच ऋषींचेंही तर्पण अशक्य होय. आम्ही पातकी, सदाचरणहीन आणि दुर्वर्तनी लोक ऋषींचें तर्पण काय करणार ? ते ऋषी किती पवित्र आणि त्यांचें संतर्पण करण्याला मनुष्याची मनोवृत्ति किती पवित्र पाहिजे ! निरनिराळ्या ऋषींना त्यांचें संतर्पण करण्यासाठीं हाका मारण्याचा आणि त्यांचें मी तर्पण करतों, असें म्हणण्याचा तो प्रसंग किती गंभीर, किती उदात्त आणि किती पावन आहे ! त्या पवित्र महात्म्यांची नुसती कल्पनाही मनामध्यें आली म्हणजे सर्व शरीर सत्त्वगुणानें आणि उदात्त वृत्तीनें रोमांचित होऊन जातें. अशा त्या पवित्र ऋषींचें संतर्पण आमच्यासारख्या पतितांनीं, धर्मभ्रष्टांनीं, शिखानष्टांनीं आणि मद्यपरि-पुष्टांनीं काय करावें ! त्यांचीं नांवें उच्चारून आम्हीं तीं काय म्हणून विटाळावीं. कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ यांच्यासारख्या अत्यंत वंदनीय ऋषींचें तर्पण आम्हां पामरांच्या हातून काय होणार ? अरुंधती, गार्गी, वाचक्नवी, मैत्रेयी अशासारख्या महासाध्वींचीं नांवें उच्चारण्याला तरी आपल्याला काय अधिकार आहे ? द्यावापृथ्वी, अंतरिक्ष, अहोरात्र, समुद्र, नद्या, पर्वत, क्षेत्रें, औषधि, वनस्पति, पक्षी, गाई, विप्र ह्या परमेश्वराच्या सृष्टींतील अनेक वस्तु तृप्त होवोत, म्हणून आपण तोंडानें

म्हणतों, पण त्यांच्या तृप्तीसाठीं आपण काय करीत आहों? आणि आपण जर कांहीं केलें नाहीं तर त्या तृप्त कशा होणार? आपल्यासभोंवतालच्या सृष्टी-मध्यें जिकडे तिकडे हलकल्लोळ उडाला असून व क्षेत्र नापीक, औषध निःसत्त्व, गाई भक्षणीय आणि ब्राह्मण त्रस्त झालेले असून आपण या सगळ्यांना नुसतें तृप्यंतु असें म्हणून त्यांच्या ठिकाणीं तृप्ति कशी उत्पन्न होईल? ह्या पवित्र मंडळींच्या तृप्तीसाठीं आपण पवित्र कृत्यें केलीं पाहिजेत. समुद्र, नद्या, गिरी, क्षेत्रें, औषधि, वनस्पति, इत्यादि विश्वांतील वस्तूंच्या संतर्पणासाठीं आपण विश्वहितकारक गोष्टी केल्या पाहिजेत. परंतु जोंपर्यंत आपल्या हातून असें कांहीं होत नाहीं, तोंपर्यंत आपलें हें पितृतर्पण कसलें आणि ऋषितर्पण कसलें?

असे अनेक विचार हरिपंतांच्या मनांत येऊन त्यांचें डोकें अगदीं भडकून गेलें. क्षणभर ते देहभान विसरले. त्यांची चित्तवृत्ति त्यांच्या समोर दृश्यमान् असलेल्या वस्तुजातावरून निघून समाधीच्या द्वारानें त्यांच्यापुढें नसलेल्या अशा प्रदेशामध्यें क्षणभर संचार करती झाली. ते जेथें स्नानसंध्येला बसले होते, तेथें त्यांच्या समोरून कृष्णेचें तें प्रशान्त, शीतल आणि पावन उदक मंदगतीनें वाहत होतें. घाटावर स्त्रीपुरुषांचा समूह स्नान करीत होता. कृष्णाबाईच्या पूजेकरितां भाविक स्त्रियांनीं प्रवाहामध्यें सोडलेलीं फुलें तरंगत चाललीं होतीं. मंदवायूनें प्रचलित झालेल्या पाण्याच्या लहान लहान लाटांवर सूर्याचीं कोमल किरणें पडून सर्व नदीचें पात्र आल्हादकारक दिसत होतें. पलीकडच्या तीरावर असलेल्या झाडांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडलेलीं होतीं व त्यांच्या आसपास उगवलेल्या गवतावर गाई आणि वांसरें अत्यंत आनंदानें इकडे तिकडे चरत होतीं व त्यांचे गोवारी सर्व एकत्र जमून आपले बाळपणाचे खेळ खेळण्यामध्यें गुंतून गेलेले होते. हा जो देखावा त्यांच्या डोळ्यांपुढें होता तो एकाएकीं अदृश्य झाला व तेथें त्यांना अगदीं निराळाच प्रकार दृग्गोचर होऊं लागला. थोडया वेळापूर्वीं त्यांच्या डोक्यांमध्यें जे विचार घोळत होते त्यांचेंच मूर्तिमंत चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. ती ब्रह्मयज्ञांतील विश्वाची आणि त्यांतील देव, ऋषि, पितर यांची उदात्त कल्पना एक क्षणभर शरीर-मय होऊन आपलें विस्तीर्ण आणि सत्य स्वरूप त्यांच्यापुढें प्रकट करती झाली. परमेश्वरनिर्मित विश्वांतील द्यावापृथ्वी, अंतरिक्ष, अहोरात्र, समुद्र, नद्या, पर्वत, क्षेत्रें, औषधि, वनस्पति इत्यादि सर्व भव्य वस्तु त्यांच्यापुढें त्या थोडयाशा

जागेमध्यें दृश्यमान् होऊं लागल्या. त्याच नद्या, पर्वत, क्षेत्रें आणि वनस्पति यांच्या सन्निध आणि यांच्या मधून मनोहर पक्षी आणि दयास्पद गाई संचार करीत असलेल्या त्यांना दिसल्या. अप्, तृण, सूर्य हेही त्या ठिकाणीं हजर झाले. सिद्ध, गंधर्व, अप्सरा याही आपापल्या ठिकाणीं विराजमान झाल्या. वेदाचीं दहा मंडलें करणारे दहा ऋषि आपापल्या कुशासनांवर आरूढ झाले. त्यांच्याखालीं सुमंतु, जैमिनि, वैशंपायन, पैल हे येऊन बसले. तसेंच भाष्यकार, महाभारताचे कर्ते आणि इतरही सर्व धर्माचार्य येऊन आपापल्या योग्यतेप्रमाणें आपापलीं स्थानें सुशोभित करते झाले. मोठमाठ्या साध्वी ऋषिपत्न्याही मधून मधून दिसत होत्या. अग्नि, वायु, सोम हेही हजर झाले. सारांश, आजपर्यंतच्या परमेश्वराच्या या सृष्टीमध्यें जें जें कांहीं म्हणून उच्च, उदात्त, निर्मल, सात्त्विक, शुद्ध, पवित्र आणि लोकोपकारक होतें तें तें सर्व त्या ठिकाणीं एक क्षणभर येऊन एकवटलें होतें. हा सगळा महापुरुषांचा आणि पवित्र वस्तूंचा दिव्य आणि अद्भुत समाज परिदृश्यमान होत आहे तोंच या देखाव्याचें गांभीर्य पूर्णतेला येण्याला ज्यांची उणीव होती तीही पितृलोकांतील मंडळी त्या ठिकाणीं हळूहळू दिसूं लागली. परंतु त्यांचा देखावा मात्र बाकीच्याइतका शांत, संतुष्ट आणि समाधानकारक असा दिसला नाहीं. त्या विश्वांतील उत्कृष्ट वस्तूंच्या उदात्त समाजामध्यें एका पाठीमागून एक पितर येऊन बसूं लागले. त्यांचा समुदाय तर फारच मोठा होता व त्यामध्यें अनेक प्रकारचे पितर दृष्टोत्पत्तीस आले. त्यांत कोणी सिंहगडाच्या तटावरून कोसळून ठेचलेले, कोणी जिंजीच्या वाटेला कूच करीत असतां थकून अन्नपाण्यावांचून मुकलेले दिसत होते, कोणी पानिपतच्या लढाईंत शत्रूच्या तरवारीचे घाव अंगाला लागून घायाळ झालेले दिसत होते, कोणी खर्ड्याच्या लढाईंत विजयी झालेले असूनही दुर्मुखलेले आणि सचिंत झालेले दिसत होते, कोणी वसईच्या तहामुळें हातपाय मोडलेले दिसत होते, कोणी खडकीच्या लढाईंत जखमी झालेले, कोणी पुण्यापासून पळ काढून पळतां पळतां तोंडाला फेंस आलेले, व पाठीवर घाव लागलेले, आणि कोणी अष्ट्याच्या समरभूमीवर जखमी झालेले तेथें दिसत होते. ह्याशिवाय कोणी कत्तलीमध्यें मेलेले, कोणाची जानवीं तुटलेलीं, कोणी डोकीवर शेंडी नसलेले, कोणी तोंडांत गोमांस कोंबलेले, कोणी तोफेच्या गोळ्यानें शतधा छिन्नविच्छिन्न झालेले, कोणी बंदुकीची गोळी छातींत लागलेले,

कोणी संगिनीनें गळ्याला जखम झालेले, कोणी कृतकर्माबद्दल पश्चाताप पावलेले, कोणी डोळे काढलेले, कोणी लुटलेले, कोणी गांजलेले, कोणी भुकेनें मेलेले, असे असंख्य प्रकारचे पितर तेथें जमा झाले. त्यांपैकीं कोणाच्या डोळ्यांतून अश्रु वाहत होते, कोणाच्या तोंडांतून हाहाःकाराचा शब्द निघत होता, कोणाचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते, आणि कोणी नशिबाला हात लावून खिन्न मुद्रेनें अधोवदन होऊन बसले होते. ह्या मंडळींत कित्येक सिंहासनावरही बसले होते. परंतु त्यांच्याही चर्येवर दुःख, निराशा, औदासीन्य आणि खेद यांचींच चिन्हें दिसत होतीं. त्यांतच कोणाचे हात तोडलेले, कोणाचे पाय तोडलेले, कोणाच्या जिभा कापलेल्या, असे शरीरानें विद्रूप केलेलेही कित्येक लोक होते. पण यांच्यापेक्षां ज्यांचीं मनें विद्रूप करून टाकलेली होतीं असले लोक फारच भीतिप्रद दिसत होते. पराक्रमानें राज्य मिळविलेले आणि फितुरीनें राज्य बुडविलेले, स्वराज्य स्थापण्यासाठीं स्वतःचें शिरकमल वाहणारे आणि स्वराज्य बुडविण्यासाठीं दुसऱ्यांचीं शिरकमलें तोडणारे, असे सर्व प्रकारचे लोक खिन्नमुद्रेनें तेथें येऊन बसले होते. हा अपूर्व, अद्भुत आणि भयकारक समाज पाहून हरिपंतांच्या सर्वांगावर शहारे आले; व त्यांच्या मनामध्यें यांच्यासंबंधानें अनेक विचार घोळूं लागले. इतक्या पितरांना अजून गति मिळाली नाहीं कीं काय? यांचे वंशज शेंकडों वेळां ब्रह्मयज्ञ, पितृतर्पणें, गयावर्जनें व श्राध्दें करीत असतां अजून यांचे आत्मे उद्धरून गेले नाहींत, हें मोठें आश्चर्य आहे. इतक्यांच्या पिंडांना दहाव्या दिवशीं कावळे शिवले नाहींत कीं काय? जगांत इतके कावळे असून इतक्या लोकांच्या पिंडांना शिवण्याला धजण्याला एकदेखील कावळा मिळूं नये, इतक्या यांच्या इच्छा अतृप्त राहिल्या आहेत काय? आणि अजून इतके आत्मे आपापल्या पिंडाभोंवतीं घिरट्या घालीत राहिले आहेत काय? इतक्या सगळ्यांच्याच पोटीं मुलीच झाल्या काय! किंवा यांचें पुढें निसंतानच झालें? श्राद्ध करून यांना गति देण्याला यांच्या पोटीं कधीं पुत्रसंतान झालेंच नाहीं काय? कोणाच्या तोंडांत गोमांस कोंबलेलें आहे, आणि कोणाच्या छातींत गोळी घुसलेली आहे. त्या वेदनांपासून मुक्त करण्याला अजून यांना यांचा कोणीच वंशज भेटला नाहीं काय? इतके आत्मे तळमळत असून यांची कोणीच दाद घेत नाहीं हें कसें? आणि हे तरी इतके आत्मे असून आपल्या

वंशजांना स्वस्थ कसे बसूं देतात ? मध्यरात्रीं जाऊन आपल्या उग्र स्वरूपांनीं हे त्यांची झोंप कशी मोडीत नाहींत ? हे त्यांच्या अंगांत संचार कसा करीत नाहींत ? आपल्या कोणत्या इच्छा अतृप्त राहिल्या आहेत त्या हे ऐकणारांच्या कानठाळ्या बसेपर्यंत ओरडून कां सांगत नाहींत ? इतक्यांच्या मनांतून काय आहे ? यांची कोणती इच्छा तृप्त झाली म्हणजे हे मुक्तीला जातील ? ह्यांचें कोणतें तर्पण केलें पाहिजे ? असे अनेक तरंग हरिपंतांच्या मनामध्यें उठत असतां त्यांच्या समोर भरलेल्या त्या विश्वांतील उदात्त वस्तूंच्या आणि सिद्ध, गंधर्व, अप्सरा, ऋषि, ऋषिपत्न्या, इत्यादिकांच्या त्या प्रचंड दरबारामध्यें अग्रभागीं एक तेजाची लाट उसळली आणि त्यामधून इंद्र, वरुण, विश्वेश्वर वगैरे देवता, आपापलीं देदीप्यमान शरीरें धारण करून आविर्भूत झाल्या. आणि त्यांच्या मुखांतून कांहीं आशीर्वादपर शब्द निघाले. ते ऐकून सर्वांना आनंद झाला. नद्यांचें पाणी स्वच्छ आणि शांत दिसूं लागलें. पर्वत तृणाच्छादित झाले. क्षेत्रें शालिसंपन्न झालीं. औषधि, वनस्पति फलपुष्पाढ्य झाल्या. व त्यांमधून पक्षी आनंदानें संचार करूं लागले, आणि गाई निर्भयपणानें चरू लागल्या. यक्ष, गंधर्व, किन्नर प्रमुदित झाले, आणि अप्सरा नृत्य करूं लागल्या. ऋषि आणि ऋषिपत्न्या यांचीं अंगें हर्षानें रोमांचित झालीं. सूत्रकारांना आपलीं सूत्रें आणि भाष्यकारांना आपलीं भाष्यें बुडणार नाहींत असा धीर आला. सर्व पितरांची मुखश्री एवढा वेळपर्यंत म्लान दिसत होती ती नाहींशी झाली. त्याबरोबरच इंद्रादिदेवता अंतर्धान पावल्या. प्रातःकाळच्या नक्षत्रांप्रमाणें ऋष्यादि करून विश्वांतील जे उच्चतम आणि पवित्रतम तेथें जमले होते ते सर्व एकापाठीमागून एक मावळून गेले. त्याचप्रमाणें सर्व पितरही अदृश्य झाले. आपल्या दृष्टीसमोर पसरलेला हा पडदा एकदम नाहींसा झालेला पाहून हरिपंत झोंपेंतून जागे झाल्याप्रमाणें शुद्धीवर आले. नंतर त्यांनीं नेत्रस्पर्श करून आपल्या आजूबाजूला पाहिलें. परंतु समाधीच्या अवस्थेमध्यें त्यांनीं पाहिलेलें त्यांच्या कांहीं कोठें दृष्टीस पडेना. कृष्णाबाईचें पाणी मात्र पूर्वीप्रमाणें त्यांच्या पुढून मंद गतीनें वाहत होतें व त्यावर पसरलेलीं सूर्याचीं किरणें बहुतेक पूर्वींच्या इतकींच:कोमल होतीं. पलीकडच्या तीरावरील गाई आणि वांसरें पूर्वीप्रमाणेंच चरत होतीं. आणि त्यांचे गोवारीही पूर्वीप्रमाणेंच खेळत बसलेले होते. कृष्णाबाईच्या पूजेनिमित्त प्रवाहामध्यें सोडलेलीं फुलें मात्र पूर्वीपेक्षां हात दोन हात खालीं वाहून गेलीं होतीं.

## रॉबर्ट एमेट याचा शतसांवत्सरिक उत्सव : : १७

आयरिश लोकांच्या राष्ट्रीय इतिहासामध्यें तारीख २० सप्टेंबर हा दिवस महत्त्वाचा आहे. देशभक्त आयरिश लोक त्या दिवसाला अतिशय पवित्र मानतात. हा दिवस आयर्लंडवर प्रत्येक वर्षांतून एकदां उगवतो, व त्या प्रत्येक वर्षी आयरिश लोक हा दिवस उत्सवांत घालवितातच; परंतु यंदा हा सप्तंबरच्या विसावा दिवस हा आयरिश लोकांना अत्यंत महत्त्वाचा होता. १९०३ सालच्या सप्तंबर महिन्याच्या विसाव्या तारखेला आयरिश लोकांनीं फारच मोठा उत्सव केला. हा दिवस आयरिश लोकांना इतका पूज्य आणि प्रिय होण्याचें कारण असें कीं, त्यांच्यापैकीं प्रसिद्ध देशभक्त रॉबर्ट एमेट हा त्या दिवशीं आपली जन्मभूमि सोडून परलोकवासी झाला. ही शोकजनक गोष्ट इ. स. १८०३ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या विसाव्या तारखेला घडून आली असल्यामुळें यंदा या गोष्टीला बरोबर शंभर वर्षें झालीं. म्हणजे यंदाचा उत्सव हा शतसांवत्सरिक असल्यामुळें तो आयर्लंडमधील लोकांकडून फारच आनंदानें साजरा करण्यांत आला. हे उत्सव अनेक ठिकाणीं करण्यांत आले. स्कॉटलंडमध्येंसुद्धां हे उत्सव झाले. त्यांपैकीं एका ग्लासगो शहरामध्येंच या उत्सवाकरतां वीस हजार लोक जमले होते असें तिकडील हकीकतीवरून कळतें. या उत्सवामध्यें एक जंगी मिरवणूक काढण्यांत आली होती. या मिरवणुकींत रॉबर्ट एमेट जसा पोषाख करीत असे, तसा पोषाख करून दोन प्रमुख पुढारी घोड्यांवर बसून अग्रभागीं चालले होते. मिरवणुकीचा कार्यभाग संपल्यानंतर भरलेल्या सभेपुढें कित्येक ठराव पास झाले. पैकीं एका ठरावामध्यें असा स्पष्ट उल्लेख करण्यांत आला होता कीं, आयर्लंडची स्वतंत्रता आणि आयरिश लोकांचा उत्कर्ष ह्या ज्या दोन पवित्र गोष्टी त्या घडवून आणण्यासाठींच जो एमेट जन्मास आला होता व ज्यासाठींच तो मरणही पावला, त्या एमेटचे जे

हेतु होते तेच आमचे आयरिश लोकांचे हल्लींचे हेतु आहेत व त्यासाठीं आपण प्रयत्न करणें जरूर आहे. सदर प्रसंगीं मि. ओडोनेल ह्या प्रसिद्ध आयरिश वक्त्यांचें एक सुरस भाषण झालें. त्यांतही त्यांनीं हेंच तत्त्व प्रतिपादन केलें कीं, शंभर वर्षांच्या पूर्वी रॉबर्ट एमेट यानें जें कृत्य हातीं धरलें होतें तेंच कृत्य आपल्याला तडीस न्यावयाचें आहे. त्यानें हातीं धरलेल्या कामांत अपयश आलें असें कित्येकांचें म्हणणें आहे, पण त्याला अगदींच अपयश आलें असें नाहीं; त्याच्या कृत्यांनीं आज आपल्याला स्फूर्ति होत आहे, हें कांहीं थोडें यश आहे असें नाहीं. अशा प्रकारांनीं ज्या पुरुषाचे आयरिश लोक उत्सव करीत आहेत, ज्याच्याबद्दल आयरिश लोक अभिमान बाळगीत आहेत आणि शंभर वर्षांच्या अवधीनेंही त्याच्याविषयींची पूज्यबुद्धि आयरिश लोकांच्या मनामध्यें यत्किंचितही कमी न होतां उलटी जास्तच वाढत चालली आहे, असा तो राबर्ट एमेट कोण होता, आणि त्यानें आपल्या देशासाठीं काय केलें. त्यानें जिवंत असतां स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं काय काय खटपटी केल्या, आणि मरतेवेळीं आपल्या देशाच्या कळकळीनें त्याचें अंतःकरण खवळून जाऊन अंतकालीं त्यानें काय काय उद्‌गार काढले, हें जाणण्याची इच्छा वाचकांच्या मनामध्यें उत्पन्न होणें अपरिहार्य आहे.यासाठीं रॉबर्ट एमेट याचें संक्षिप्त चरित्र आणि त्यानें सरतेशेवटीं कोर्टामध्यें ज्यूरीपुढें केलेलें अत्युत्तम भाषण यांचा थोडक्यांत गोषवारा खालीं दिला आहे.

रॉबर्ट एमेट हा एक अतिशय प्रख्यात आयरिश देशभक्त होता. ह्याचा जन्म इ. स. १७७८ मध्यें झाला. याच्या बापाचा धंदा वैद्यकीचा असून तो फार प्रख्यात आणि सन्मान्य होता. आयर्लंडमध्यें 'युनायटेड आयरिशमेन' या नांवाची जी संस्था स्थापन झालेली होती, तिचे आयर्लंडमध्यें राज्यक्रांति घडवून आणण्याविषयींचे गुप्त बेत ज्या वेळीं चालले होते, त्या सुमारास रॉबर्ट एमेट याचा ट्रिनिटी कॉलेजमध्यें नुकताच प्रवेश झाला होता. त्या कॉलेजमध्यें इतिहास विषयाचा वादविवाद करण्याकरतां म्हणून कांहीं विद्यार्थ्यांनीं एक सभा काढली होती. तीमध्यें एमेट हा फारच प्रख्यातीस आला. अमेरिकेंत स्वातंत्र्याकरतां नुकतीच झालेली लढाई आणि फ्रान्समध्यें त्या सुमारासच लोकांच्या स्वातंत्र्याकरतां चालू असलेल्या राज्यक्रांतीच्या चळवळी ह्यामुळें तेथील विद्यार्थ्यांचीं मनें फारच क्षुब्ध होऊन गेलेलीं होतीं. व एमेटचे विचार तर इतक्या पराकाष्ठेला जाऊन पोंहोचले होते कीं त्याच्या कित्येक मित्रांसह एमेटला त्या वेळीं कॉलेज

मधून बाहेर घालवून देण्यांत आलें होतें. त्याची वक्तृत्वशक्ति फारच विलक्षण होती. इसवी सन १७९८ सालीं आयर्लंडमध्यें जी राज्यक्रांतीची चळवळ झाली, त्यांत एमेटचें कांहीं तरी अंग असलें पाहिजे असा संशय सरकारला आलेला होता. त्यामुळें तो फ्रान्समध्यें कांहीं दिवस जाऊन राहिला. आयर्लंडमध्यें त्रस्त झालेले लोक व तेथून पळून गेलेले पुष्कळ लोक फ्रान्समध्यें जाऊन राहिलेले होते. त्यांची व एमेटची गांठ पडली व तेथून एमेट आपल्या देशाच्या पुनरुज्जीवनासाठीं इ. स. १८०२ मध्यें प्रयत्न करूं लागला. आयर्लंडमधील लोकांचीं मनें फारच खवळलीं होतीं. त्यांतून आयर्लंड हें इंग्लंडशीं सामील केल्यामुळें तर तेथील लोकांचा संताप अगदीं पराकाष्ठेलाच जाऊन पोंहोचला होता. ही संधि नवीन राजकीय खटपटींना फारच चांगली होती. आणि त्याच सुमारास इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें लढाई सुरू होणार अशी चोहोंकडे दाट बातमी पसरल्यामुळें तर फ्रान्समध्यें येऊन राहिलेल्या आयरिश देशभक्तांचा आनंद गगनांतही मावेनासा झाला. त्या वेळीं नेपोलियन बोनापार्ट हा फ्रान्स देशाचा फर्स्ट कॉन्सल होता. त्याची रॉबर्ट एमेट यानें जाऊन समक्ष गांठ घेतली. तेव्हां थोडक्याच दिवसांत इंग्लंडवर स्वारी करण्याचा आपला निश्चय कायम झाला आहे असें नेपोलियननें त्याला सांगितलें. नेपोलियनपासून असें आश्वासन मिळाल्यानंतर एमेट हा इ. स. १८०२ च्या ऑक्टोबर महिन्यांत आयर्लंडमध्यें परत आला व डब्लिन शहरामध्यें गुप्तपणानें राहून तो नवीन राज्यक्रांतीची खटपट करूं लागला. तो निरनिराळ्या ठिकाणीं आपलीं निरनिराळीं नांवें सांगत असे. आणि जेणेंकरून आपले प्रयत्न गुप्त राहतील असे सर्व उपाय तो योजीत असे. पूर्वीच्या राज्यक्रांतीच्य खटपटीच्या वेळचे लोक शिल्लक होते ते त्यानें एकत्र जमविले; व पुष्कळ पैसा जमा करून आपल्या अनुयायांकरितां हत्यारें आणि दारूगोळा तयार करविण्याची त्यानें सुरुवात केली. पूर्वसंकेताप्रमाणें इ. स. १८०३च्या मे महिन्यांत इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें लढाई सुरू झाली, तेव्हां तर एमेटला मुळींच स्वस्थ राहवेना. डब्लिन शहरामध्यें ठिकठिकाणीं हत्यारें तयार करण्याचे जे गुप्त कारखाने त्यानें सुरू केले होते तेथें तो वरच्यावर जाई, तेथील कामगारांना उत्तेजन देई, आणि कधीं कधीं त्यांच्याबरोबर स्वतः काम करण्यालाही लागे. अशा रीतीची जारीनें तयारी चालली असतां जुलई महिन्यांतील एके दिवशीं

एमेटनें सुरू केलेल्या कारखान्यांपैकीं एके ठिकाणीं एकाएकीं दारूचा भडका होऊन मोठा आवाज झाला. त्यावरून सरकारला संशय येऊन चौकशी सुरू झाली. तेव्हां आतां आपण जास्त दिवस स्वस्थ बसलों तर आपले प्रयोग फुकट जातील असें वाटून आपला बेत लवकरच सिद्धीस नेण्याचा एमेटनें निश्चय केला व जुलई महिन्याची तेविसावी तारीख हा बंडाचा दिवस ठरवून तो त्यानें आपल्या सर्व अनुयायांना कळविला. ह्या वेळीं एमेट एका हत्यारांच्या कारखान्यांतच एखाद्या चटईवर पडून थोडा वेळ झोंप घेत असे व त्यानें तयार करविलेलीं हत्यारें त्याच्या सभोंवतीं जागृत असत. अशा स्थितींत तेविसावी तारीख आली, परंतु त्या तारखेस यश आलें नाहीं ? एमेटनें जे लोक बोलाविले होते त्यांपैकीं फारच थोडे हजर झाले होते. आणि त्या लोकांच्या हातून विशेष कांहीं झालें नाहीं. व सुमारें एक तासाच्या आंतमध्येंच ते सर्व पळून गेले. अशा रीतीनें सर्व आशा निष्फळ झाल्या. तेव्हांपासून रॉवर्ट कोठें तरी दडून राहून दिवस काढीत होता. परंतु त्याला पकडण्याकरितां गुप्त हेर चोहोंकडे फिरत होते. अखेरीस ऑगस्ट महिन्याच्या २५व्या तारखेला रावर्ट एमेट हा पकडला गेला. सप्टेंबरच्या १९ व्या तारखेला त्याची चौकशी सुरू झाली. त्या वेळीं त्यानें आपल्या बाजूनें कांहीं एक पुरावा दिला नाहीं. ज्यूरींतील लोकांना बसल्या जागेवरून उठून विचार करण्याकरितां आंत जाण्याचीही गरज पडली नाहीं. त्यांनीं हा अपराधी आहे असा आपला अभिप्राय तेथल्या तेथेंच दिला. 'नंतर तुला मरणाची शिक्षा कां देऊं नये, ह्याच्याविषयीं तुझें कांहीं म्हणणें असेल तर सांग' असें विचारल्यावरून रॉवर्ट एमेट यानें पुढील भाषण केलें:—

मला जी मरणाची शिक्षा झालेली आहे ती मला कां होऊं नये याच्याबद्दल माझें कांहीं म्हणणें असेल तर तें मीं तुमच्यापुढें मांडावें म्हणून तुम्हीं मला सांगितलें आहे. परंतु तुमचा जो आधींच निश्चय झालेला आहे तो ज्याच्या योगानें बदलतां येईल, असें माझ्यापाशीं बोलण्यासारखें कांहींच नाहीं. परंतु माझ्या प्राणापेक्षांही जास्त प्रियकर असें जें माझें नांव त्या नांवाला डाग न लागावा यासाठीं मला कांहीं बोलावयाचें आहे. तुम्ही ज्या न्यायासनावर बसलां आहां त्या न्यायासनावर असतांना माझ्या बोलण्यापासून तुमच्या मनावर कांहीं परिणाम होईल अशी मला बिलकुल आशा नाहीं. परंतु

माझें बोलणें माझ्या योग्य देशबांधवांच्या कानापर्यंत जाऊन पोंहोचावें यासाठींच मी येथें तें बोलून दाखवीत आहे. महाराज, मनुष्य मरून जातो पण त्याची आठवण मागें जिवंत राहते. माझी ती आठवण माझ्या देशबांधवांच्या आदराला पात्र होऊन मागें राहावी, यासाठींच माझें वर्तन निर्दोष कसें आहे हें मी या प्रसंगीं सिद्ध करून देण्याचा प्रयत्न करीत आहें. जेव्हां माझा आत्मा येथल्यापेक्षां अत्यंत जास्त सुखकर अशा ठिकाणीं जाईल, आणि ज्यांनीं आपल्या देशाच्या आणि सद्‌गुणाच्या संरक्षणाकरितां सुळावर किंवा समरांगणामध्यें आपलें रक्त खर्ची घातलें आहे अशा प्रकारच्या वीर पुरुषांच्या आत्म्यांच्या समुदायामध्यें जेव्हां माझा आत्मा जाऊन बसेल तेव्हां माझी स्मृति आणि माझें नांव यांच्या योगानें माझ्यामागें जे कोणी जिवंत राहिले असतील त्यांना स्फुरण यावें ही माझी इच्छा आहे.

आयर्लंडवर हल्लीं जे राजे राज्य करीत आहेत ते, अत्यंत श्रेष्ठ असा जो परमेश्वर, त्याच्या निंदेनें आपलें तोंड प्रत्यहीं विटाळून घेऊन येथील लोकांवर आपलें राज्य चालवीत आहेत. अरण्यांतील पशूंना जसें वागवावें त्याप्रमाणें ते येथील माणसांना वागवीत आहेत, भावाभावांमध्यें कलह उत्पन्न करून देत आहेत, आणि एका इसमास आपल्याच देशांतील दुसऱ्याचा गळा कापण्याला प्रवृत्त करीत आहेत. त्यांनीं केलेल्या विधवांचे आणि पोरक्या पोरांचे आक्रोश प्रत्यहीं एकसारखे चालले असतांही त्यांच्या मनाला द्रव येत नाहीं इतके ते क्रूर झाले आहेत. अशा रीतीनें नीतिभ्रष्ट झालेल्या राजांचें आयर्लंडवरील राज्य लयाला जावें अशी माझी इच्छा आहे. माझ्यापूर्वीं जे देशभक्त मारले गेले त्यांच्या रक्ताची शपथ घेऊन, तसेंच ज्या परमेश्वराच्या सिंहासनासमोर मला आतां लवकरच जाऊन उभें राहावयाचें आहे त्याची शपथ घेऊन, त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराला स्मरून मी असें सांगतों कीं, माझ्या देशावर जो हा राक्षसी जुलूम आज कित्येक वर्षेंपर्यंत चालला आहे, त्या जुलमापासून आपल्या देशाला मुक्त करावें ह्याच्यापेक्षां दुसरा कोणताही हेतु माझ्या मनामध्यें नाहीं. आणि या प्रसंगीं जरी माझा प्रयत्न फसला, तरी हें अत्यंत उदात्त साहसाचें कार्य तें करण्याला आयरिश लोकांमध्यें अजून पुष्कळ सामर्थ्य आहे हें सर्वांना खात्रीनें सांगतों. सरकारला एक क्षणभर भीति दाखविण्यासाठीं मी असें म्हणतों असें आपण समजूं नका. जिवंत असतांना ज्याच्या तोंडून एकही

खोटें अक्षर बाहेर पडलें नाहीं, तो मी अशा माझ्या अंतकाळच्या प्रसंगीं आणि माझ्या देशाच्या स्वतंत्रतेसारख्या विषयासंबंधानें आपल्या भावी पिढीला कांहीं तरी अन्यथा सांगून आपल्या सत्यपणाच्या ब्रीदाला कलंक लावून घेईन असें आपण कधींही समजूं नका. माझा देश स्वतंत्र झाल्यावांचून माझ्या थडग्यावर कोणीही माझा मृत्युलेख लिहूं नये अशी ज्या माझी इच्छा आहे, तो मी माझ्या शत्रूच्या हातांत असत्यतेबद्दल मला नांवें ठेवण्याचें साधन देईन असें कधींही व्हावयाचें नाहीं. (या ठिकाणीं कोर्टानें बोलण्याचा प्रतिबंध केल्यावरुन एमेट जज्जांना उद्देशून पुढीलप्रमाणें म्हणाला) :—महाराज, आपण अधिकारावर आरूढ झालेले आहां म्हणून कोणाला आपलें कौतुक वाटत असेल तर वाटो. परंतु मला तर आपण असल्या दुःस्थितीमध्यें सांपडल्याबद्दल अतिशय खेदच वाटत आहे. मी जें येथें बोलत आहे तें आपल्याकरितां नव्हेच. माझे शब्द माझ्या देशबांधवांकरितां आहेत. येथें जर कोणी खरा आयरिशमन हजर असेल तर जेव्हां जेव्हां त्याच्यावर कांहीं संकटें येतील तेव्हां तेव्हां हे माझे शेवटले शब्द त्याचें अंतःकरण उल्हासानें परिपूरित करोत. (येथें फिरून प्रतिबंध करण्यांत आला; व जज्ज लॉर्ड नॉरबरी यांनीं ‘ मी येथें राजद्रोह ऐकण्याकरितां बसलों नाहीं ’ असें सांगितलें. त्यावर एमेट म्हणाला :—) कायद्याची शिक्षा सांगणें हें जसें न्यायाधीशाचें काम आहे तसेंच आरोपीचें म्हणणें शांतपणानें ऐकून घेणें आणि त्याच्याशीं ममताळूपणानें बोलणें हेंही त्यांचें एक काम आहे असें मी समजतों. तसेंच, ज्याला आरोपी म्हणून म्हणण्यांत येत आहे तो कोणत्या हेतूनें आपलें कृत्य करण्याला प्रवृत्त झाला होता हें समजून घेणें हें सुद्धां न्यायाधीशाचें एक काम आहे. पण तसें येथें कांहींच दिसत नाहीं. तुमच्या संस्थानच्या स्वतंत्रपणाविषयीं तुम्ही ज्या एवढया फुशारक्या मारीत आहांत ती स्वतंत्रता आहे कोठें? तुमच्या न्यायाच्या कोर्टांतून निःपक्षपात, दया आणि ममताळूपणा वगैरे गोष्टी असतात म्हणून तुम्ही बढाई मारतां त्या कोठें आहेत? तुम्ही मला न्यायानें शिक्षा देत नसून राजकीय धोरण मला शिक्षा देत आहे. तरी पण तें कांहीं असलें तरी फांशी देण्यासाठीं ज्याला तुम्ही आपल्या मारेकऱ्यांच्या हवालीं करीत आहां त्यानें ज्याला तुम्ही गुन्हा म्हणत आहां ती गोष्ट कोणत्या हेतूनें केली याच्याविषयीं खुलासा करण्याला जर तुम्हीं त्याला संधि दिली नाहीं तर मग तुमची फुशारकी व्यर्थ नव्हे काय? सुळावर

चढविण्याच्या अपमानाला मला पात्र केल्यानें आपली क्षुब्ध झालेली न्यायदेवता संतुष्ट होईल असें कदाचित् तुम्हांला वाटत असेल, पण तुम्ही ज्याला अपमान म्हणतां तो मला अपमान म्हणून मुळींच वाटत नाहीं. फांशी जाणें हा मी अपमान समजत नाहीं, परंतु ह्या कोर्टामध्यें माझ्याविरुद्ध जे कित्येक खोटे आरोप करण्यांत आले आहेत ते मात्र मला अपमानकारक वाटत आहेत. महाराज, सांप्रत तुम्ही न्यायाधीश आहां आणि मी तुमच्या समजुतीप्रमाणें गुन्हेगार आहे. पण वास्तविक पाहिलें असतां मी एक मनुष्य आहे आणि तसेंच; तुम्हीही एक मनुष्य आहां. पण जर कालचक्र फिरलें असतें, तर कदाचित् तुम्ही आहां तेथें मी आलों असतों, आणि मी आहें तेथें तुम्ही आलां असतां, अशा आपण जागा बदलल्या असत्या. पण जागा बदलल्या तरी मनुष्य आपले स्वभाव बदलूं शकत नाहीं. जर ह्या कोर्टांत उभा राहून मी खरोखर निष्कलंक आहे असें सिद्ध करून देण्याची तुम्हीं मला संधि दिली नाहीं, तर मग तुम्ही न्याय कसला करतां! ही न्यायाची थट्टा आहे. तुम्हीं मला मरणाची शिक्षा दिली आहे, माझ्या जिभेला गप्प बसण्याची शिक्षा दिली नाहीं, किंवा माझ्या कीर्तीला डागळून जाण्याची शिक्षा दिलेली नाहीं. मला परमेश्वरानें जें आयुष्य दिलेलें आहे त्याचा तुमचा मारेकरी मध्येंच तुकडा पाडो, परंतु जोंपर्यंत मी जिवंत आहें तोंपर्यंत माझी कीर्ति निष्कलंक राहण्याविषयीं प्रयत्न केल्यावांचून मी कधींही राहणार नाहीं. मला आयुष्यापेक्षां निर्मळ कीर्तीच प्रियकर आहे. आणि मी मेल्यानंतर ती कीर्तीच माझ्यापाठीमागें उरणार आहे. त्या कीर्तीला तुम्ही जे डाग पाडूं पाहत आहां ते धुऊन काढण्याला मी आपल्या उरलेल्या आयुष्याचा उपयोग केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. महाराज, आपण सगळीं माणसें आहों. म्हणून केव्हां तरी एके दिवशीं परमेश्वराच्या न्यायाच्या कोर्टांत आपण सगळेजण एकत्र जमूं आणि त्या वेळीं कोणाचें अंतःकरण शुद्ध होतें, आणि कोणाचीं कृत्यें अत्यंत सद्‌गुणांचीं होतीं—माझीं होतीं किंवा माझ्या देशावर जुलूम करणारांचीं होतीं—याबद्दल निर्णय तो सर्वसाक्षी परमेश्वर करील. (येथें फिरून प्रतिबंध करण्यांत आला. त्या वेळीं एमेटनें याप्रमाणें उत्तर केलें.) :— कांहीं क्षुद्र नफ्याचा हेतु मनामध्यें धरून मी आपल्या देशाची स्वतंत्रता नष्ट करून टाकीत होतों, अशा प्रकारचा आरोप मजवर ठेवून तुम्हीं माझा अपमान केला आहे, त्याचें क्षालन करण्याची मला तुम्हीं संधि दिली पाहिजे. मृत्यूची

शिक्षा कां देऊं नये, याच्याबद्दल तुम्हीं मला कारण विचारलें. असा प्रश्न विचारावा असें कायद्यानें सांगितलें आहे, म्हणून तुम्हीं हा प्रश्न मला विचारिला हें मी जाणतों. पण असा प्रश्न विचारल्यानंतर त्याचा जबाब देण्याचा हक्क कायद्यानें मला दिलेला आहे आणि त्या कायद्यानें दिलेल्या माझ्या हक्काला जर फांटा द्यावयाचा, तर मग माझ्या चौकशीचा हा जो सगळा तमाशा करण्यांत आला त्याची तरी काय गरज? कारण ज्यूरी एकत्र जमण्याच्यापूर्वींच मला काय शिक्षा द्यावयाची हें दुसरीकडे ठरलेलें होतें. (ह्यानंतर कोर्टानें बोलण्याची परवानगी दिल्यावरून एमेट पुढें म्हणालाः—)

मी फ्रान्सचा गुप्त हेर आहे, असा तुम्हीं मजवर, आरोप ठेवला आहे. फ्रान्सचा गुप्त हेर, आणि तो कशाकरितां? मी आपल्या देशाचें स्वातंत्र्य विकणार होतों असें तुम्ही म्हणतां, पण मी असें कां करीन? माझी ही महत्त्वाकांक्षा आहे काय? नाहीं. मी फ्रान्सचा गुप्त हेर नाहीं. माझ्या देशाच्या गुलामगिरीच्या बंधनांतून सोडवणारे जे कोणी असतील त्यांच्या वर्गामध्यें माझी गणना व्हावी ही माझी महत्त्वाकांक्षा होती. त्या कृत्यापासून मिळणारा फायदा किंवा हातीं येणारी सत्ता ही मला नको होती, परंतु तें कृत्य मीं केलें एवढें माझें नांव झालें म्हणजे मला बस होतें. मी आपल्या देशाचें स्वातंत्र्य फ्रान्सला विकणार! आणि त्यापासून काय फायदा? आमच्या छातीवर नाचणारे एक जाऊन दुसरे यावे अशी माझी महत्त्वाकांक्षा होती? आणि माझा खाजगी फायदा व्हावा एवढीच जर माझी इच्छा असती, तर माझी विद्वत्ता, माझी संपत्ति, आणि माझें उच्च कुल यांच्या योगानें तुमच्यापैकीं आज जो आयर्लंडवर अतिशय जुलूम करीत आहे, त्याच्या इतक्या मोठ्या योग्यतेची जागा मलाही मिळवितां आली असती. पण माझी ती इच्छाच नव्हती. माझा देश हेंच काय तें माझें सर्वस्व. माझें व्यक्तिशः जें कांहीं होतें किंवा जें कांहीं मला प्रिय होतें, तें सर्व मीं त्यापायीं खर्चीं घातलें, आणि तें सगळें संपल्यावर आतां मी आपला देहसुद्धां, हे परमेश्वरा, खर्चीं घालीत आहें. महाराज, परकीय लोकांच्या जुलमाच्या जोखडापासून, आणि कुऱ्हाडीच्या दांड्याप्रमाणें जे आपल्याच गोताला काळ झालेले आहेत अशा प्रकारच्या कित्येक आयरिश लोकांच्यापासून, आपल्या देशाला स्वतंत्र करावें या हेतूनेंच मी हा प्रयत्न करीत होतों. हा जो आपल्या देशाला दुहेरी फांस बसला आहे, त्या भयंकर फांसापासून त्याचा गळा मोकळा करावा,

हीच माझ्या अंतःकरणाची इच्छा होती. सगळ्या जगामध्यें अतिशय उच्च आणि स्पृहणीय अशा स्वतंत्रतेच्या सिंहासनावर आपल्या देशाला नेऊन बसवावें, ही माझी महत्त्वाकांक्षा होती. मीं या कामीं फ्रान्सशीं संबंध ठेवला होता हें खरें; पण तो कशासाठीं? आमच्या स्वतंत्रतेसाठीं. ती मिळविण्याच्या कामीं फ्रान्स आम्हांला मदत करणार होतें. आयरिश लोकांच्या इच्छेविरुद्ध आणि त्यांनीं न बोलावतां फ्रेंच लोक आयर्लंडवर स्वारी करण्याकरितां शत्रु म्हणून आले असते तर माझ्या अंगांत जितकी म्हणून शक्ति आहे तितकी सगळी खर्च करून मींच त्यांना प्रतिबंध केला असता. माझ्या देशबांधवांनो, एका हातांत तरवारी आणि दुसऱ्या हातांत मशाली घेऊन फ्रेंच लोक आपल्या किनाऱ्यावर उतरत असतां तुम्ही त्यांस जाळा, पोळा, मारा, असा तुम्हांला मींच उपदेश केला असता. त्यांनीं माझ्या देशाची जमीन आपल्या पायांनीं विटाळण्याच्या पूर्वींच त्यांच्या बोटीमध्येंच त्यांना जाळून टाकण्याविषयीं मीं देशबांधवांना चेव आणला असता, व इतकेंही करून जर ते किनाऱ्यावर उतरलेच असते, तर आयर्लंडच्या जमिनीच्या प्रत्येक इंचावर मीं त्यांना अडथळा केला असता, तेथील प्रत्येक गवताची काडी मीं जाळून टाकली असती, आणि माझा प्राण जाईपर्यंत मीं आपल्या देशाची स्वतंत्रता त्यांच्या हातीं जाऊन दिली नसती. आणि शिवाय मी मरतांना माझ्या देशाची स्वतंत्रता फ्रेंचांपासून कायम राखण्याची गोष्ट माझ्या हातून शेवटास गेली नसती तर ती शेवटास नेण्याबद्दल मीं आपल्या बाकीच्या देशबांधवांना माझी शेवटची विनंति म्हणून सांगितली असती. कारण, परकीय लोकांनीं आपला देश जिंकून ताब्यांत ठेवला असतां त्या ठिकाणीं जिवंत राहणें ह्यांत कांहीं अर्थ नाहीं, अशी माझी मनोदेवता मला सांगते. फ्रान्स हा शत्रु म्हणून मी त्याला आपल्या घरांत घेत नव्हतों. आयरिश लोकांना गुलामगिरीचा तिटकारा आला आहे आणि आपल्या देशाचें स्वातंत्र्य स्थापित करण्याला ते उद्युक्त झाले आहेत असें जगाला दाखवून, वाशिंग्टननें अमेरिकेकरतां जें केलें तें आपण आपल्या देशाकरतां फ्रान्सच्या मदतीनें करावें, अशी माझी इच्छा होती आयर्लंडचे जुने जुलमी राजे घालवून देण्यासाठीं हा माझा प्रयत्न होता, नवीन बोलविण्यासाठीं नव्हता. दुसरें एक माझ्याविरुद्ध असें म्हणणें आहे कीं, तुम्ही जुलूम करणारे आणि आम्ही, जुलमानें गांजलेले तुमच्या ह्यांच्या दरम्यान हें जें भयंकर असें युद्ध माजलें आहे त्यामध्यें जो कांहीं रक्तपात

होईल त्या सगळ्या रक्ताची जबाबदारी देवाच्या घरीं माझ्या डोक्यावर राहील. पण हें म्हणणें खोटें आहे. मीं आपल्या आयुष्यामध्यें जें जें कांहीं केलेलें आहे, त्याबद्दल जाब देण्याकरतां त्या सर्वसाक्षी न्यायाधीशापुढें जाण्याला मला बिलकुल भीति वाटत नाहीं. आणि त्या भीतीचा बाऊ मला तुम्ही दाखविणार? ह्या तुमच्या न्यायाधीशाच्या कामांत तुमच्याकडून अनेक निरपराधी लोकांचें जें रक्त सांडलें आहे, तें जर सगळें एकत्र गोळा करतां आलें असतें, तर महाराज, तुम्हांला ज्यामध्यें स्वैर रीतीनें पोहतां येईल इतकें मोठें तळें त्या रक्तानें भरलें असतें, याचा आपण विचार करा. सबब माझ्यावर अपमानकारक आरोप घालून मी मेल्यानंतर माझ्या नांवाला कोणीही कलंक लावण्याचा प्रयत्न करूं नये. हल्लीं आमच्यावर जे राजे जुलूम करीत आहेत, त्यांच्या जुलमाचा मी ज्या कारणासाठीं प्रतिकार करीत आहें, त्याच कारणासाठीं मी नवीन परकीय राजांसही आपल्यावर जुलूम करण्याकरतां आपल्या घरांत घेणार नाहीं, हें लक्षांत बाळगून कोणीही माझ्यावर भलभलते आरोप करूं नयेत. कोणी परकीय जुलमी राजा जर माझ्या देशावर चाल करून येत असतां तर स्वदेशाच्या स्वतंत्रतेचें संरक्षण करण्याकरतां मी आपल्या देशाच्या उंबरठ्यावर उभा राहून त्याच्याशीं लढलों असतों आणि माझ्या प्रेतावर पाय दिल्यावांचून त्या शत्रूला माझ्या देशामध्यें प्रवेशच करतां आला नसता. जो मी आजपर्यंत आपल्या देशासाठींच जिवत राहिलों होतों, आपल्या देशासाठींच हा देह थडग्यामध्यें पुरून घेण्याला जो मी आज तयार झालों आहें आणि माझ्या देशबंधूंना त्यांचे राजकीय हक्क मिळवून देण्याकरतां जुलमी आणि मत्सरी राज्यकर्त्यांच्या द्वेषाला ज्या मीं आपल्या स्वतःला पात्र करून घेतलें तो मी असलें स्वदेशद्रोहाचें काम करीन काय? नाहीं. परमेश्वरा, माझ्या हातून अशी गोष्ट कधींही घडूं देऊं नकोस! (या ठिकाणीं लॉर्ड नॉरबरी हे असें म्हणाले कीं, तुझें उच्च कुल आणि तुझी विद्वत्ता ह्यांना असले विचार आणि असले शब्द फार लाजिरवाणे आहेत आणि तुझा बाप जर आज जिवंत असता तर त्याला हीं तुझीं असलीं मतें कधींही पसंत पडलीं नसतीं. ह्यावर एमेटनें पुढें लिहिल्याप्रमाणें उत्तर दिलें:—) मेलेल्या माणसांच्या आत्म्याचा या जगाशीं मेल्यावर कांहीं संबंध उरत असेल आणि मरणाच्या पूर्वी त्यांना या क्षणभंगुर संसारामध्यें जीं माणसें प्रियकर वाटत होतीं त्यांच्या सुखदुःखाची काळजी परलोकामध्येंही जर त्यांना वाटत असेल तर हे माझ्या मृत झालेल्या बापाच्या

प्रियकर आणि पूज्य आत्म्या ! तूं ह्या आपल्या मृत्युलोकाच्या कांठावर उभ्या राहिलेल्या मुलाच्या वर्तनाकडे नीट न्याहाळून पाहा, आणि मी लहान होतों त्या वेळीं, बाबा, तुम्हीं मला सद्गुण आणि स्वदेशाभिमान यांचीं जीं तत्त्वें शिकविलीं त्यांच्यापासून मी कधीं एक क्षणभर तरी ढळलों आहे कीं काय, तें मला सांगा. असो. महाराज, माझा जीव घेण्याविषयीं तुम्ही फार उतावीळ झालेले आहां व त्यासाठीं तुम्हीं माझ्यासभोंवतीं हीं अनेक कृत्रिम साधनें निर्माण केलीं आहेत. परंतु ह्यांच्या भीतीनें माझें रक्त गोठून गेलेलें नाहीं. तें अजून कढत असून माझ्या शरीरांतील शिरांमधून तें स्वैरपणें संचार करीत आहे. परमेश्वरानें जें रक्त माझ्या अंगामध्यें फार मोठमोठीं कृत्यें करण्याकरितां घातलें होतें, परंतु तुम्हीं तें अत्यंत नीच हेतूनें व्यर्थ दवडून टाकीत आहां, व या तुमच्या कृत्याबद्दल तें माझें रक्त परमेश्वरापाशीं नेहमीं आक्रोश करीत राहील. तुम्हांला घाई झाली आहे खरी, पण तुम्ही थोडा वेळ थांबा. मला आणखी चार शब्द सांगावयाचे आहेत. माझें आयुष्य संपलें. माझा प्राणरूपी दिवा अगदीं जाण्याच्या बेतांत आला आहे. मी आतां आपल्या थडग्याच्या कांठावर उभा आहें. थडगें मला गिळण्याकरितां आ पसरील आणि मी त्याच्या तोंडामध्यें उडी टाकीन. अशा वेळीं मला एकच विनंति करावयाची आहे. आणि ती ही कीं, कोणीही मनुष्यानें माझ्या थडग्यावरील मृत्युलेख लिहूं नये. कारण, ज्यांना माझे खरे हेतु माहीत आहेत त्यांना ते जगापुढें व्यक्त करून दाखविण्याची ही योग्य वेळ वाटत नाहीं. आणि माझ्याबद्दल उगीच भलत्याच लोकांनीं भलतेंच कांहीं तरी लिहून ठेवण्यांत कांहीं हंशील नाहीं. त्यापेक्षां त्यांनीं आणि मीं दोघांनींही योग्य वेळ येईपर्यंत अज्ञातवासामध्यें स्वस्थ पडून राहणें हेंच उत्तम होय. माझे खरे हेतु व्यक्त करणाचे दिवस आणि करणारीं माणसें हीं येईपर्यंत माझी स्मृति तुम्ही सर्वजण विसरून जा; आणि माझ्या थडग्याच्या दगडावर तुम्हीं कोणी कांहींही लिहूं नका. पृथ्वीच्या पाठीवरील स्वतंत्र राष्ट्रांच्या वर्गामध्यें माझा देश ज्या दिवशीं जाऊन बसेल, त्या दिवशीं माझ्या थडग्याच्या दगडावरील लेख लिहा; तोंपर्यंत लिहूं नका.

इतकें बोलून एमेटनें आपलें भाषण संपविलें. या भाषणाची आयरिश लोकांमध्यें फारच ख्याति झालेली आहे व सर्व आयरिश लोक एमेटला आपल्यापैकीं अतिशय श्रेष्ठ देशभक्त म्हणून मानतात. एमेटला फांशी देऊन त्याचें शिर

धडापासून निराळें कापून सरकारचे शिपाई घेऊन गेले. हें कृत्य पाहण्याकरितां पुष्कळ आयरिश लोक जमले होते व तें पाहत असतां हा आपल्यासाठीं मरण पावला असें मनांत आणून सर्व लोक एकसारखे रडत होते, व ज्या ठिकाणीं एमेटचें रक्त सांडलें होतें त्या ठिकाणीं येऊन सर्व आबालवृद्धांनीं ह्या उत्कृष्ट देशभक्ताचें स्मरण राहण्याकरितां त्याच्या रक्तामध्यें आपले हातरुमाल भिजवून घेतले. हल्लीं पृथ्वीच्या पाठीवर जेथें जेथें म्हणून आयरिश लोक आहेत तेथें तेथें त्यांच्या अंतःकरणांतून एमेटचें नांव आहेच. मात्र त्याच्या थडग्याच्या दगडावरील मृत्युलेख अजून लिहिला जाण्याची वेळ येत नाहीं म्हणून सर्वांच्या डोळ्यांतून या गोष्टीची आठवण झाली म्हणजे खळखळ पाणी येतें. हा एमेटचा मृत्युलेख म्हणजे चाणक्याची शेंडीच होय. असले करारी आणि देशभक्त पुरुष कोणत्याही देशाला भूषणास्पद होत.

---

## सगळेच नरसू : : १८

नरसू हा एक प्रथमतः अतिशय वात्रट मुलगा होता. इंग्रजीमध्यें ट, फ, करण्याचें ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर जीं कित्येक मुलें शाळा सोडतात त्यांपैकींच नरसू हा एक होता. थोडयाशा इंग्रजी शिक्षणापासून जितके वाईट संस्कार मनावर होणें शक्य आहे, तितके झाल्यावर नरसूनें पुढें इंग्रजी शाळेची मुर्वत धरली नाहीं. त्याला एकदां कांहीं क्षुल्लक कारणावरून पोलिसनें धरून नेलें होतें. त्या वेळीं तेथील साहेबांपाशीं नरसू इंग्रजींत बोलला आणि तेव्हां-पासून त्याला असें वाटूं लागलें कीं, आपण साहेबापाशीं इंग्रजींत बोललों आतां आणखी इंग्रजी किती शिकावयाचें ? असें म्हणून त्यानें शाळा सोडली. इंग्रजी चारपांच बुकांच्या अर्धवट ज्ञानानें आपल्या सर्व दुर्गुणांनीं नरसूला नखशिखांत विभूपित केलेलें होतें. साहेबानें वापरून टाकून दिलेलें जुनें सामान मोठ्या शहरांतून पुष्कळ ठिकाणीं विकत मिळतें. त्यांपैकीं एक गवताची

टोपी, एक विजार आणि एक बूट इतकें नरसूनें स्वतःच्या पैशानें विकत घेतलें होतें. त्याच्या अंगांतील कोट युरोपियन फॅशनचाच होता. परंतु तो कोट तो बहुधा कोणाचा तरी मागून घेत असे. शिवाय चष्मा, कॉलर, वगैरे सामान त्यानें स्वतः कधीं विकत घेतलेलें नव्हतें, किंवा कोणापासून उसनें मागून घेतलें नव्हतें. तरी पण त्याच्या नाकावर चष्मा आणि गळ्यावर कॉलर नाहीं, असा एकही दिवस गेला नाहीं. त्याच्या घरची फार गरीबी होती. तरी पण तो बाहेर निघाला म्हणजे इतक्या थाटानें निघत असे कीं, त्याला पाहून हा कोणी तरी नेटिव खिरस्ती ड्रायव्हर असावा असा लोक तेव्हांच तर्क करीत. बाहेरून जरी त्याचा भपका इतका मोठा दिसे तरी त्याला एखादे वेळीं जेवणाचीसुद्धां अतिशय पंचाईत पडे. त्यानें आपलें पोट भरण्यासाठीं अनेक धंदे केले. तो कांहीं दिवस फक्त ब्राह्मणांनीं ब्राह्मणांकरितां काढलेल्या चहाकॉफीच्या आणि विश्रांतिगृहाच्या एका दुकानामध्यें चाकरीला राहिला होता. परंतु तेथें चहा वगैरे पेय द्रव्यें पिण्याकरिता जे ब्राह्मण येत त्यांना हा नेटिव खिरश्चन आहे कीं काय अशी शंका उत्पन्न होई आणि म्हणून ग्रामण्याच्या भीतीनें ते परत जात. अशा रीतीनें ह्या विश्रांतिगृहाच्या मालकाचीं गिऱ्हाईकें परत जाऊन नुकसान होऊं लागल्यावर त्यानें नरसूला तेथून काढून लाविलें. त्यानंतर त्याला एका गोॲनीज गृहस्थाच्या दारूच्या दुकानावर चाकरी लागली. तेथें नरसूचें वस्तान चांगलें बसलें होतें. आपल्या यजमानाचा माल खपविण्याबद्दल नरसू आपल्याकडून फारच अंगमेहनत करीत असे व त्याच्या मेहनतीसारखा तेथील माल खपतही असे. दररोज सकाळीं मालकानें नवीन मालाच्या बाटल्या नरसूच्या हवालीं कराव्या व संध्याकाळीं शिल्लक उरलेला माल मोजून घ्यावा आणि पैशाचा हिशोब महिनाअखेर नरसूनें द्यावा, अशी दुकानाची व्यवस्था लावून दिली होती. त्याप्रमाणें दररोज द्यावा तितका माल खपलेला पाहून मालक नरसूवर फारच खूष झाला होता. परंतु महिनाअखेर जेव्हां पैशाचा हिशोब देण्याची वेळ आली तेव्हां मालकाला असें आढळून आलें कीं, आपल्या दारूच्या बाटल्या खपल्या खऱ्या, पण त्या मानानें आपल्या तिजोरीच्या पेटींत पैसे पडलेले नाहींत. त्या वेळीं नरसू हा दारू पीत असला पाहिजे असा त्याला संशय आला व तो त्याला म्हणाला. 'तूं इतकी दारू खपवलीस आणि पेटींत पैसे कांहीं शिल्लक पडले नाहींत हें कसें?' त्यावर

नरसूनें सांगितलें कीं, महाराज, मी आपली दारू खपविण्यासाठीं इमानें इतबारें श्रम करीत होतों किंवा नाहीं हें त्या एका सर्वसाक्षी परमेश्वराला माहीत आहे. आतां माझ्या हातून एवढें मात्र चुकलें कीं, ती दारू गिऱ्हाइकांना विकून खपवावयाला पाहिजे होती ! त्यावर त्याचा धनी संतापून म्हणाला, अरे वाहवा रे वाहवा ! तूं तर अट्टल सुधारक दिसतोस ! दारू पिऊन कबूल करतोस, एवढाच काय तो दुर्गुण ! बाकी हुबेहूब सुधारक ! असला मनुष्य आम्हांला नको. तूं येथून चालता हो. असें म्हणून ह्या गोॲनीज गृहस्थानें त्याला चाकरीवरून काढून लावलें. पुढें चाकरीसाठीं हिंडत असतां एका इंग्रजी पत्रामध्यें Wanted a Native Christian or a Goanese ( नेटिव ख्रिश्चन किंवा गोॲनीज पाहिजे आहे ) अशा मथळ्याखालीं नरसूनें एक नोटीस वाचली; व ही चाकरी आपल्याला मिळाली तर पाहावी अशी कल्पना त्याच्या मनांत आली. त्या वेळीं आपण ब्राह्मणाच्या चहाकॉफीच्या दुकानांतून कां निघालों याबद्दलची त्याला आठवण झाली. आपण हुबेहूब नेटिव ख्रिश्चन दिसतों व मोठमोठे ब्राह्मण हा नेटिव ख्रिश्चन आहे, असें मानून फसलेले आहेत; तेव्हां आपण नेटिव ख्रिश्चन आहों, असें सांगून आपल्याला ही नोटिशींतील जागा मिळाली तर पाहावी असें मनांत आणून त्यांनें प्रयत्न चालविला. त्यांत त्याला यशही आलें. ही जागा लष्करी सोजीर लोकांच्या मेस ( खाणावळ ) मधील होती. नरसू हा बीजाचा ब्राह्मण असून तो दिसण्यांत इतका बेमालूम नेटिव ख्रिश्चन दिसे कीं, त्याला त्या मेसमधील ती जागा सहज मिळाली. येथें आल्यावर नरसूची प्रकृति विशेषच सुधारली. त्या गोॲनीज गृहस्थाच्या दुकानामध्यें ज्या धडधाकट प्रकृतीला प्रारंभ झाला होता, तिला या ठिकाणीं सोजिरांनीं ढेकर दिल्यानंतर आग्रहानें वाढलेल्या पदार्थांनीं विशेषच पुष्टि आली. अशा रीतीनें त्या मेसमध्यें नरसूचे कांहीं दिवस आनंदानें गेले. नरसू तेथें राहिला होता तरी त्यानें ब्राह्मणधर्म सगळाच टाकला होता असें नाहीं. त्यानें आपलें जानवें आपल्या खिशामध्यें जपून ठेविलें होतें. एके दिवशीं एका सोजिरापाशीं लडिवाळपणा करीत असतां त्याच्या पावाचा तुकडा नरसूनें आपल्या खिशांत दडविला. तेव्हां त्याच्या खिशांत हात घालून सोजिरानें तो तुकडा बाहेर काढला. पण त्याच्याबरोबर नरसूच्या खिशांतून त्याचें जानवेंही बाहेर पडलें ! मग काय विचारतां ! साहेबांना ब्राह्मण धर्माचें दुसरें कांहीं माहीत नसलें तरी जानव्याची

त्यांना पक्की ओळख आहे. तें पाहिल्याबरोबर त्या मेसमध्यें जेवणाऱ्या सर्व सोजीर लोकांमध्यें एकच गडबड उडून गेली. त्या जानव्यावरून हा ब्राह्मण असला पाहिजे व त्यानें आपली जात लपवून नेटिव ख्रिश्चनचें सोंग मुद्दाम घेतलें असलें पाहिजे व त्यांत याचा कांहीं हेतु असला पाहिजे, अशा शंका उत्पन्न झाल्या ! हा बहुतकरून कोणी तरी गुप्त हेर असवा अशी सगळ्या सोजिरांना भीति वाटूं लागली ! ब्रिटिश राज्य घेण्याच्या हेतूनें कोणीं ब्राह्मणानें नेटिव ख्रिस्त्याचें सोंग घेतलें आहे व अशा रीतीनें तो ब्रिटिश राज्य खात्रीनें घेणार असा एकंदर सगळ्या युरोपियन लोकांत एकदम जिकडे तिकडे पुकारा झाला ! त्यानें आपल्या कोणाच्या अन्नांत विष घातलें होतें कीं काय याच्याबद्दल शहानिशा करून घेण्याकरितां पोटांत गेलेलें व बाहेर असलेलें सर्व अन्न केमिकल ॲनलायझरकडे पाठविण्यांत आलें ! व जरी त्या मेसमधील कोणीही सोजीर मरण पावले नव्हते, तरी त्या अन्नांत विष नाहीं असा रिपोर्ट केमिकल ॲनलायझरकडून येईपर्यंत त्या सोजिरांचा जीव खालीं पडेना ! आतां " ब्रिटिश राज्य " जाणार, म्हणून इंग्रजी वर्तमानपत्रांतून मोठ्या फिकीरीचें आणि कळकळीचे लेख प्रसिद्ध होऊं लागले ! एका लहानशा कापसाच्या जानव्यानें इतका हलकल्लोळ उडविलेला पाहून एका सोजिराला नरसूचा फारच राग आला व त्या रागाच्या आवेशांत त्यानें नरसूच्या पेकाटांत एक बुटाची लाथ हळूच कळे न कळेशी मारली. त्याबरोबर नरसू खालीं पडला. साहेबांना वाटलें नरसू आपल्यापुढें साष्टांग नमस्कार घालून मला चाकरीवरून काढूं नका असें मागणें मागत आहे. परंतु साहेबांनीं त्याला दुसरी एक लाथ मारून व त्याची " स्प्लीन " बरीच अशक्त करून त्याला सांगितलें कीं, तूं येथून चालता हो. तुला ह्या मेसमधील चाकरीवर आम्ही आतां कधींही ठेवणार नाहीं. तेव्हां नरसू कांपत कांपत उभा राहिला व आपली चाकरी निघाल्या-बद्दल त्याला फार वाईट वाटलें. इतकें झाल्यावर आतां नेटिव ख्रिस्ती म्हणून सांगण्याची सोयच उरली नव्हती. तेव्हां आतां दुसरें काय सांगावें याविषयीं विचार करीत असतां ' मी सुधारक आहें ' असें सांगून पाहावें, अशी कल्पना त्याच्या डोक्यांत येऊन त्यानें त्याप्रमाणें केलें. ते नरसूचे शब्द ऐकतांच साहेब दोन पावलें मागें सरले आणि म्हणाले "काय तू सुधारक आहेस ! तर मग ' ब्रिटिश साम्राज्य ' घेण्याचा तुझा इरादा अर्थातच नसला पाहिजे." नरसू

दांत काढून थोडेंसें हंसून म्हणाला? " हः! हः! हः! मी सुधारकाच्या बीजाचा आहें. मी "ब्रिटिश राज्य" घेण्याचा प्रयत्न कसा करीन? मी ब्राह्मण नव्हे. माझ्या-वर आपला विनाकारण घुस्सा झाला आहे" तो सुधारक आहे असें कळल्यानंतर व कित्येक सुधारक लोक अजीबात जानवें फेंकून देण्याच्या आधीं कांहीं दिवस ते गळ्यांतून काढून खिशांत किंवा खुंटीला ठेवण्याची संवय करीत असतात, वगैरे माहिती त्यांना दुसऱ्या प्रतिष्ठित सुधारकांकडून मिळाल्यानंतर साहेबांनीं त्याला क्षमा केली; व आपली अशक्त झालेली "स्प्लीन" त्यानें एखाद्या मॅजिस्ट्रेटला न दाखवितां कोणा तरी चांगल्या युरोपियन डॉक्टरला दाखवावी व त्यावर कांहीं औषध घ्यावें, यासाठीं त्याला कांहीं रुपये देऊन त्याची तेथून रवानगी करण्यांत आली. मेसमधून आपली चाकरी निघाली तर आपण काय करावें, असे विचार नरसूच्या मनांत तो मेसमध्यें असतांना अनेक वेळां येत असत. व आपण रोट्या विकून पोट भरूं नाहीं तर सोडा वॉटरच्या कारखान्यांत चाकरी धरूं, किंवा एखाद्या बेकरीमध्यें जमल्यास तेथेंही राहूं, असे अनेक विचार त्यानें योजलेले होते. परंतु मेसमधून त्याला घालवून दिलें तेव्हां हे सगळे धंदे मागें पडले व सुधारकाच्या धंद्यावरच त्याची श्रद्धा बसली व तो आपल्याशीं म्हणाला :—'बस्स! आतां आपण सुधारकाचाच धंदा करणार! ब्राह्मण म्हणून सोंवळ्या चहाकॉफीच्या विश्रांतिगृहांत राहिलों तेथें लोक मला नेटिव ख्रिश्चन म्हणूं लागले! या नशिबाला काय म्हणावें! असो. जें नांव घेतल्याबरोबर साहेबांच्या रागांतून माझी सुटका झाली, त्या सुधारकाचाच धंदा मीं इतःपर केल्यास माझ्यावर पुष्कळ साहेबांची मर्जी राहून शिवाय माझें जगांत कल्याण होईल असें दिसतें. सुधारक या नांवाचा शकून मला चांगला झाला आहे, तेव्हां तोच धंदा आपण करावा हें बरें, असा विचार मनांत आणून नरसू त्या उद्योगाला लागला. इतके दिवस नरसू 'सुधारक' 'सुधारक' हे शब्द मात्र ऐकत होता. पण त्याचा अर्थ काय, ते लोक कसले असतात, वगैरेबद्दल नरसूला फारशी माहिती नव्हती. परंतु त्या नांवांत काय जादु आहे आणि त्या जादूनें सापासारखे फोंफावत असलेले साहेबदेखील कसे शांत होतात, हें त्यानें नुकतेंच पाहिलेलें असल्यामुळें सुधारक कसे होतात, हें बारकाईनें पाहण्याचा त्यानें प्रयत्न सुरू केला. प्रत्येक सुधारकाला त्याच्या घरीं जाऊन पाहावयाचें असें म्हटलें तर सगळ्या हिंदुस्थानांतील सुधारक पाहण्याला नरसूचा जन्मही

पुरला नसता. शिवाय नरसूला कोणी असेंही सांगितलें होतें कीं, सुधारक म्हणून मोडले जाणारे लोक हे वर्षाचे सगळे तीनशें पासष्ठ दिवस सुधारक असतात असें नाहीं. आंब्याला जसा कांहीं विवक्षित ऋतूमध्यें मोहोर येतो, त्याप्रमाणें सुधारकांनाही बहार येण्याचा एक ऋतु आहे. त्या वेळेखरीज करून हे सुधारक आहेत किंवा कोण आहेत हें समजण्याची मोठमोठ्या कुशल लोकांनाही पंचाईत पडते. हुंडे घेण्याची आणि वयोवृद्ध सुधारकांनीं पुनर्विवाह करण्याची लग्नसराईची सुगी आली तर जुन्या लोकांमधून सुधारक निवडण्याचे काम फारच जड जातें, अशा अडचणींत सगळे सुधारक लोक एकत्र झालेले आणि रंगांत आलेले आपल्याला जर कोठें पाहावयाला मिळतील तर पाहावें म्हणजे पुष्कळ श्रम वांचतील अशी नरसूनें तोड काढली. तेव्हां त्याला कोणी सांगितलें कीं, कलकत्त्यास कॉंग्रेस आहे तेथें तूं जा, म्हणजे तुझा हेतु सफल होईल. त्याप्रमाणें नरसू कलकत्त्यास गेला व युरोपियन स्टाइलप्रमाणें भोजन करून हिंदुस्थान देशाचें हित करणारे देशभक्त आणि आर्यधर्माचे पुनरुज्जीवन करणारे जे वडे वडे ऋषि ,महर्षि, महामहर्षि आणि महामहान्महर्षि तेथें प्राप्त झालेले होते, त्यांचें युरोपियन स्टाइलप्रमाणें जेवण करून त्यांना वाढण्याची चाकरी नरसूनें कांहीं प्रयत्नांतीं मिळवून घेतली. ही जागा मिळाल्यामुळें सुधारक म्हणजे काय असतात हें पाहण्याची त्याला चांगली संधि मिळाली. त्यानें चार दिवस लक्षपूर्वक रीतीनें त्यांच्या वर्तणुकीवर नजर ठेवली होती. युरोपियन स्टाइलप्रमाणें राहणाऱ्या आर्यधर्मोद्धारक लोकांचाच तो आचारी पडल्यामुळें त्याला कॉंग्रेसच्या मंडपांत जाण्याचें तिकीट मिळण्याला मुळींच पंचाईत पडली नाहीं. त्यामुळें नरसूला सुधारकांचें जसें खाजगी वर्तन पाहावयाला मिळे, त्याचप्रमाणें त्यांचें सार्वजनिक संभाषणही ऐकावयाला मिळे, अशी संधि फारच थोड्या लोकांना मिळते. परंतु नरसूला ती सहज मिळालेली असल्यामुळें सुधारकांचें सार्वजनिक संभाषण आणि खाजगी वर्तन यांची तुलना करून आपल्याला सुधारक व्हावयाचें असेल तर आपण बाहेर कसें बोललें पाहिजे आणि आंत कसें वागलें पाहिजे यांच्याबद्दलची त्याला चांगली कल्पना आली. चारपांच दिवसांनंतर कलकत्त्यास भरलेला बाजार हळूहळू ओसरूं लागला; व नरसूच्या ताब्यांतील युरोपियन स्टाइलवाल्यांना युरोपियन दुकानांतून वाटेपुरतें फराळाचें सामान नरसूनें आणून दिल्यानंतर नरसूचें तेथील काम संपलें. दुसऱ्या दिवशीं नरसूचा पगार चुकता

झाला; आणि आतां पुढें आपण काय करावें या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करीत नरसू कलकत्त्याच्या रस्त्यांतून भटकत फिरूं लागला. आपल्याला थोडे श्रम आणि लोकांत पुष्कळ मानमान्यता व आचारस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, शिक्षणस्वातंत्र्य, भक्षणस्वातंत्र्य, परतंत्रतास्वातंत्र्य इत्यादि प्राप्त होणाऱ्या अनेक गोष्टींचा विचार केला असतां सुधारक होणेंच इष्ट आहे व तें आपल्याला फारसें जडही जाणार नाहीं, असें नरसूच्या मनानें घेतलें. याच वेळीं त्याच्या गोॲनीज मालकानें त्याला उद्देशून म्हटलेल्या वाक्याचीही त्याला आठवण झाली व तो म्हणाला, 'मीं दारू स्वतः पिऊन खपविल्याबद्दल खरें बोलून कबूल झालों, हा खरे बोलण्याचाच काय तो दुर्गुण त्यानें माझ्या ठिकाणीं पाहिला ! हा खरें बोलण्याचा दुर्गुण माझ्या अंगीं नसतां तर मी अगदीं अट्टल सुधारक झालों असतों, असें माझा धनी बोलला होता. पण त्यानें दाखवून दिलेला दुर्गुण आपल्या अंगांतून घालविण्याला फारसें कठीण आहे असें नाहीं. त्यांत काय आहे मोठें ? खरें सांगण्याचा दुर्गुण मी केव्हांच सोडून देईन ! देवाच्या दयेनें दारू पिण्याचा थोडाबहुत अभ्यास आपल्याला आहेच. आतां ही गोष्ट कोठें कबूल केली नाहीं म्हणजे झालें ! मग मला अट्टल सुधारक होण्याला काय आणखी शिंगें उरलीं ! शिवाय आणखी सुधारकांच्यामध्यें काय काय गुण असले पाहिजेत, याच्याबद्दलची मला आतां माहिती झाली आहे. असा विचार मनांत आणून सुधारक होण्याची बहुतेक सामग्री जमा करून त्यानें सुधारक होण्याचा निश्चय केला.

हा निश्चय अमलांत आणण्याकरतां व पुढें सुधारकाचे वेषानें राहण्याकरतां तो आपल्या गांवाकडे जाण्यास निघाला. तों वाटेंत त्याला त्याचा एक स्नेही भेटला. त्या दोघांचा बाळपणापासूनचा सहवास होता. परंतु नरसूचा स्नेही नरसूहून अगदीं भिन्न स्वभावाचा होता. काळा आणि पांढरा यांच्यामध्यें जितकें साम्य तितकेंच नरसू आणि त्याचा स्नेही यांच्यामध्यें होतें. तरी पण नरसूच्या स्नेह्याची नरसूवर लहानपणापासूनच प्रीति होती. त्यामुळें नरसूला चांगला सल्ला देणें हें आपलें एक कर्तव्यकर्म आहे असें तो मानीत असे. त्याप्रमाणें उभयतांचे कुशल प्रश्न होऊन नरसू आतां सुधारक बनणार आहे, हा नरसूचा इरादा त्याला कळल्यानंतर त्यानें नरसूला पुष्कळ समजावून सांगितलें. व असल्या भलत्याच कामांत त्यानें पडूं नये, म्हणून त्यानें त्याला पुष्कळ उपदेश

केला. तो म्हणालाः—“सुधारणा ही गोष्ट वाईट आहे किंवा ती आपल्याला नको आहे म्हणून तूं सुधारक होऊं नको, असें मी तुला सांगत नाहीं. परंतु तुझी सुधारक होण्याची योग्यता नाहीं म्हणून तूं होऊ नको असें मी म्हणतों. तुला सुधारणेसंबंधीं काय समजतें आहे ? हिंदूंच्या ज्या चालीरीतींमध्यें फेरफार झाले पाहिजेत त्या चालीरीतींसंबधानें ज्या शास्त्रांतून आणि धर्मग्रंथांतून सविस्तर विवेचन केलेलें आहे त्या ग्रंथांबद्दल तुला काय माहीत आहे ? किंवा त्या चालीरीति कोणत्या धोरणावर बसविल्या आहेत याबद्दल तुला काय कल्पना आहे ? पूर्वींच्या चालीरीति अस्तित्वांत कां आल्या याच्याबद्दल तूं कधीं विचार केला आहेस काय ! त्या ज्यांनीं प्रचलित केल्या त्यांचें लोकांवर वजन होतें आणि त्यांपासून आपलें ऐहिक आणि पारमार्थिक कल्याण आहे असें लोकांना वाटत होतें. तसें कल्याण नवीन सुधारणेमध्यें आहे असें लोकांना जसजसे दिसत जाईल तसतसे लोक त्या सुधारणेचा अंगीकार अवश्य करीत जातील. व पूर्वींच्या सामाजिक इमारती ज्या महात्म्यांनीं बांधिल्या त्यांच्या तोडीचे, त्यांच्या योग्यतेचे आणि त्यांच्या इतके वजनदार महात्मे हल्लीं निर्माण झाले म्हणजे हल्लींचे लोक त्यांचेंही अनुकरण करतील. परंतु तसला वजनदारपणा तुझ्या-सारख्या वात्रट पोरामध्यें कोठून येणार ? आणि तुझी एकट्याचीच गोष्ट नव्हे, तुझ्यासारखीं शंभर पोरें जमलीं म्हणून त्यांच्यानें तरी काय होणार आहे ? आणि तुला सामाजिक परिषदेमध्यें तरी कोण विचारणार आहे ? म्हणून तुला सांगतों कीं, तूं सुधारक होऊं नको. तुला त्यांतील काय समजतें आहे, आणि त्यांतील कांहीं एक समजत नसतांना उगीच लोकांना फसविणें चांगलें नाहीं.” हें त्याचें भाषण ऐकून नरसूला आपल्या स्नेह्याचा फार राग आला आणि तो त्याच्या अंगावर चवताळून जाऊन म्हणाला :—‘गप्प बैस. आपला मित्र जगांत मान-मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करूं लागला तर त्या मार्गापासून त्याला तूं माघारा फिरवतोस ! असा तुझ्यासारखा नीच आणि मित्रद्रोही मनुष्य मीं कोठेंही पाहिला नाहीं. म्हणूनच मीं सुधारक होऊं नये असें तूं मला सांगतोस. त्या तुला तरी सुधारक म्हणजे काय असतो ह्याची माहिती आहे काय ? तुझ्या आतांच्या बोलण्या-वरून हल्लींचा खरा चालू सुधारक म्हणजे काय, याची तुला मुळींच कल्पना नाहीं असें दिसतें. सुधारक होण्याला तूं म्हणतोस असल्या गोष्टी मुळींच लागत नाहींत. मी ह्या प्रश्नासंबंधानें तुझ्यासारख्या उगीच कांहीं तरी गप्पा

मारीत नाहीं. ह्याविषयींच्या व्यासंगामध्यें मीं कांहीं दिवस खर्च केले आहेत व सुधारकांची अगदीं ताजीं ताजीं उदाहरणें पाहिलेलीं आहेत. त्यावरून तुझें मत अगदीं चुकीचें आहे असें म्हणण्याला मला मुळींच दिक्कत वाटत नाहीं. तुझ्या किती भ्रामक कल्पना आहेत ! सुधारक होण्याला आपल्या शास्त्रांचें आणि धर्मग्रंथांचें थोडेंबहुत तरी ज्ञान लागतें ही कल्पना मीं आज तुझ्या तोंडूनच ऐकली. पण माझा अनुभव याच्या अगदीं उलट आहे. आपल्या धर्मग्रथांचें जितकें जितकें जास्त अज्ञान तितका तितका तो जास्त गरम सुधारक अशीं मीं किती तरी उदाहरणें नुकतींच पाहिलीं आहेत ! आणि ज्याला आपल्या धर्मग्रंथांचा यत्किंचितही गंध नाहीं, आणि आपल्या चालीरीति कोणत्या धोरणावर बसविलेल्या आहेत याच्याबद्दलची ज्याला यत्किंचित-ही कल्पना नाहीं असे लोक तर सर्व सुधारकांत श्रेष्ठ गणलेले मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलेले आहेत. आणि मीं हा आतां सांगि-तलेला सिद्धान्त खरा नसता तर साहेब लोकांना आपल्या सामाजिक विषयावर बोलण्याला काय बरें अधिकार प्राप्त झाला असतां ? पण साहेब हे तर आपल्या सामाजिक रीतीभातींचा निर्णय करणारें हायकोर्टच असें मीं पाहिलें आहे. आणि माझ्या मनांतूनही त्यांच्याप्रमाणें उत्तम सुधारक व्हावयाचें आहे. तेव्हां माझ्या दुर्दैवामुळें माझ्या लहानपणीं हिंदुसमाजांतील चालीरीतींचें जें थोडेंसें प्रत्यक्ष ज्ञान मला झालेलें आहे तें साहेबांप्रमाणें फर्स्ट क्लास सुधारक होण्याकरतां मीं कसें विसरून जाईन, या फिकीरीमध्यें तूर्त मी आहें. हिंदुधर्मशास्त्राचे निर्णय सांगण्याकरतां पूर्वीं जसे कांहीं कोर्टांतून शास्त्री होते, तसे पूर्वीं सामा-जिक सुधारणेमध्येंही कांहीं शास्त्रीपंडित होते, पण त्यांची अजूनदेखील सुधारकांना जरूर असावी अशी तुझी कल्पना असेल तर ती मात्र चुकीची होय. जसें हल्लीं इंग्रजी न्यायाधीशांना हिंदुधर्मशास्त्र समजूं लागलें आहे तसेंच तें सुधारकांनाही समजूं लागलें आहे ! मि. आर. रघुनाथराव यांनीं कित्येक प्रश्नांसंबंधानें श्रुतिस्मृति इत्यादिकांतून जे आधार काढून दिलेले आहेत, त्यांचें सुधारकानें एक " इंडेक्स " तयार केलें आणि त्यांतील मंडळां-चे आणि ऋचांचे आंकडे सामाजिक परिषदेंतील भाषणांत मधून मधून कोणी घुसडून दिले म्हणजे त्यानें हिंदूंच्या धर्मग्रंथांचें अनेक वर्षेंपर्यंत शांतपणें परिशीलन केलें नाहीं असें म्हणण्याची छाती कोणाला होणार आहे ? शिवाय

आतांच्या या पाश्चिमात्य प्रगतीच्या दिवसांत त्या जुन्या झालेल्या आणि रानटी युगांतील शास्त्रांच्या आधारांना घेऊन करावयाचें आहे काय? आतां तुझें दुसरें असें म्हणणें आहे कीं, समाजांत असले फेरफार घडवून आणण्याला समाजावर ज्यांचें वजन आहे, असलेच वजनदार लोक पाहिजेत. परंतु या बाबतींतही तुला फारसें समजत नाहीं असें मला म्हणावें लागतें. सामाजिक सुधारणा ही एक लढाई आहे. सबब यांतील योध्दे हे तरुण आणि उल्लू असेच असले पाहिजेत. दुसऱ्यानें उडी टाक म्हटल्याबरोबर मागेंपुढें न पाहतां किंवा आपला पाय मोडेल कीं काय आणि उडी टाकण्यास सांगणारानें उडी टाकली आहे कीं नाहीं, याबद्दल यत्किंचितही विचार न करतां यानें उडी टाकली पाहिजे. सारांश, धाडसीपणा, ज्याला कांहीं कुत्सित लोक आचरटपण असें नांव देतात, तो गुण या चमूंतील योद्ध्यांत अवश्य असला पाहिजे. शांतपणानें सारासार विचार करणारा मनुष्य असल्या सामाजिक युद्धाच्या धुमश्चक्रीमध्यें कांहीं कामाचा नाहीं. या तत्त्वामुळेंच मीं पाहिलें आहे कीं, सामाजिक परिषदेच्या सैन्यामध्यें कांहीं दोनतीन वयोवृद्ध सेनापति खेरीज-करून बाकी बहुतेक आचरट पोरांचाच भरणा झालेला आहे. तेथें वजनदार-पणाला कोणीही विचारीत नाहीं. कारण बाकीच्या लोकांत मिसळून त्यांच्यांत ज्यांना सुधारणा करावयाची असेल त्यांना कदाचित् वजनदारपणाची आव-श्यकता भासत असेल. पण हल्लींचा सुधारणेचा प्रोग्रॅम तसा नाहीं. हल्लींची सामाजिक परिषद् म्हणजे एक परस्परसहकारी मित्रमंडळी आहे. शंकरा-चार्यांचा हिंदु समाजावरील अंमल इंग्रज सरकारच्या राजकारस्थानी धोरणानें आणि त्यांतच सुधारकांच्या वडवडीनें नाहींसा झाल्या कारणानें धर्मदंडाची भीति न उरल्यामुळें ज्या ज्या गुन्हेगारांनीं हिंदुधर्माच्या विरुद्ध एक वर्षभर-पर्यंत हरएक प्रकारचे गुन्हे केलेले असतील त्या सगळ्यांनीं छतें, झालरी, कमानी, पुष्पवल्ली इत्यादिकांनीं सुशोभित केलेल्या आणि विद्युद्दीपांनीं प्रकाशित केलेल्या भव्य मंडपामध्यें जमून कोणत्या मुलखांत कोणी कोणी काय काय गुन्हे केले आहेत, याबद्दलचा साद्यंत रिपोर्ट राजरोसपणें सांगावा, व ते हिंदुधर्माविरुद्ध गुन्हे केल्याबद्दल एकमेकांनीं एकमेकांचे गुणानुवाद गावे व असाच आमचा क्रम चालू राहण्यासाठीं सरकारमार्फत काय काय सवलती मागितल्या पाहिजेत याचा विचार ठरवावा, हाच हल्लींच्या परिषदेचा मुख्य

हेतु असतो. या गोष्टी करण्याला वजनदारपणा कशाला पाहिजे असेल तो तुझा तुलाच माहीत. आतां तूं म्हणतोस कीं मला सामाजिक परिषदेमध्यें कोण विचारील. पण असें कां ? माझ्यांतच काय कमी आहे ? मीं बाकीचे सुधारकही नुकतेच पाहिले आहेत. त्यांच्यांत आणि माझ्यांत कांहीं फरक आहे, असें मला वाटत नाहीं. ते सगळे माझ्यासारखेच होते. किंबहुना कांहीं कांहीं बाबतींत मीच त्यांच्यापेक्षां कांकणभर सरस ठरेन. आर्य धर्माची सुधारणा करतांना युरोपियन स्टाइलप्रमाणें जेवण्यामध्यें तर मी त्यांच्यावर खात्रीनेंच ताण करीन ! बोलण्याप्रमाणेंच वागलें पाहिजे असा निर्बंध सुधारकांमध्यें बिलकुल नाहीं, त्यामुळें साधारण बोलतां चांगलें येत असलें म्हणजे मी कसाही वागलों तरी हरकत नाहीं. तरी पण तूं म्हणशील कीं, माझी बोलण्याची तरी छाप कशी बसणार ? परंतु याला मीं खुद्द परिषदेंतील अनुभवावरून एक युक्ति शोधून काढिली आहे. कॉंग्रेसमध्यें आपलें भाषण चांगलें व्हावयाला पाहिजे असलें म्हणजे, व आपल्याला टाळ्या पुष्कळ मिळावयाला पाहिजे असतील, तर मि. ह्यूम, मि. वेडरबर्न वगैरे नांवें उच्चारिलीं म्हणजे इष्ट कार्य सिद्धीस जातें. त्याचप्रमाणें परिषदेमध्यें न्या. रानडे यांचें नांव होय. एका वक्त्याच्या पांच मिनिटांच्या भाषणांत न्या. रानडे यांचें नांव पंचवीस वेळां आलेलें मीं मोजून आपल्या डायरींत टिपून ठेविलेलें आहे. त्या वक्त्याच्या तोंडून 'रा' हें अक्षर निघालें कीं, सगळ्या सुधारकांचा उजवा हात डाव्या हातावर जाऊन आदळलाच ! दोनचार वेळां टाळ्या वाजवून झाल्यावर आतां लोकांचे हात दुखून आले असतील असें मला वाटलें; परंतु माझा अंदाज चुकीचा होता. पंचवीस वेळां नांव निघालें, त्यांपैकीं प्रत्येक वेळीं सर्व श्रोतेगण सारख्याच जोरानें टाळ्यांचा गजर करीत होते. व त्या वक्त्याचें भाषण संपलें तेव्हां इतकें उत्तम भाषण दुसऱ्या कोणाचेंही झालें नाहीं, असें जो तो सुधारक म्हणू लागला ! त्यावरून ही पुष्कळ टाळ्या मिळवून उत्तम भाषण करण्याची युक्ति आपल्याला फार चांगली साधेल, असा माझा तेव्हांपासून ग्रह झालेला आहे. एक अक्षर उच्चारण्याला एक सेकंद तरी निदान लागेल, ह्या हिशेबानें न्या. रानड्यांच्या नांवावर मी एका मिनिटांत निदान वीस वेळां तरी टाळ्या मिळवून घेईन, अशी मला उमेद आहे. मीं कपड्यांनीं, केसांनीं, खाण्यापिण्यानें आणि इतर रीतिरिवाजांनीं बहुतेक सुधारक आधींच बनलेलों

आहे. आतां कांहीं थोडाबहुत राहिलों असलों तर तो वरील उपायांनीं तेव्हांच होईन !"

अशा प्रकारचें नरसूचें भाषण ऐकून त्याच्या स्नेह्याला फार खेद झाला, आणि सुधारणेची खोटी कल्पना टारग्या लोकांमध्यें कशी पसरली आहे, यांचें प्रत्यक्ष उदाहरण पाहून तो आपल्या भावी सामाजिक स्थितीबद्दल अत्यंत उद्विग्न झाला. आपल्या उपदेशाची अनुपयुक्तता पाहून तो आपल्या वाटेनें निघून गेला, व नरसू सुधारक होण्याच्या आपल्या उद्योगाला लागला. कलकत्त्यास सुधारकांच्या खाजगी भाषणामध्यें सुधारणेचे ठिकठिकाणचे छोटे रिपोर्ट तयार होतात याबद्दल नरसूनें ऐकलें होतें. त्याप्रमाणें नरसूनें आपल्या एका खेडेगांवांत कांहीं एक आधार नसतां एक सुधारणेच्या कामाचा रिपोर्ट तयार केला. जी सभा नव्हती तिचा तो सेक्रेटरी झाला, व जे सभासद नव्हते त्यांच्या सर्वानुमतें तो रिपोर्ट पास करून नरसूनें 'नानासाहेब, ऑनररी सेक्रेटरी' अशा सहीनें तो सामाजिक परिषदेच्या जनरल सेक्रेटरींकडे पाठवून दिला; व येत्या काँग्रेसमध्यें आपल्याला येथील सुधारक मंडळींनीं प्रतिनिधि निवडलें आहे, सबब माझा परिषदेला येण्याचा विचार आहे, व मद्यपाननिषेधाच्या विषयावर बोलण्याची माझी इच्छा आहे, असेंही त्यानें पत्रद्वारें कळविलें. नरसूच्या स्नेह्याला ही सगळी नरसूची कृति कळली, व या कृतीबद्दल त्याला अतिशय संताप येऊन हें त्याचें कृष्णकारस्थान बाहेर फोडून असल्या भोंदू सुधारकांची फट्फजिती उडविण्याचा त्यानें निश्चय केला, व त्याबद्दल त्यानें चळवळ सुरू केली. यंदाच्या परिषदेमध्यें असा एक भोंदू सुधारक येऊन बसणार आहे, त्याच्याबद्दल सर्वांनीं काळजी घ्यावी, असा गवगवा नरसूच्या स्नेह्यानें जिकडे तिकडे करून सोडला ! परंतु ह्या गवगव्यानें नरसू यत्किंचितहि डगमगला नाहीं. कारण, कलकत्त्याच्या अनुभवावरून त्याची पक्की खात्री झालेली होती कीं, कितीही बदमाष किंवा भोंदू सुधारक असला तरी सुधारकांपैकीं कोणीही त्याला वाईट म्हणणार नाहीं. जे जे कोणी जातिभ्रष्ट, धर्मभ्रष्ट, सत्यभ्रष्ट किंवा नीतिभ्रष्ट असतील, त्या सगळ्या भ्रष्टांचें सामाजिक परिषद् हें मायपोट आहे, इत्यादि गोष्टी नरसूला पूर्णपणें माहीत होत्या. म्हणून तो आपल्या मित्राच्या कृतघ्नपणानें मुळींच घाबरला नाहीं, पण आपण यथाशक्ति समाजहित साधीत असतां आपलेच मित्र आपल्याला हितशत्रूसारखे आडवे येतात,

याबद्दल मात्र त्याला वाईट वाटलें. इकडे नरसूच्या स्नेह्यानें दिवसेंदिवस नरसूच्याविरुद्ध जास्तच खटपटी चालविल्या ! त्याच्यासंबंधानें त्यानें वर्तमानपत्रांतून पत्रें प्रसिद्ध केलीं; व इतकें करूनही न थांबतां नरसूचें पूर्वचरित्र आणि हल्लींचा भोंदूपणा यांचें ज्यामध्यें सविस्तर आविष्करण केलें आहे, अशा प्रकारचीं हस्तपत्रकें छापून सामाजिक परिषदेकरितां जमलेल्या प्रतिनिधींमध्यें तीं वाटलीं जावीं, अशीही त्यानें आपल्या गांवाहून तजवीज करविली. त्यामुळें सामाजिक परिषदेच्या मंडळीमध्यें फारच गवगवा उडून गेला, व नरसू कोण आहे, ह्याबद्दल जिकडे तिकडे तपास सुरू झाला. परिषदेकरितां जमलेल्या प्रत्येक सुधारकाला आपल्याखेरीज दुसरा कोणी तरी नरसू असावा असें खात्रीनें वाटूं लागलें; व आपल्यालाच कोणी नरसू म्हणेल कीं काय, अशी सर्वांना भीति पडली. त्यामुळें, 'तुमचें नांव काय हो ?' असा एका सुधारकानें दुसऱ्या अनोळखी सुधारकाला प्रश्न विचारण्याचीसुद्धां मारामार पडूं लागली ! असा प्रश्न विचारला कीं तो प्रश्न आपली टवाळकी करण्यासाठींच विचारला आहे, असा प्रत्येक सुधारकाचा ग्रह होई. अशा स्थितींत परिषदेच्या मेंबरांचीं नांवें रजिस्टर करण्याचें काम ज्या व्हॉलंटियरकडे सोंपविलेलें होतें, त्याचें काम फारच धोक्याचें झालें. त्यानें रजिस्टरमध्यें नोंदण्याकरतां 'तुमचें नांव काय ?' म्हणून एका सुधारकाला स्वाभाविकपणें विचारलें. परंतु या व्हॉलंटियर कारकुनाच्या दुर्दैवानें तो होता गरम सुधारक ! त्यानें रागानें त्याच्या पुढील दौत उचलून त्या व्हॉलंटियरच्या अंगावर मारली आणि म्हणाला :—You fool, do you insult me ? I am not Narsoo ! अशी स्थिति झाल्यामुळें सुधारकांचीं नांवें नोंदण्याचें काम कोणी पतकरीना ! नरसू हे सगळे प्रकार पाहत होता, पण त्यानें धीर सोडला नाहीं. आपल्या स्नेह्यानें वांटण्याकरितां आपल्याविरुद्ध हस्तपत्रकें पाठविलीं आहेत ही कुणकूण नरसूच्या कानावर आली होती. तीं पत्रकें सेक्रेटरीपासून घेऊन नरसूनें स्वतः वांटलीं. त्यामुळें हाच तो इसम असेल असें कोणाच्या स्वप्नांतही आलें नाहीं. शिवाय तीं पत्रकें वांटतांनाही त्यांतील मजकुराबद्दल व नरसूबद्दल कांहीं निंदास्पद उल्लेख करून शेवटीं नरसू प्रत्येक सुधारकाला किंचित् हसून म्हणत असे कीं, I hope you are not Narsoo, त्यामुळें तर त्याच्यावरचा संशय सर्वथैव उडाला. शिवाय नरसूनें 'नानासाहेब' असें आपलें

नांव लाविलें असल्यामुळें याच्या नांवावरूनही त्याला ओळखतां येण्याला कांहीं मार्ग नव्हता. ह्या कारणानें नरसू स्वतः सुरक्षित राहिला. परंतु ह्या त्याच्या युक्तीमुळें हिंदुस्थानांतील बाकीचे सगळे सुधारक धोक्यांत येऊन पडले. आपल्याला कोणी नरसू म्हणेल कीं काय, ही भीति सगळ्यांना उत्पन्न झाली. आपण नरसू आहों, असा कोणाला संशय येऊं नये, म्हणून कित्येकांनीं आपलें नांव भिंतीवरील जाहिरातींतल्या एवढ्या मोठ्या अक्षरांनीं लिहून तें आपल्या कपाळावर, पाठीवर, पोटावर किंवा हातावर चिकटविलें! कोणी आपल्यापाशीं नरसूचा मुद्देमाल सांपडूं नये म्हणून आपल्या खिशांतील भरलेल्या बाटल्या दूर फेंकून दिल्या! नरसू कोण हें पकडण्याकरितां कोणी कुचाळ लोकांनीं गुप्त पहारा ठेविला असेल या भीतीनें कोणी सुधारक मधल्या सुट्टींत उपाहारस्थानाकडेदेखील गेले नाहींत! कित्येक नेहमीं विजार घालणारेही आपल्याला कोणी नरसू म्हणेल या भीतीनें धोतरें नेसून आणि गंध लावून आले! तरी पण असल्या उपायांनीं ' नरसू कोण ? ' या जिज्ञासेचें निराकरण होईना; व ' नरसू कोण ? ' याबद्दलची ही जिज्ञासा हळूहळू फारच बळावली. कित्येक विषयांवर चांगलीं विचारयुक्त भाषणें करण्याकरितां दोन दोन महिने आधीं ठरवून ठेवलेले वक्ते आपल्याला कोणी कदाचित नरसू म्हणेल या भीतीनें पुढें धजेतना. त्यामुळें ठराव तयार असून वक्ते नाहींत अशी स्थिति झाली. एक वक्ता धैर्य धरून जेमतेम पुढें आला, तों हाच नरसू आहे अशी जिकडे तिकडे ओरड होऊन अखेरीस त्या बापड्याला मागें जावें लागलें. असा हा विलक्षण बंडावा सामाजिक परिषदेच्या मंडपामध्यें बराच वेळ चालला. तो शांत करण्याकरितां पुष्कळांनीं पुष्कळ उपाय योजिले. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस अध्यक्षांच्या जवळ बसलेले एक वृद्ध गृहस्थ उठून म्हणाले,— ' मित्रहो, नरसू कोण या प्रश्नानें आपलीं मनें इतकीं क्षुब्ध झालेलीं पाहून मला फार वाईट वाटतें. नरसू कोण म्हणून कोणी कोणाला विचारावयाचें ? आणि तो आपल्याबाहेर आपल्याला दुसरीकडे कोठें सांपडणार आहे ? वास्तविक पाहतां थोड्याबहुत प्रमाणानें आपण सगळेच नरसू आहों, हें कोणाच्याही प्रत्ययाला येईल. असें असतांना नरसू कोण म्हणून आपण दुसऱ्यांना काय म्हणून विचारावें ! कांहीं अंशीं आपली अशी स्थिति आहे खरी, व म्हणून हिंदुसमाजांतील बाकीची स्थिति सुधारण्याच्या आधीं

आपण आपली ही स्थिति सुधारली पाहिजे.' हें भाषण ऐकून सर्वांना त्यांतील सत्यता भासून जिकडे तिकडे शांतता झाली व सभेचें काम पुढें सुरळीत चालू झालें. व जेथें सगळेच नरसू जमले होते तेथें आमचा चरित्रनायक नरसू उडदांतील काळ्या खड्याप्रमाणें कोणालाही ओळखतां न येतां त्याची एका मोठ्या प्रमुख सुधारकामध्यें लवकरच गणना झाली व त्याच्या प्रांतांत जेव्हां सामाजिक परिषद् येईल तेव्हां तो परिषदेचा अध्यक्ष आणि सरकारपुढें जेव्हां अबकारी खात्याचा प्रश्न येईल तेव्हां तो लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचा मेंबरही कदाचित् होण्याचा संभव आहे.

---

## आनंदाची खबर !
## तिबेट आपल्यासारखें होत आहे ! : : १९

आजकाल अत्यंत आनंदाची गोष्ट ही आहे कीं, आपल्या परमकृपाळु, भाग्यशाली, आणि दयावंत सरकारची कृपादृष्टि तिबेट देशाकडे वळली आहे. आपलें सरकार आपला वरदहस्त तिबेटच्या मस्तकावर ठेवणार ही बातमी ऐकून ज्याच्या लहानशा अंतःकरणामध्येंही आनंदाचे उपसागर, सागर आणि महासागर उत्पन्न होणार नाहींत, असा हतभाग्य प्राणी ह्या हिंदुस्थानांत तरी कोणी आढळणार नाहीं. केवढा हा सुदिन ! केवढी ही कृपा ! हिंदुस्थानचा केवढा हा भाग्योदयाचा दिवस अगदीं निकट येऊन ठेपला आहे ! हिंदुस्थानचा वैदिकधर्म आणि तिबेटचा बौद्धधर्म यांच्यामध्यें २५०० वर्षांनीं सख्य होणार ! आणि ह्या सत्कृत्याचें श्रेय इंग्लिश लोकांना ! धन्य ते इंग्रजी महात्मे, कीं जे हिंदुस्थानावर आणि तिबेटावर असल्या उपकारांचा पाऊस पाडण्याला प्रवृत्त होत आहेत ! हिंदुस्थानांतील शंकराचार्य आणि तिबेटांतील लामा हे पवित्र ख्रिस्तीधर्माच्या देखरेखीखालीं एकमेकांच्या गळ्याला मिठ्या मारण्याला

उद्युक्त होणार ही केवढी प्रशंसनीय गोष्ट आहे ! सिमला आणि लासा हे इतके जवळ असून त्यांचें इतके दिवस मुखावलोकनसुद्धां होत नसे, पण आतां त्या दोन ठिकाणांमध्यें बंधुप्रेम किती तरी वाढणार !

हिंदुस्थानांतील लोकांचा आजपर्यंत मुख्य तोटा होत होता तो हा कीं, त्यांना तिबेटांत जाण्याची परवानगी नसल्यामुळें त्यांचा व्यापार कुंठित होऊन त्यांना उपाशी मरण्याची पाळी आली होती. हिंदुस्थानांतील व्यापाराला हिमालयपर्वत ओलांडून जाण्याची लामानें मनाई केलेली असल्यामुळें १८९५ सालापासून १९०२ सालपर्यंत हिंदुस्थानांत अगदीं कमींत कमी तरी चारपांच दुष्काळ पडले. हिंदुस्थानांतील नेटिव लोकांचा प्रचंड व्यापार उत्तरेकडच्या बाजूनें कोंडून राहिल्यामुळें सगळे कुणबी शेतकीवरच घसरले. पण व्यापाराच्या मदतीवांचून नुसत्या शेतकीनें कोटयवधि कुणब्यांचा कोठें निभाव लागतो ! सर्व हिंदुस्थानांतील कुणबी शेतकऱ्यांच्या व्यापाराचा कोंडमारा झाल्याबरोबर पावसानें डोळे वटारले, आकाशांतून जमिनीवर पाण्याचा एक थेंबसुद्धां उतरेनासा झाला, नद्यांचें आणि कालव्यांचें पाणी आटून गेलें, विहिरींवर मोटा चालेनाशा झाल्या, आणि शेतकऱ्यांचे प्राण डोळ्यांत आले. एकामागून एक भयंकर दुष्काळ पडूं लागले. गव्हर्नर साहेबांच्या आणि लाटसाहेबांच्या तारांबळी उडूं लागल्या. रिलीफ कामें काढतां काढतां परोपकारी साहेबांच्या नाकीं नव आले. तरीदेखील कांहीं कांहीं दुष्काळांत दहादहा लाख माणसें मेलीं. दोन पायांची माणसें जर इतकीं मेलीं तर चार पायांची किती मेलीं असतील, याची कल्पनाही करणें कठीण आहे. इतका सगळा अनर्थ तिबेटामुळें हिंदुस्थानावर ओढवला ! अशा स्थितींत हिंदुस्थानांतील व्यापाराला उत्तरेकडील वाट बंद झाल्यामुळें सरकार तरी काय करणार ? पण सुदैवानें तिबेटची वाट मोकळी होण्याचे दिवस आतां जवळ येत चालले आहेत. तसें एकदां झालें म्हणजे हिंदुस्थानांतील व्यापार किती तरी वाढेल ! हिंदुस्थानांतील किती तरी चहा आणि दुसरें विलायती सामान तिबेटांत जाईल ! आणि सध्यांच हिमालयाच्या डोक्यावर आगगाडीची माळा गुंफली जाण्याचा संभव नसल्यामुळें हे विलायती मालाचे बोजे तिबेटांत कोण वाहून नेणार ? हिंदुस्थानांतील कुली लोकांनो, तुमचें भाग्य लवकरच किती उदयाला येणार आहे, याची तुम्हांला कल्पना नाहीं. पण त्याची तुम्हांला कल्पना आली तर तुम्ही पेढेच वांटले पाहिजेत. तिबेटा-

मध्यें माल जरी विलायतेंतील किंवा हिंदुस्थानांतील गोऱ्या लोकांनीं तयार केलेलाच खपला, तरी आयात आणि निर्गत मालाच्या किंमतीचे आंकडे आपल्या हिंदुस्थानच्या रिपोर्टामध्यें फुगलेले दिसतील, ही आपल्या देशांतील उद्योगधंद्याच्या आणि व्यापाराच्या अभिवृद्धीची सूचक आणि ढळढळीत गोष्ट आपण हिंदुस्थानांतील लोकांनीं कधींही विसरतां कामा नये.

इंग्रजांनीं तिबेट जिंकल्यापासून आपल्याला याहीपेक्षां जास्त फायदा व्हावयाचा आहे. आपल्या देशांत हल्लीं बाजवीपेक्षां फाजील ग्रॅज्युएट्स झालेले आहेत. तीस कोटि लोकसंख्येच्या देशांत सुमारें तीसपस्तीस ग्रॅज्युएट्स असावेत, अगदीं डोक्यावरून पाणी गेलें तर तीन चारशें असावेत, म्हणजे अगदीं कमाल! पण आपल्या देशाच्या दुर्दैवानें आणि इंग्रज सरकारच्याही दुर्दैवानें ही संख्या तीसचाळीस हजारांच्या जवळ आलेली आहे. काय ही भयंकर वाढ! जिंकलेल्या देशांत इतके सुशिक्षित लोक कशाला पाहिजेत! हिंदुस्थान हा काय इंग्लंड देश आहे कीं काय, कीं जेथें पाहिजे तितके ग्रॅज्युएट्स होऊं द्यावे! हीं तीसचाळीस हजार सापाचीं पिलें सर्व हिंदुस्थानभर आपल्या बिळांतून आणि त्यांच्या आसपास सरपटतांना पाहून आपल्या उदात्त कर्झनसाहेबांचें उदार अंतःकरण दडपून जाऊन सरकारला युनिव्हर्सिटी बिल पुढें आणावें लागलें आहे. शिक्षण, युनिव्हर्सिटीज, कॉलेजें, ग्रॅज्युएट्स वगैरे गोष्टींबद्दल आपलें मत आणि सरकारचें मत यांच्यांत पुष्कळ फरक आहे. या गोष्टींबद्दलचें खरें मत असें कीं, शिक्षण हें एक कर्तव्यकर्म आहे, असें कित्येक मूर्ख लोक समजतात. परंतु वास्तविक जिंकलेल्या देशांत शिक्षण हा एक व्यापार आहे. आणि इतर देवघेवी व्यापाराला जसें सरकारनें शिक्के मारलेलें निरनिराळ्या प्रकारचें नाणें लागतें, त्याप्रमाणें ह्या शिक्षणाच्या व्यापारामध्यें सरकारनें शिक्के मारलेलीं निरनिराळ्या प्रकारचीं नाणीं लागतात. व्यवहारांत व सरकारदरबारांत ह्या शिक्के मारलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांचा उपयोग लागतो. जसें देवघेवीच्या व्यापारांत पैसे वगैरे खुर्द्याचें नाणें, त्याप्रमाणें शिक्षणाच्या व्यापारांत मॅट्रिक, यू. एस्. एफ्., सेकंड ग्रेड पब्लिक सर्व्हिस, थर्ड ग्रेड पब्लिक सर्व्हिस, वगैरे खुर्द्याचीं नाणीं होत. परंतु खुर्द्यांतील पैसे झाले तरी सगळेच पैसे सगळीकडे चालतात असें नाहीं, त्याप्रमाणें हे शिक्षणाच्या व्यापारांतील पैसेही सगळेच सगळीकडे चालत नाहींत. मॅट्रिकचे पैसे सरकारी कचेऱ्यांतून मुळींच चालत नाहींत. तेथें फक्त

यू. एस्. एफ्. वगैरे जातीचाच खुर्दा घेतला जातो. शिक्षणाच्या व्यापारांत ह्या खुर्द्याच्या वरचेंही चवल्या, पावल्या, अधेल्या, रुपये वगैरेचें नाणें पाडण्यांत आलेलें आहे. मेडिसिन, इंजिनियरिंग, आर्ट्स वगैरे फॅकल्टीमधील अंडर ग्रॅज्युएट्स हे त्यांच्या त्यांच्या वर्षांच्या मानानें चवल्या, पावल्या, अधेल्या वगैरे नाणीं होत. आणि ग्रॅजुएट म्हणजे बरोबर सोळा आण्यांचें रुपयाचें खणखणीत नाणें होय. परंतु त्यांत कित्येक बद वाजणारे, कांहीं कथलाचे, कांहीं तांब्याच्या पैशावर पारा चढविलेले, कांहीं भोकें पाडून निरुपयोगी झालेले, कांहीं कांठ झिजलेले आणि कांहीं तर निवळ खोटे असे असतात. परंतु देवघेवीच्या व्यापारांतील नाणें आणि शिक्षणाच्या व्यापारांतील नाणें ह्यांच्यामधील साम्य येथेंच संपत नाहीं. तें साम्य आणखीही एका गोष्टीमध्यें दृष्टोत्पत्तीस येतें. सरकारनें ह्या दोन्ही प्रकारच्या व्यापारासाठीं आपल्या टांकसाळा सुरू केलेल्या आहेत. पण आपण असा विचार केला पाहिजे कीं, देवघेवीच्या व्यापाराच्या नाण्यावर शिक्के मारणाऱ्या टांकसाळा सरकार नेहमीं उघड्या ठेवितें काय ? त्यांच्यासंबंधानें सरकारचें काय धोरण आहे ? देवघेवीच्या व्यापाराला जितक्या नाण्याची आवश्यकता आहे, तितकें नाणें पाडून झालें म्हणजे सरकार आपल्या टांकसाळा अलीकडे बंद करतें. उगीच चांदीच्या तुकड्यांवर शिक्के मारून करावयाचें आहे काय ! जरूरीपुरत्या तुकड्यांवर शिक्के मारून बाकी चांदीचे गोळे सरकार जसेच्या तसे ठेवितें. आणि तेंच धोरण सरकारनें या शिक्षणाच्या व्यापाराच्या बाबतींतही कां स्वीकारूं नये ! देशांतील विद्येच्या गरजेच्या मानानें कांहीं तुकड्यांवर शिक्के मारून बाकीचे गोळे जसेच्या तसेच कायम ठेवून आपली शिक्षणाची टांकसाळ सरकारनें कांहीं दिवस बंद ठेवली तर त्यांत कांहीं गैर होत आहे असें नाहीं. देशाला पाहिजे त्या बेतानें ग्रॅज्युएटांवर शिक्के मारून त्यांचें चलनी नाणें पाडून दिल्यानंतर दुसऱ्या टांकसाळीप्रमाणें ही टांकसाळही कां बंद राहूं नये ? वास्तविक बंद न ठेवण्याला कांहीं एक कारण नाहीं. परंतु स्वतंत्र देशांतून शिक्षण हा व्यापार म्हणून कोणी समजत नाहींत. तें सरकारचें एक कर्तव्यकर्म मानलें जातें. त्यामुळें तिकडे शिक्षणाच्या टांकसाळा नेहमीं उघड्या असतात. ही बातमी हिंदुस्थानांतील लोकांना कर्णोपकर्णीं कळली असल्यामुळें येथील टांकसाळा कांहीं मुदतीपर्यंत अजीबात बंद करणें हिंदुस्थानांतील लोकांच्या मुबंतीखातर सरकारला

इष्ट वाटत नाहीं. म्हणून ग्रॅजुएटांचीं चलनी नाणीं पाडणाऱ्या टांकसाळा अजीबात बंद न ठेवतां त्यांतून जितकीं थोडीं नाणीं बाहेर पडतील, तितकीं पडूं देण्याचा सरकारनें हल्लीं अत्यंत स्तुत्य प्रयत्न चालविलेला आहे. ही टांकसाळ कांहीं दिवस अजीबात बंद ठेवण्याचा सरकारला प्रत्येक हक्क आहे हें उघड आहे. असें असूनही आपलें दयाळु सरकार एखाद्या जबरदस्त राजाप्रमाणें त्या टांकसाळा कांहीं दिवस अजीबात बंद न ठेवितां थोडथोडया चालू ठेवीत आहे, याबद्दल सगळ्या हिंदुस्थानानें त्यांना एक मोत्याच्या करंडयांत मानपत्र दिलें पाहिजे ! तसेंच त्या टांकसाळी बंद ठेविल्या आहेत असें तर कोणाला वाटूं नये, आणि त्यांच्यांतून चलनी नाणींही कधीं फारशीं बाहेर पडूं नयेत, हें दुकसबी बिकट काम कसें करतां येईल, याबद्दल सल्ला घेण्याकरितां आपल्यांतील असल्या कामांत निपुण, विद्वान्, सुसंस्कृत आणि अनेक देशांतील उपपदांनीं विभूषित अशा डॉ० भांडारकरांसारख्या सद्गृहस्थांना सरकार बहुमानपुरस्सर हिमालय पर्वतावर पाचारण करीत आहे ही गोष्टदेखील या प्रकरणामध्यें इतकी अनुरूप आहे कीं, या कामीं सरकारचें जास्त अभिनंदन करावें, किंवा डॉ० भांडारकरांचें करावें, ह्या प्रश्नासंबंधानें कोणीही बुचकळ्यांत पडल्यावांचून राहणार नाहीं. सारांश, सध्यां हें ग्रॅजु-एटांचें चलनी नाणें हिंदुस्थानांत वाजवीपेक्षां फाजील झालें असल्यामुळें याचें काय करावें; याबद्दल सरकारला मोठी काळजी पडली आहे, व सरकार चाकरी देत नाहीं तर आतां आपण आपलें पोट कसें भरावें अशी ग्रॅजुएटांनाही काळजी पडली आहे; अशा स्थितींत जर सुदैवानें तिबेटचा दरवाजा एकदम उघडला तर आपली किती तरी सोय होणार आहे ! मग आपल्यांतील चलनी नाण्यांना मध्यान्हकाळची फारशी पंचाईत मुळींच पडणार नाहीं व या चलनी नाण्यांचा तिबेटांत खप होऊं लागला व त्यामुळें त्यांना हिंदुस्थानांत असंतोष वाढविण्याला फुरसत नाहीं अशी सरकारची खात्री झाली म्हणजे सरकार कदाचित् आपलें युनिव्हर्सिटी बिल ना. प्रो. गोखले यांच्या जोरदार भाषणांवांचूनही माघारें घेऊन फिरून आपलीं चलणी नाण्याची गिरणी रोज चौदा तास चालविण्याला सुरवात करील ! आपल्या देशांतील लोकांना मग तिबेटामध्यें फारच विपुल जागा सांपडेल. आतां एवढें खरें आहे कीं, आपल्याबरोबर कांहीं इंग्लिश लोकही तिबेटामध्यें येतील. परंतु तिबेटी आणि

हिंदुस्थानी मिळून इतके काळे लोक जेथें जमणार, तेथें त्यांचा बंदोबस्त ठेवण्या-करितां कांहीं तरी गोरे लोक अगदीं अवश्य पाहिजेतच. जर गोरे लोक तिबेटामध्यें आले नाहींत, तर मग तेथें न्याय कोण करील? तेथील संपत्ति कोण वाढवील? तेथें शिक्षण कोण देईल? तेथें पाश्चिमात्य सुधारणा कोण प्रसृत करील? तेथें व्यापार कोण फैलावील? आणि तेथील पैसे विलायतेस कोण पोंहोचते करील? परंतु नुसते साधे गोरे लोकच येऊन उपयोगी नाहींत. त्यांच्याबरोबर गोरे मिशनरीही आले पाहिजेत. कारण नुसते साधे गोरे लोक येऊन त्यांच्या परिश्रमानें तिबेट धुऊन साफ होऊन कांहीं वर्षांनीं तेथें दुष्काळ पडूं लागले म्हणजे मग तिबेटी लोकांचें कसें होणार? मिशनरी लोक नसले तर अशा प्रसंगीं त्यांना वाटवील कोण? कांहीं थोडेसे पंचवीसतीस हजार गोरे सोजीर, आणि शिवाय गोरे डॉक्टर, इंजिनीअर, कलेक्टर, जज्ज, अकौन्टंट, पोलीस कमिशनर्स, पोलिटिकल एजंट्स, हेडमास्तर, प्लेग, नर्सेस वगैरे जातींपैकीं प्रत्येकीं निदान पांचपांचशें इतके युरोपियन असले म्हणजे तिबेटामध्यें उगीच जास्त गोऱ्या लोकांची भरती करण्याचें कांहीं कारण नाहीं. अगदीं जेवढे अवश्यच पाहिजे असतील, तेवढेच युरोपियन तिबेट जिंकल्या-वर तेथें पाठविले जातील, त्यांच्यापेक्षां जास्त पाठविले जाणार नाहींत, याबद्दल आपण इंग्रजांच्या न्यायी आणि निर्लोभी स्वभावावर पूर्ण विश्वास टाकण्यास कांहीं एक हरकत नाहीं. कारण, कर्झनसाहेबांनीं इराणच्या आखातांत नुकतेंच बोलून दाखविलें आहे, त्याप्रमाणें इंग्रज लोक जेव्हां एखादा देश आपल्या संरक्षणाखालीं किंवा ताब्याखालीं घेतात तेव्हां तेथील लोकांचें स्वातंत्र्य हिरावून घ्यावें आणि घरेंदारें धुऊन अणि त्यांच्या तोंडाला पानें पुसून आपणच सगळा मलिदा खावा, अशी त्यांची बिलकुल इच्छा नसते. दोघांच्यामध्यें स्नेहभाव वाढवला व आपल्या हातून जर दुसऱ्या देशाचें कांहीं संरक्षण आणि कल्याण साधत असलें तर तें साधावें, एवढाच त्या कोंवळ्या अंतःकरणामध्यें हेतु असतो. तेव्हां हा त्यांचा हेतु लक्षांत घेतला असतां तिबेटच्या कुरणावर जरूरीपेक्षां जास्त गोरे लोक चरावयाला सोडले जातील अशी शंका बाळ-गिण्याचें मुळींच कारण नाहीं. व गोऱ्या लोकांच्या मानानें आपल्या काळ्या लोकांचाच तिबेटामध्यें जास्त समावेश होईल, ही गोष्ट निःसंशय आहे. आतां कोणी कुत्सित लोक अशी शंका काढतील कीं, गोरे लोक थोडे असले तरी

त्यांच्या पगाराची बेरीज लाखों नेटिव लोकांच्या एकंदर प्राप्तीपेक्षां किती तरी पटीनें जास्त होईल. परंतु जास्त लोक कोणाचे लागतील इकडे आपण पाहिलें पाहिजे, व अशा दृष्टीनें पाहिले असतां इंग्रजांनीं तिबेट घेतल्यापासून हिंदुस्थानाचाच जास्त फायदा आहे हें निखालस होय.

परंतु आपला सगळ्यांत मोठा फायदा म्हटला म्हणजे कॉंग्रेससंबंधाचा होय. दुर्दैवानें यंदाच्या डिसेंबरमध्यें तिबेटचे प्रतिनिधि मद्रासच्या कॉंग्रेसला येऊं शकणार नाहींत ही गोष्ट खरी आहे, परंतु पुढल्या वर्षाच्या कॉंग्रेसला बनारस मुक्कामीं येण्याबद्दल एक कुंकुमपत्रिका यंदांच्या कॉंग्रेसनें आगाऊ पाठवून ठेविली, तर फारसें वावगें होणार आहे असें नाहीं. तिबेट जर आपल्या कॉंग्रेसला येऊन मिळेल, तर आपल्या कॉंग्रेसचें वजन वाढल्यावांचून कधींही राहावयाचें नाहीं. व आतां कॉंग्रेसचा निरुपयोगीपणा पाहून कॉंग्रेसला हिंदुस्थानांतील कोणत्याही प्रांतांतील लोक अलीकडे ज्या अर्थी बोलवीतनासे झालेले आहेत, त्या अर्थी तिबेटासारखे कॉंग्रेसच्या भपक्याला भुलून जाण्याला आपल्याला नवीन प्रांत मिळतील तर कॉंग्रेसच्या अशा आपत्काळीं तिला परमेश्वरच पावला असें म्हणण्यास हरकत नाहीं. व सगळ्या गोष्टी सुरळीत जुळून आल्या तर पांचसात वर्षांच्या आंतच खुद्द तिबेटमध्यें, लामाच्या राजधानींत, लासा शहरांतही आपल्याला कॉंग्रेसची बैठक भरविण्याला अडचण पडणार नाहीं ! कॉंग्रेसच्या योगानें आपले इतर प्रांतांतील लोकांशीं असेंच दळण आणि वळण वाढत गेलें पाहिजे. ब्रह्मदेशाशीं वळण पडल्यामुळें तिकडे आपलें दळण जास्त वाढत चाललेंच आहे व कॉंग्रेसला जर तिबेट देशापुढेंही आपलें दळण असेंच घालतां आलें, तर मग आपल्या देशाच्या राजकीय उन्नतीला पारावरच नाहीं, असें म्हटलें पाहिजे. हें कॉंग्रेसचें दळण दिवसेंदिवस जास्त जास्त वाढत जाणार असा पुष्कळ रंग दिसत आहे. कारण, अलीकडे आपलें सरकार कॉंग्रेसचें सर्व म्हणणें एकामागून एक मान्य करीत चाललें आहे. कॉंग्रेसला सरकारांत फार मान मिळत आहे ! आणि कॉंग्रेसचा कोणताही ठराव सरकार खालीं पडूं देत नाहीं. कॉंग्रेसमधील वक्त्यानें गर्जना करण्याचा अवकाश, सरकार लागलेंच त्याप्रमाणें करावयाला ! याचें अगदीं ताजें उदाहरण कोणाला पाहिजे असेल तर तें हें आहे कीं, वायव्येकडील सरहद्दीवरील लढाया बंद कराव्या व तिकडील पुढें पुढें सरत जाण्याचें धोरण सरकारनें तहकूब करावें, असें कॉंग्रेसनें मधून

मधून ठराव केले होते, ते शिरसामान्य करून हिंदुस्थान सरकारनें यंदा वायव्य दिशेकडील लढाईचें आणि त्या दिशेनें पुढें सरकण्याचें नांव अगदीं सोडून दिलें आहे ! हल्लीं हिंदुस्थान सरकार सरहद्दीवर लढाई सुरू करीत आहे व आपलें घोडें हळूहळू पुढें ढकलीत जाण्याचें धोरण चालू करीत आहे हें खरें; परंतु ते तिबेटच्या बाजूला ! आणि तिबेट हें हिंदुस्थानच्या वायव्य दिशेला आहे, असें काँग्रेसच्या एकाही ठराव पास करणाऱ्या पुढाऱ्याला म्हणतां यावयाचें नाहीं ! वायव्येकडील सरहद्दीकडे जाऊं नका, असें काँग्रेस म्हणते आहेना ? तर तिकडे जावयाचेंच नाहीं, अशा बारकाईनें आणि कसोशीनें सरकार काँग्रेसचें म्हणणें ऐकत आहे ! आणि हा काँग्रेसनें मिळविलेला विजय कांहीं लहानसहान आहे असें नव्हे ! ह्या विजयाबद्दल प्रत्येक इलाख्यांतील काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं आणि लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या सभासदांनीं आपआपली पाठ थोपटून घेण्याला कांहीं एक हरकत नाहीं. काँग्रेसच्या म्हणण्याला या तिबेटाच्या मोहिमेंत सरकारनें दुसऱ्याही एका रीतीनें मान दिलेला आहे. सौडनमध्यें लढाई झाली, दक्षिण आफ्रिकेंत लढाई झाली, तसेंच सोमालीलँडमध्यें लढाई चालली आहे; पण या परदेशांतील लढायांशीं हिंदुस्थानचा कांहीं एक संबंध नसल्यामुळें या लढायांचा खर्च हिंदुस्थानावर बसविणें गैर आहे, असें काँग्रेसचें एक म्हणणें होतें. हें म्हणणेंही सरकारला शिरसामान्य झालें आहे असें दिसतें. कारण, हिंदुस्थानांतील सैन्य घेऊन परदेशांतील लढाया लढण्याचें सोडून देऊन सरकारनें हिंदुस्थानांतील सैन्याच्या साहाय्यानें आतां तिबेटाशीं लढण्याला सुरवात केली आहे. व आतां या तिबेटाच्या बाबतींत तरी ही लढाई हिंदुस्थानशीं ज्याचा संबंध नाहीं अशा परकीय देशामध्यें लढली जात आहे, असा आक्षेप काँग्रेसच्या अतिशय बोलक्या पुढाऱ्यालाही घेतां येऊं नये, अशी सरकारनें काँग्रेसच्या मताला मान देऊन खबरदारी घेतली आहे. ही गोष्ट प्रसंशनीय नव्हे काय ? व काँग्रेसचें दिवसेंदिवस जास्त वजन पडत चाललें आहे हें यावरून स्पष्ट होत नाहीं काय ?

काँग्रेसला जसा सरकार दिवसेंदिवस मान देत आहे, त्याचप्रमाणें आपली सामाजिक परिषदही दिवसेंदिवस लोकादराला जास्त पात्र होत चालली आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. तेव्हां काँग्रेसप्रमाणें आपल्या सामाजिक परिषदेनेंही तिबेटाकडे आपली थोडी कृपादृष्टि वळविली तर ती अस्थानीं होईल

असें नाहीं. काँग्रेसच्या ठरावांचा सरकारदरबारमध्यें प्रवेश व्हावयाचा असतो, म्हणून त्यासाठीं कायदेशीर रीतीनें प्रतिनिधि निवडून येणें अवश्य असतें. म्हणून काँग्रेसला यंदाच तिबेटचे प्रतिनिधि बोलवितां येत नाहींत. परंतु आपल्या सामाजिक परिषदेची तशी गोष्ट नाहीं. तिला कोणीही खपतात. तेव्हां निदान सामाजिक परिषदेला तरी तिबेटचे कांहीं प्रतिनिधि येतील अशी तजवीज झाली, तर राष्ट्रीय सामाजिक परिषदेचें, मद्रासच्या सोशल रिफॉर्म पार्टीचें, मुंबईच्या सेंट्रल रिफॉर्म असोसिएशनचें, मौजे पिंपळगांव बुद्रुक येथील ऑल इंडिया युनिफॉर्म रिफॉर्म पार्लमेंटचें वगैरे जें काम वर्षभर अव्याहत झपाट्यानें चाललें आहे, त्याच्यावर या तिबेटच्या कृतीनें अगदीं कळस बांधल्यासारखें होईल! निदान तूर्त पुष्कळ सुधारकांच्या इच्छेप्रमाणें एवढें तरी झालें पाहिजे कीं, हिंदुस्थानांत फारसा उपयोग नाहीं, अशा एखाद्या रिकामटेकड्या सुधारकाला तिबेट देशांतील सामाजिक परिस्थितीची माहिती मिळवून आणण्याकरितां प्रतिनिधि पाठविण्यांत यावा. बौद्धधर्मी लोकांच्या देशांत आपला मनुष्य तिकडील माहिती मिळविण्यासाठीं इकडून पाठवावयाचा, त तो पवित्र असावा, आपल्याबद्दलची त्या लोकांना फार उच्च कल्पना असेल तिचा भंग न झाला पाहिजे, तेव्हां असा दारू वगैरे न पिणारा सुधारक कोण मिळेल, अशी विवंचना करीत बसण्याचें कांहीं कारण नाहीं. कां कीं त्याला हिमालयासारख्या थंडीच्या आणि बर्फाच्या प्रदेशामधून जावें लागणार आहे, व तसल्या हवेंत त्या पदार्थांची धार्मिक आवश्यकता असते, अशाबद्दल वाटेल तो युरोपियन पुरावा देऊं शकेल. ही गोष्ट ध्यानांत धरली असतां सर्व विवंचनेचें निरसन होणार आहे. त्या सुधारक बातमीदारानें तिबेटांत जाऊन तिकडे विधवा मिळतील किंवा नाहीं, मिळाल्यास त्या आपल्या पातिव्रत्याचा वेदोक्त आणि शास्त्रोक्त भंग करण्याला तयार होतील किंवा नाहीं. तिकडील लोक भर समाजामध्यें उघड रीतीनें दारू पिण्याचा आपला दुराग्रह सोडून देतील किंवा नाहीं, ते आपल्या बायकांना इंग्रजी शिकवितील किंवा नाहीं, वगैरे अनेक माहितीबद्दलचे तक्ते भरून पाठविले आणि ते सेंट्रल रिफॉर्म ॲसोसिएशनच्या दरबारामध्यें येऊन दाखल झाले, म्हणजे मग त्या मानानें तिबेटांतील धर्म बुडविण्याकरितां आणि सबगोलंकार करण्याकरितां सामाजिक परिषदेनें तिकडे कशी काय मोहीम सुरू करावी, याबद्दल जनरल सेक्रेटरी, असिस्टंट सेक्रेटरी,

अंडर सेक्रेटरी, होम सेक्रेटरी, फॉरेन सेक्रेटरी, वुइडोरीमॅरेज सेक्रेटरी, पियानो सेक्रेटरी वगैरे जे सामाजिक परिषदेचे बिनकामाचे अनेक सेक्रेटरी असतील, त्यांना निर्णय करण्याला ठीक पडेल.

परंतु तूर्त काँग्रेस आणि कॉन्फरन्स यांनीं प्रथमतः एक गोष्ट अगत्य केली पाहिजे. हिंदुस्थानला हा जो तिबेटचा अपूर्व लाभ मिळण्याचा सुयोग आलेला आहे, ह्या सगळ्याचें श्रेय बऱ्याच अंशीं नेपाळच्या महाराजांकडे आहे, या गोष्टीकडे कोणाचेंही दुर्लक्ष होतां कामा नये. नेपाळ सरकारनें या कामीं जें अलौकिक मानसिक धैर्य दाखविलें आहे त्याबद्दल त्यांचें जितकें कौतुक करावें तितकें थोडें आहे. ह्या स्तुत्य प्रयत्नानें नेपाळचे महाराज नुसत्या तिबेटलाच हिंदुस्थानाशीं सामील करीत नसून आपल्या स्वतःचाही इतके दिवस अलग असलेला मुलूख हिंदुस्थानाला आणून चिकटवीत आहेत. केवढी ही स्वार्थनिरपेक्षता ! नेपाळी राजपुरुषांचें हें अचाट नीतिधैर्य पाहून त्यांनीं बहुधा आपल्या इकडील सामाजिक परिषदांचे बरेच रिपोर्ट आणि सामाजिक पुढाऱ्यांचीं बरीच चरित्रें काळजीपूर्वक रीतीनें वाचलीं असलीं पाहिजेत असें दिसतें ! ह्या कृत्याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्याकरितां काँग्रेसमध्यें सगळ्यांनीं उभें राहून एक ठराव पास केला पाहिजे, व सामाजिक परिषदेनें तर आपल्या धरसोडीच्या नैतिक धैर्याचा इतका दूरपर्यंत फैलाव झाला याबद्दल आनंद प्रदर्शित करून एका डेप्युटेशनबरोबर नेपाळमध्यें सुवर्णवर्णांकित मानपत्र पाठविलें तरी तो बहुमान सुद्धां नेपाळाला थोडाच होईल कीं काय, अशी भीति वाटणें साहजिक आहे.

---

## जुनीं मढीं आणि नवीं अंतःकरणें : : २०

हिंदुस्थान देशाच्या सांप्रतच्या स्थितीकडे पाहिलें असतां हा देश जगाच्या इतिहासांत इतःपर आपलें डोकें वर काढील अशी आशा करण्याला कांहीं एक जागा नाहीं. इंग्लिश लोक आश्वासनें देत आहेत, अशा दाखवीत आहेत, आणि हिंदुस्थानांतील लोक अगदीं ठार मरून जातील अशाबद्दलची काळजीही घेत आहेत. परंतु याच्या पलीकडे हिंदुस्थान देशासाठीं जास्त कांहीं करण्याची त्यांची खरोखर इच्छा असेल असें कांहीं दिसत नाहीं. व तशी इच्छा त्यांना काय म्हणून असावी ? इंग्लिश लोकांच्याबद्दल एवढी खात्री देतां येईल कीं, ते आपल्याला हिंदुस्थानांतून अजीबात नामशेष करणार नाहींत, किंवा होतां होईल तोंपर्यंत ते रशियाला हिंदुस्थान जिंकूं देणार नाहींत. कारण ते फार शहाणे लोक आहेत. हिंदुस्थान देश हा प्रत्यहीं सोन्याचें अंडें विणारा हंसपक्षी आहे. हा हंसपक्षी पूर्वीं कित्येक मुसलमान लोकांच्या हातीं लागला होता. परंतु त्याच्या पोटांतील सगळेंच सोनें आपल्याला एकदम मिळावें अशा अधाशीपणाच्या इच्छेनें त्यांनीं तो पक्षी एकदम ठार करून टाकण्याच्या बेतांत आणला होता. त्यांच्या हातून तो घेऊन इंग्लिशांनीं त्याला आतांपर्यंत जगविलेला आहे; व दररोज हें सोन्याचें अंडें घालण्याचा धर्म जोंपर्यंत त्या पक्ष्याच्या अंगांत आहे, तोंपर्यंत इंग्लिश लोक त्याला कधींही ठार मारणार नाहींत. रशियानें हिंदुस्थानावर स्वारी केली तर इंग्लिश लोक त्याच्यापाशीं लढतील, आणि दुष्काळानें हिंदुस्थानावर स्वारी केली तर हिंदुस्थानांतील लोकांच्या शरीरांतून त्याचे प्राण बाहेर न जाऊं देण्याला जितके पैसे लागतील तितके इंग्रज लोक हिंदुस्थानच्या तिजोरींतून खर्च करतील किंवा इतर सर्व राष्ट्रांतून वर्गणीनें गोळा करतील. पण अशानें हिंदुस्थानचा काय [illegible] हिंदुस्थानांतील लोकांनीं

दुष्काळ आला असतां आपल्या शरीरांतून आपले प्राण जाऊं देऊं नयेत आणि रशिया आला असतां आपली गुलामगिरीची बिडी आपल्या पायांतून तुटून जाऊं नये, एवढें झालें म्हणजे हिंदुस्थान कृतकृत्य झालें काय? एवढें झाल्यानें कोणता समंजस देश कृतकृत्य होणार आहे? कोणत्या देशाच्या खऱ्या अस्तित्वाला आणि जीवनाला एवढ्याशा गोष्टी पुरेशा आहेत? अशा स्थितींत दुसरा कोणता देश संतुष्ट राहिला असता? याच्यापलीकडे कांहीं जास्त सुख आहे, हें न दिसण्याइतका आंधळा कोणता देश आहे? दुष्काळ येऊन त्यांतून प्राण वांचविण्यापेक्षां दुष्काळ नच येणारा देश अधिक भाग्यवान् नाहीं काय? हल्लीं हिंदुस्थानाला जी स्थिति आहे, त्याच्या वरची सुखाची पायरी जर कांहीं असली तर तिच्याकडे हिंदुस्थानचा ओढा जास्त जास्त लागल्यावांचून कधींही राहावयाचा नाहीं. इंग्लिश लोकांच्या एकंदर प्रयत्नांच्या दिशेचें धोरण पाहिलें तर होतां होईल तोंपर्यंत हिंदुस्थानांतील लोकांच्या मनापुढें त्यांच्या सर्व स्थिती-पेक्षां दुसऱ्या उच्च स्थितीची कल्पना येऊं द्यावयाची नाहीं. तुमची आहे हीच स्थिति चांगली आहे, याच्यापेक्षां जास्त चांगली स्थिति सध्यां तुम्हांला शक्य नाहीं, सध्यांच तुम्ही जास्त चांगल्या स्थितीची खटपट करूं लागला तर ती मिळणार तर नाहींच, पण तुमची आहे तीही स्थिति नाहींशी होईल, तुम्हांला जास्त चांगल्या स्थितीसाठीं निराळे प्रयत्न करावयाला पाहिजे आहेत कशाला? आम्हीच तुम्हांला हळूहळू चांगल्या स्थितीला नेऊन पोंहोचवूं, असल्या राजकीय मंत्रांनीं इंग्लिश लोकांनीं आपल्याला इतकें भारून टाकलें आहे कीं, त्यामुळें आपली नजर बंद होऊन इंग्लिश आणि त्यांचीं आश्वासनें यांच्या पलीकडे आपल्याला जगामध्यें दुसरें कांहीं दिसेनासेंच झालें आहे.

परंतु इंग्लिशांचे हे प्रयत्न अशा रीतीनें किती दिवस यशस्वी होणार? इंग्लिश लोकांना असें वाटत आहे काय, कीं हिंदुस्थानांतील लोक जगाच्या अंतापर्यंत आपल्या असल्या भ्रामक युक्तिवादांनीं असेच फसत राहणार? नाहीं, ही स्थिति फार दिवस टिकावयाची नाहीं. हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे; आणि आत्यंतिक राष्ट्रीय सुख हा त्या राष्ट्रावर उगवणारा एक प्रकारचा सूर्य आहे. तो सूर्य झांकून ठेवण्याबद्दल इंग्लिशांनीं कितीही प्रयत्न केले, त्या सूर्याच्या आणि हिंदुस्थान देशाच्या दरम्यान त्यांनीं कितीही पडदे धरले, तरी अखेरीस केव्हां ना केव्हां तरी तो सूर्य हिंदुस्थानावर प्रकाशमान झालाच पाहिजे! ढग हे कांहीं

वेळपर्यंत सूर्याला आच्छादित करूं शकतील. परंतु ते सूर्यप्रकाशाला समूळ नाहींसा करूं शकणार नाहींत. आपला हा नजरबंदीचा खेळ आपण फार दिवस चालवूं आणि तो आत्यंतिक राष्ट्रीय सुखाचा सूर्य आपण अनंत वर्षेंपर्यंत हिंदुस्थानापासून दडवून ठेवूं, असें जर इंग्लिशांना वाटत असेल, तर तो त्यांचा भ्रम आहे. या अशक्य कामामध्यें आपल्याला यश येईल, अशी आपल्या मनाची समजूत करून घेण्यास इंग्लिशांपाशीं काय कारणें आहेत, आणि त्या कारणांचें सृष्टिनियमांच्या दृष्टीनें परीक्षण केलें असतां तीं किती डळमळीत आहेत, याबद्दल आपण थोडासा विचार करूं.

इंग्लिशांनीं हिंदुस्थान जिंकून आज दीडशें वर्षेंपर्यंत आपल्या ताब्यांत ठेविलें आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु तेवढ्यावरून त्यांचा हा क्रम असाच पुढें चालू राहील असें मात्र कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं. मागच्या अनुभवावरून भावी स्थितीचें अनुमान करावयाचें अशी तर्कशास्त्राची पद्धत आहे खरी. परंतु त्या पद्धतीनें केलेलें अनुमान प्रस्तुत उदाहरणांत कधींही बरोबर ठरावयाचें नाहीं. जशी दीडशें वर्षांत हिंदुस्थानची स्थिति होती तशीच ती पुढेंही दीडशें वर्षें, नव्हे दीड हजार वर्षेंही, कायम राहिली पाहिजे, असलें वेडगळ अनुमान इंग्लिशांच्याबरोबर जर दुसरे कोणी करीत असतील, तर या पृथ्वीच्या पोटांत अनेक उद्‌भुत आणि अनुद्‌भूत सामर्थ्यांची गणना त्यांनीं हिशोबांत धरली नाहीं असें म्हणावें लागतें. हिंदुस्थानची स्थिति मागें जशी होती तशीच ती पुढें राहील व आम्ही ती तशीच कायम राखूं, असें इंग्लिश लोकांनीं म्हटले तर त्यांत आश्चर्य नाहीं. कारण, हिंदुस्थानासंबंधानें त्यांची दृष्टि अध झालेली आहे. परंतु इतर लोकांना तसें वाटण्याचें कारण नाहीं. त्यांना हिंदुस्थान मागच्याप्रमाणें पुढेंही राहील असें वाटण्याला काय कारण आहे ? अजून सर्व प्रयत्न एकतर्फी चाललेले आहेत. इंग्लिशांनीं हिंदुस्थान जिंकण्याला सुमारें दीडशें वर्षांच्यापूर्वींच प्रारंभ केला, व सुमारें पन्नास, फार झालें तर पाऊणशें वर्षांच्या पूर्वी त्यांचें हिंदुस्थान जिंकण्याचें काम साधारणपणें पुरें झालें. व तेव्हांपासून आपण बळकाविलेलें हिंदुस्थान आपल्या हातांत राहावें, यासाठीं त्यांचे प्रयत्न सुरू झाले आहेत. शंभर वर्षें जिंकणें आणि पन्नास वर्षें कायम राखण्याचे प्रयत्न करणें, हा हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याचा संक्षेपतः इतिहास होय. गेल्या व त्याच्या मागच्या शतकांत बहुतेक लोक अदूरदर्शी, आपसांत भांडणारे आणि

तिऱ्हाइताला घरांत घेणारे, असे होते हें खरें, व त्यामुळें क्लाइव्हसाहेबां-पासून तों एल्फिन्स्टनसाहेबांपर्यंत इंग्लिशांनीं सुजाउद्दवल्याच्या मसनदीपासून तों पेशवाईच्या गादीपर्यंत धुमाकूळ घातला. आणि त्यामध्यें परतंत्र झालेले हिंदुस्थानांतील लोक हातांतील शस्त्रें खालीं ठेवून इंग्लिश लोक काय करीत आहेत, आणि आपल्या हातून आपला फायदा होत नाहीं तर निदान त्यांच्या हातून तरी आपला किती फायदा होतो, हें पाहत स्वस्थ बसले आहेत. ह्या लोकांपैकीं पुष्कळ लोक इंग्लिशांनीं प्रथम दिलेल्या आश्वासनांनीं आणि गोड गोड शब्दांनीं फसले, यांत शंका नाहीं. व त्या आश्वासनांच्या फसवणुकीचे परिणाम अजूनही कित्येकांच्या मनावर कायम आहेत. हिंदुस्थानांतील लोकांचें लक्ष गुंतवून ठेवण्यासाठीं इंग्लिशांनीं त्यांच्यापुढें कित्येक कागदी चित्रें मांडलीं. त्यांतील प्रमुख म्हटलीं म्हणजे स्थानिक स्वराज्यें, म्युनिसिपालिट्या, इलेक्टिव्ह फ्रँचाईस, नॉन्‌ऑफिशियल प्रेसिडेंट, युनिव्हर्सिट्यांमधील फेलोंच्या आणि सिंडिकांच्या जागा आणि कायदेकौन्सिलें व त्यांतील लोकनियुक्त सभा-सदांच्या जागा, ऑनररी मॅजिस्ट्रेट, जे. पी. वगैरेच्या जागा, रावसाहेबां-पासून थेट सी. आय. ई. पर्यंतच्या पदव्या, भाषणस्वातंत्र्य, मुद्रण-स्वातंत्र्य, अर्ज केला असतां सर्व कांहीं प्राप्त होतें ह्या खोट्या तत्त्वावर स्थापन केलेल्या सभा, कॉंग्रेसेस आणि परिषदा, इत्यादि होत. हीं सगळीं सोंगें इंग्लि-शांनीं आमच्यापुढें मांडलीं आहेत. व यांतून तुमचा तरणोपाय आहे, असें ते आपल्याला सांगत आहेत. तें ऐकून आपल्यांतील कांहीं लोक तें म्हणणें खरें मानून त्या मृगजळाच्या मागें धांवत सुटले होते, व अजूनही कित्येक धांवतच आहेत. हिंदुस्थानची स्थिति आज आहे अशीच आम्ही पुढें राखूं, असें अनु-मान करण्यांत इंग्लिश लोकांची सर्व भिस्त काय ती याच जातीच्या लोकांवर आहे. पण हे लोक इंग्लिशांचे मनोरथ अखेरपर्यंत पल्ल्यास पोंहोचवूं शकणार नाहींत. हे थोडेसे सुशिक्षित व आपल्या पदव्यांना चटावलेले लोक ज्याप्रमाणें नाचतील त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील बाकीचे तीस कोटि लोक आपलें वर्तन ठेवतील, अशा समजुतीवर इंग्लिशांनीं या लोकांना महत्त्व देऊन त्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याला सुरवात केली आहे. पण खालच्या दर्जातील लोकांपैकीं यांना कोण विचारीत आहे ? इंग्लिशांनीं यांना सुशिक्षित केलेलें आहे. परंतु खालचे लोक यांना शहाणे म्हणून समजत नाहींत. त्यांना आपले विचार

इंग्रजींत बोलतां येत नाहींत, आणि साहेब इंग्रजीशिवाय दुसरी भाषा समजूं इच्छीत नाहींत. म्हणून या लोकांना थोडेसें महत्त्व आलेलें आहे व तेवढ्या-पुरतें बाकीचे लोक यांना हातीं धरतात. पण याच्यापलीकडे समाजांत त्यांचें महत्त्व काय आहे? आणि हे लोक ज्या हक्कांना आपलें सर्वस्व म्हणून मानतात त्या निष्फळ हक्कांची तरी बाकीच्या लोकांना काय किंमत आहे! जेथें म्युनिसि-पालिटीचेंच कोणाला महत्त्व वाटत नाहीं तेथें नॉनऑफिशियल प्रेसिडेंट असला काय आणि ऑफिशियल प्रेसिडेंट असला काय, त्याच्याशीं लोकांना काय कर्तव्य आहे? जेथें निष्फळ कायदेकौन्सिलें अत्यंत निरुपयोगी म्हणून वाटत आहेत, तेथें त्यांत एखादा सभासद गेला किंवा सरकारनें नेला, तो तेथें बसला किंवा उठून गेला, आणि चांगला बोलला किंवा वाईट बोलला, तरी त्याच्या-बद्दल इतर लोकांना काय? सामान्य लोक आपलें खरें हित कशांत आहे हें जास्त चांगल्या रीतीनें समजतात. तेव्हां अशा स्थितींत ज्यांना सामान्य लोकांचा पाठिंबा नाहीं असे कांहीं थोडेसे लोक पुढारी समजून, ते फसले म्हणजे हिंदु-स्थानांतील सर्व लोक फसले, अशी आपल्या मनाची समजूत करून घेऊन, त्या थोड्याशा लोकांवर इंग्लिशांनीं आपली भिस्त ठेविली असतां त्यांची आशा कधींही शेवटास जाणार नाहीं.

आधीं या लोकांच्या हातांत बाकीच्या लोकांचीं मनें आकळून धरण्याचें कांहीं साधन नसतें. आणि असें असूनही इंग्लिशांनीं त्यांच्यावर भिस्त ठेविली, तरी त्यापासून काय निष्पन्न व्हावयाचें आहे? ही फसवणुकीची अमदानी किती दिवस चालेल. हे पाश्चिमात्य सुधारणेचे हक्क लोकांनीं कधीं मागितले नस-तांना इंग्लिशांनीं आपण होऊनच त्यांचें लक्ष खऱ्या मार्गाकडून दुसरीकडे लावण्यासाठीं त्यांच्यापुढें मांडिले व त्यापासून आपल्याला खरा फायदा कांहीं एक व्हावयाचा नाहीं, असा सर्व लोकांचा पक्का ग्रह झालेला आहे. आतां कोणत्या तरी रीतीनें इंग्लिशांचे मिंधे होऊन जे कोणी त्यांत पडलेले आहेत, ते मात्र त्या पाश्चिमात्य सुधारलेल्या हक्कांविषयींचा आपला दुराग्रह कधींही सोडणार नाहींत. परंतु असें झालें तरी विकारविलसितांचें नाटक असेंच किती दिवस चालू शकणार आहे? आणि यापासून इंग्लिशांचा काय परिणाम लाग-णार आहे? हे लोक आतां जुने होत चालले आहेत व त्यांचीं स्थानिक स्वराज्यादिकांसंबंधींचीं मतेंही त्यांच्याबरोबर म्हातारीं होत चाललीं आहेत. तीं

आतां हळूहळू मरणाच्या वाटेला लागलीं आहेत. असलीं खोटीं मतें आणि त्या खोट्या मताप्रमाणें वागणारे खोटे लोक इतःपर लयाला जाणार! व या भ्रामक कल्पनांचीं पटलें एकदां वितळून गेलीं म्हणजे हिंदुस्थानच्या आत्यंतिक राष्ट्रीय सुखाचा सूर्य हिंदुस्थानावर उगवण्याला मुळींच अवकाश लागणार नाहीं.

हिंदुस्थान देश इतके दिवस होता तसाच तो यापुढें राहणार नाहीं. तो तसाच राहील असें म्हणणारे लोक उत्क्रांतीचे आणि राज्यक्रांतीचे नियम जाणीत नाहींत असें म्हणावें लागतें. हिंदुस्थानाला आशा करण्याला पुष्कळच जागा आहे. हल्लीं बारकाईनें पाहिल्यास पाहावें तिकडे नवीन प्रकारचीं नवीं अंतःकरणें दृष्टीस पडतात. ज्याचें थोडेंसें वर्णन प्रसंगवशात् वर करण्यांत आलें आहे तसल्या प्रकारचीं जुनीं मढीं हळूहळू एका पाठीमागून एक खालीं पडत चाललीं आहेत. व त्यांच्याबरोबर त्यांच्या डोक्यांतील खोट्या कल्पनांचीं मढींही नवीन जोरदार, खऱ्या, सामर्थ्यदायक आणि राष्ट्रोन्नतिकारक कल्पनांना जागा मोकळी करून देत आहेत. हिंवाळ्याचा शेवट आणि वसंतऋतूचा प्रारंभ यांच्या संधिकालाची जी जागा त्या जागेवर उभें राहून सृष्टीकडे पाहिलें असतां मोठमोठाल्या जुन्या खोडांचीं वाळलेलीं पानें गळून पडत असतात, आणि धुक्याचीं पटलें वातावरणांत लीन होऊन जात असतात, व नवीन झाडांना नवीन पालवी फुटून प्रभातकाळच्या कोमल सूर्यकिरणांनीं सर्व वनश्री हंसत असते, असें दृष्टीस पडतें; किंवा रात्र संपण्याची आणि सूर्योदय होण्याची वेळ साधून सृष्टीकडे पाहिलें असतां निस्तेज झालेले नक्षत्रगण मावळून जात असतात आणि नवीन नवीन भूप्रदेश काळोखांतून अस्तित्वांत येत असतात, असें दिसतें. तशा प्रकारचा देखावा हल्लीं हिंदुस्थानांत दृग्गोचर होत आहे. चोहोंकडे जुन्या माणसांचीं आणि कल्पनांचीं जुनीं मढीं खालीं पडत आहेत, आणि नवीं अंतःकरणें जागोजाग उद्भवत आहेत. ज्यांच्यावर इंग्लिशांची भिस्त आहे तीं हळूहळू हिंदुस्थानांतून कमी होत चाललीं आहेत आणि ज्यांच्यावर हिंदुस्थानच्या भावी उन्नतीची मदार, तीं नवीं अंतःकरणें दिवसेंदिवस जास्त उत्पन्न होऊं लागलीं आहेत. इंग्लिशांचा पगार खाऊन पुष्ट झालेले, इंग्लिशांच्या शाब्दिक पदव्यांसाठीं स्वदेशहिताची वाटेल तशी माती करणारे, इंग्लिशांच्या दिखाऊ सुधारणेनें बाहेरून मात्र सुधारलेले आणि आंतून तसेच राहिलेले, इंग्लिशांच्या खोट्या

कल्पनांनीं प्रथमतः फसलेले आणि एकदां फसल्यावर त्या फसवणुकीमध्येंच पुरुषार्थ मानीत बसलेले, असले जुने लोक उत्तरोत्तर कमी होत चालले आहेत. या लोकांचा आणि त्यांनीं उचलून धरलेल्या खोटया मतांचा जेव्हां हिंदुस्थानांत पूर्णपणें बीमोड होईल, त्या वेळेला इंग्लिशांच्या इमारतीचा पाया बराच डळमळूं लागेल. मग इंग्लिश लोकांपाशीं आपल्या अबाढव्य सैन्यापासूनच उत्पन्न होणारें काय सामर्थ्य राहील तें राहील, परंतु अनुकूल लोकमतापासून आणि संतुष्ट बहुजनसमाजापासून परकीय लोकांच्या सत्तेला जी कांहीं बळकटी असावयाची, ती मात्र कांहीं थोडया दिवसांनीं इंग्लिशांपाशीं मुळींच उरणार नाहीं. या जुन्या पंथाची आजकाल अशी स्थिति आहे कीं, त्यांत जे एकदां सांपडलेले आहेत, तेवढेच लोक तेथें आहेत. मरणानें त्यांतील संख्या दिवसेंदिवस कमी मात्र होत आहे. त्यांत नवीन लोक येऊन ती संख्या कधींही वाढत नाहीं. पोटासाठीं सरकारी चाकरीमध्यें शिरणारे कदाचित् यापुढेंही पुष्कळ सांपडतील. परंतु त्यांच्या मताच्या दृष्टीनें विचार केला असतां त्या जुन्या खोडांचीं मतें आणि या नवीन अंतःकरणांचीं मतें यांच्यांत जमीन-अस्मानाचें अंतर असलेलें कोणालाही दिसून येईल. हल्लीं जो जो मनुष्य जन्मास येत आहे, तो तो इंग्लिशांच्या बाजूला जात नसून आपल्या हिंदुस्थान देशाच्या बाजूला वळत आहे. हल्लीं जो जो मनुष्य बालपणाच्या अज्ञानांतून तरुणपणाच्या सज्ञानावस्थेंत प्रवेश करतो तो तो हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य यावच्चंद्रदिवाकरौ कॉंग्रेसच्या योगानें टिकवितां येईल किंवा ब्रिटिश पार्लमेंटमध्यें मेंबर होऊन टिकवितां येईल असल्या खुळसट प्रश्नांचा विचार करीत न बसतां हिंदुस्थानचें खरें हित काय, तें कसें साधतां येईल, आणि त्यासाठीं मीं काय केलें पाहिजे, या प्रश्नांकडे वळतो. हल्लीं जो जो मनुष्य झोंपेंतून जागा होतो आणि डोळे उघडून पाहूं लागतो तो तो ब्रिटिश साम्राज्याचा प्रश्न सोडून देऊन हिंदुस्थानच्या खऱ्या हिताकडे आपलें तन, मन, धन अर्पण करतो. हा नवीन अंतःकरणाचा पक्ष आतांपासून हळूहळू वाढूं लागला आहे. यापुढें जे जे कोणी येणार ते सगळे याच पक्षाला मिळणार असल्यामुळें थोडयाच दिवसांत हा पक्ष इतका प्रबल होऊन जाईल कीं, त्याचा हात कोणाच्यानेंही धरवणार नाहीं. हल्लीं जीं नवीन अंतःकरणें कालेजांतून शिकत आहेत आणि युनिव्हर्सिटयांतून परीक्षा देत आहेत, हल्लीं जीं नवीन अंतःकरणें

शाळांतून अभ्यास करीत आहेत आणि घरीं खेळ खेळत आहेत, हल्लीं जीं नवीन अंतःकरणें बोबडीं बोलत आहेत, अडखळत चालत आहेत, आणि जमिनीवर रांगत आहे, हल्लीं जीं नवीन अंतःकरणें या जगांत नुकतींच येऊन स्तनपान करीत आहेत आणि जीं असंख्य नवीन अंतःकरणें अजून या जगांत यावयाचीं आहेत, तीं सगळीं हिंदुस्थान देशाच्या बाजूला उभीं राहणार, तीं सगळीं हिंदुस्थानचें हित चिंतणार, आणि तीं सगळीं आपल्या हिंदुस्थान देशाला जगांतील श्रेष्ठ राष्ट्रांच्या तोडीला आणून बसविणार, यांत शंका नाहीं. इंग्लिश लोक कांहींही युक्त्या करोत, आणि आमच्या आत्यंतिक राष्ट्रीय-सुखापासून आमचें लक्ष्य परावृत्त होण्यासाठीं कितीही स्थानिक स्वराज्या-दिकांचीं मोहक जाळीं आमच्यापुढें पसरोत, त्या सगळ्यांना बाजूला सारून हिंदुस्थानचीं नवीन अंतःकरणें हिंदुस्थानची उन्नति केल्यावांचून कधींही राहावयाचीं नाहींत. जगांत बाकीचीं सर्व राष्ट्रें वैभवशाली, स्वतंत्र, दीर्घोद्योगी, शूर आणि पराक्रमी असतांना आणि त्यांचीं उदाहरणें हिंदुस्थानच्या डोळ्यां-पुढें असतांना हिंदुस्थानांतील नवीन अंतःकरणें आळशी, निरुद्योगी, भेकड, कंगाल, परावलंबी आणि उत्साहहीन अशा स्थितीमध्यें फार दिवस राहावयाचीं नाहींत, कालरूपी अफाट समुद्राच्या किनाऱ्यावर आज आपण जेथें उभे आहों, तेथून आपण पुढें दृष्टि फेकली असतां त्या दिशेनें हिंदुस्थानच्या उन्नतीसाठीं धांवत येणारीं लक्षावधि नवीन अंतःकरणें आपल्या दृष्टीला गोचर होतात. तो देखावा पाहण्याइतकी आपल्या कल्पनेची खुंटी ज्यांना पिळतां येईल, त्यांना या चर्मचक्षूंनीं या सद्यःस्थितींत न दिसणारे परंतु लवकरच घडून येणारे, असे अनेक चमत्कार दिसतील. ते पाहा, हिंदुस्थानचे असंख्य भावी रहिवाशी आपल्या पूर्वजांच्या चुकीचें निराकरण करून, सन्मार्गा-ची कास धरून आणि सर्व प्रकारच्या कुमार्गांकडे आणि फसवणुकीकडे दुर्लक्ष करून हिंदुस्थानचें हित साधीत चालले आहेत! व असें हें सृष्टिनियमा-प्रमाणें झालेंच पाहिजे. ज्यांच्या ज्यांच्या शरिरांमध्यें अंतःकरणें आहेत, त्यांच्या त्यांच्या हातून अशीं कृत्यें झालींच पाहिजेत. जे जुने लोक झाडांच्या वाळ-लेल्या पानांप्रमाणें हल्लीं एकामागून एक गळून पडत आहेत, त्यांच्या शरीरांत अंतःकरणें नव्हतीं असें नाहीं. परंतु इंग्लिशांनीं स्वार्थासाठीं त्या अंतःकरणां-वरून अनेक कुकल्पनांचे इतके लेप दिलेले आहेत कीं, त्यामुळें त्या अंतःकरणां-

मध्यें खरे ईश्वरदत्त मनुष्यपणाचे गुण बिलकुल शिल्लक राहिलेले नाहींत. त्यांच्यांत अंतःकरणांचे धर्म शाबूत असते, तर त्यांना आपल्या लोकांचे हाल आणि आपल्या देशाचे अपमान खात्रीनें दिसले असते व त्यावर आपण काय उपाय केले पाहिजेत हेंही त्यांना खात्रीनें समजलें असतें. परंतु तशीं कांहीं चिन्हें त्यांच्या ठिकाणीं दिसत नसल्यामुळें तीं अंतःकरणविरहित शरीरें आहेत असेंच म्हणावें लागतें. परंतु नवीन उत्पन्न होणाऱ्या अंतःकरणांची गोष्ट तशी नाहीं. तीं मागच्या लोकांच्या अनुभवानें शहाणीं आणि पुढल्या सुखाच्या आशेनें उल्लसित झालेलीं आहेत. अशीं नवीन अंतःकरणें हिंदुस्थानांतील प्रत्येक भागांत पावसाळ्यांतील रोप्याप्रमाणें जिकडे तिकडे उगवत आहेत. त्यांच्यापासून लवकरच हिंदुस्थानचें कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं.

---

## शिवाजीसारखा नीच मनुष्य दुसरा कोणी नसेल ! : : २१

पिझॅरो हा स्पेन देशांतील एका शेतकऱ्याचा मुलगा होता. याला शिक्षण फारसें मिळालेलें नव्हतें व त्याचा लहानपणचा धंदा म्हटला म्हणजे बहुतेक मेंढरें राखण्याचाच होता. परंतु तो मोठा धाडसी होता, त्यामुळें तो सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं एका मोहिमेबरोबर अमेरिकेमध्यें गेला. तेथें आपल्या मुख्य सरदाराच्या हाताखालीं त्याच्या लढाया लढत असतां दक्षिण अमेरिकेमध्यें एक सुवर्णमय प्रदेश आहे, अशी वार्ता त्याच्या कानावर आली व तो प्रदेश आपण पाहावा आणि जमल्यास जिंकावा अशी महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न झाली हल्लीं पेरूच्या नांवानें जो देश प्रसिद्ध आहे तीच ही सुवर्णमय भूमि होय. तेथें पूर्वी अतिशय सोनें होतें. आणि म्हणूनच त्या ठिकाणाला युरोपियन लोक 'एलडोरॅडो' असें म्हणत असत. त्या प्रदेशाचा तपास करण्याकरितां

इ. स. १५२४ मध्यें पिझॅरोनें आपल्याबरोबर आणखी दोघे साथीदार घेऊन पनामा येथून एक मोहीम काढली. परंतु गलबतावरील खलाशांनीं बंड केल्यामुळें पिझॅरोला परत फिरावें लागलें. १५२६ मध्यें पिझॅरोनें पेरू देशाच्या शोधासाठीं दुसरी मोहीम काढली परंतु तीही सफळ झाली नाहीं. अखेरीस पेरूचें साम्राज्य जिंकून काबीज करण्याविषयीं स्पेनच्या राजाची परवानगी व मदत घेऊन पिझॅरो १५३१ मध्यें पनामा येथून आपल्याबरोबर तीन गलबतें, एकशेंच्यायशी शिपाई आणि सदतीस घोडे, इतकें साधन घेऊन निघाला, व १५३२ मध्यें पेरूच्या किनाऱ्यावर उतरून त्या प्रदेशाच्या मध्यभागाकडे जाण्याकरितां मे महिन्यामध्यें आपल्या सर्व सैन्यासह तो कूच करून निघाला. त्या प्रदेशाच्या आंत सुमारें तीस मैल गेल्यानंतर स्पॅनियर्ड लोकांनीं तेथें एक शहर बांधून सॅन मिग्युअल असें त्याचें नांव ठेविलें, व तें आपल्या लष्करी मोहिमेचें त्यांनीं मूळ ठिकाण केलें. नंतर तेथून आतां पुढें कसा हल्ला करावा, याविषयीं पिझॅरोनें विचार चालविला.

पेरूव्हियन साम्राज्याची ह्या वेळची स्थिति फार बिघडलेली होती. पूर्वीच्या राजाला हुआस्कर या नांवाचा एक औरस पुत्र होता. व अटाहुआल्पा हा त्याच्या एका रखेचा मुलगा होता. यांच्या बापानें पेरूच्या साम्राज्याचे जुना पेरूचा देश आणि क्वेटो असे दोन विभाग करून पहिला हुआस्कर याला व दुसरा अटाहुआल्पा याला दिला होता. राज्याची अशी वांटणी झाल्यामुळें ह्या दोन राजपुत्रांमध्यें अर्थातच आपसांत युद्ध सुरू झालें, व त्या युद्धांत अटाहुआल्पा यानें आपला भाऊ हुआस्कर याला पकडून आपल्या बंदीखान्यांत ठेवलें. अशा प्रकारचे भाऊबंदकीचे कलह पेरू देशामध्यें चालले असतां इतक्यांत तेथें पिझॅरोची स्वारी येऊन दाखल झाली. व सॅनमिग्युएल येथून निरनिराळ्या प्रकारचे सुमारें एकशें सत्याहत्तर लोक आपल्याबरोबर घेऊन तो पेरूचें राज्य जिंकण्याकरितां पुढें चाल करून निघाला. त्या वेळीं पेरू देशांतील लोकांची संख्या सुमारें एक कोटि होती, आणि तेथें लढाईच्या कामांत तरबेज असे शिपाई तर कित्येक लाख होते. इतक्या लोकांच्याविरुद्ध न्यायानें लढण्याकरितां आणि इतक्या लोकांच्या हातून त्यांचा देश न्यायानें आपल्या ताब्यांत घेण्याकरितां पिझॅरो आपल्याबरोबर एकशें सत्याहत्तर लोक घेऊन निघाला. असल्या मोहिमेमध्यें आपल्या जिवाला किती धोका आहे, याच्याबद्दलची कल्पना पिझॅरोच्या सैन्यां-

तील शिपायांच्या मनांत हळूहळू येऊं लागली, व ते पुढें जाण्याला जास्त जास्तच नाखूष होऊं लागले. ही गोष्ट पिझॅरोच्या कानावर आली. पिझॅरो हा इतर बाबतींत कसाही असो, परंतु त्याचें धैर्य आणि प्रसंगावधान अप्रतिम होतीं, यांत शंका नाहीं. पांचव्या दिवशीं त्यानें मुक्काम करून आपलें सगळें सैन्य आपल्यापुढें उभें केलें आणि त्यांना उद्देशून त्यानें असें सांगितलें कीं, "आपल्यावर यापुढें येणारीं संकटें फारच भयंकर आहेत, परंतु आपल्या कामांत यश आलें तर आपल्याला बक्षीसही फार मोठें मिळणार आहे अशी स्थिति आहे. अशा स्थितींत माझ्याबरोबर येण्याविषयीं मी कोणालाही आग्रह करीत नाहीं. फक्त जे खरे शूर असतील तेच माझ्याबरोबर येतील.' त्यानें असें भाषण केल्याबरोबर त्याच्या असंतुष्ट झालेल्या शिपायांना माघारें वळण्याची लाज वाटूं लागली; व आपण नामर्द ठरूं या कलंकाच्या भीतीनें बहुतेक सर्वजण पुढें जाण्याला तयार झाले. हें सैन्य अशा रीतीनें आपल्या मुलखावर चाल करून येत आहे, ही बातमी अटाहुआल्पा याला कळली, तेव्हां त्यानें आपल्या वकिलाबरोबर, तुम्ही पुढें येऊं नये, जेथं असाल तेथेंच थांबून तेथून तुमचें काय म्हणणें असेल तें कळवावें असा निरोप पाठविला. परंतु आपला जिवलग स्नेही अटाहुआल्पा याला भेटण्यासाठीं पिझॅरोला अतिशय उत्कंठा लागली होती! त्यामुळें त्याच्या वकिलांची आज्ञा अमान्य करूनही तो तसाच पुढें चालला. १५३२ च्या नोव्हेंबर महिन्यांत अखेरीस हें सैन्य एका मोठ्या पर्वताजवळ आलें. त्या पर्वतावरून एक अतिशय अवघड वाट होती, परंतु त्या वाटेनें गेल्यानेंच इंका म्हणजे पेरू देशाचा राजा, अटाहुआल्पा याची गाठ पडण्यासारखी होती. तो डोंगरांतील रस्ता अतिशय बिकट होता. पिझॅरोच्या वयाला साठ वर्षे उलटून गेलेलीं होतीं. व त्याच्याबरोबर फक्त चाळीस घोडे आणि साठ माणसें शिल्लक राहिलीं होतीं. अशा जरी अनेक अडचणी होत्या, आणि इतकीं जरी थोडीं माणसें शिल्लक राहिलीं होतीं तरी पिझॅरोच्या अंतःकरणांतील धैर्य कायम होतें. त्यामुळें पुढाऱ्याची हिंमत पाहून त्याच्या निराश झालेल्या अनुयायांना धैर्य आलें. आणि त्यांनीं आपला प्रवास नेटानें चालविला. अखेरीस ते लोक त्या पर्वताच्या शिखरावर येऊन पोंचले. तेथें आल्यावर त्यांना जो आनंद झाला, त्याचें वर्णन करणें कठीण आहे. तेथून त्यांना ती सुवर्णमय भूमि दिसूं लागली. ती सुपीक जमीन, निरनिराळ्या धान्यांनीं सुशोभित झालेला तो प्रदेश, तेथील तीं रम्य घरें, वगैरे

देखावा पाहून त्यांना आपल्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटलें. त्या पर्वताच्या पायथ्याशींच कॅक्सामार्का या नांवाचें एक रमणीय शहर वसलेलें होतें. त्या शहराची तटबंदी फार मजबूत होती. व तेथील लोकसंख्या सुमारें दहा हजार होती. त्या शहराच्यापुढें एक नदी वाहत असून तिच्यावर एक सुंदर पूल बांधलेला होता. व त्या पुलाच्या पलीकडे त्या डोंगराच्या उतरणीवरच हजारों पांढरे शुभ्र तंबू जिकडे तिकडे पसरलेले दिसत होते व या ठिकाणींच अटाहुआल्पाची मुख्य लष्करी छावणी होती. त्या छावणींत तो त्या वेळीं आपल्या पन्नास हजार शिपायांसह राहत होता. हा एवढा विस्तार पाहून पिझॅरोचे लोक थक्क होऊन गेले. परंतु पिझॅरो तसाच पुढें चालला व संध्याकाळच्या वेळीं तो आपल्या सर्व लोकांसह कॅक्सामार्का या शहरांत शिरला. त्या वेळीं तें सर्व शहर ओसाड होते व अटाहुआल्पाच्या सैन्यांतील लोक तेथून बरेच दूर होते. अशी संधि पाहून पिझॅरोनें आपले सगळे लोक त्या शहराच्या मुख्य ठिकाणीं नेले. तेथील घरें एकमजली, परंतु मजबूत दगडांचीं बांधलेलीं होतीं, व तेथून जवळच एक किल्ला होता. तीं घरें व तो किल्ला तावडतोब आपल्या ताब्यांत घेण्याविषयीं पिझॅरोनें आपल्या लोकांना हुकूम केला. कांहीं लोक रस्त्याची नाकेबंदी करण्याकरितां नेमले. त्यांच्याबरोबर कांहीं तोफा होत्या त्या किल्ल्यावर चढविण्यांत आल्या. जिकडे तिकडे पहारे बसविले, व शत्रूचा हल्ला आला, तर आपल्याला आपलें संरक्षण करितां यावें अशी पिझॅरोनें तयारी केली. इतकें झाल्यानंतर पिझॅरोनें आपल्या येण्याची वर्दी देण्याकरितां डी सोटो आणि हरनँडो या दोघांना चाळीस घोडेस्वारांनिशीं अटाहुआल्पाच्या छावणीमध्यें पाठवून दिलें. त्या वेळीं अटाहुआल्पा हा आपल्या छावणींत आपल्या अंगावर फार मौल्यवान् वस्त्रें घालून आपल्या सरदारांशीं बोलत बसलेला होता. व हातांत तरवारी, भाले, बाण, गोफणी, गदा वगैरे हत्यारें घेऊन हजारों शिपाई त्याच्या संरक्षणाकरितां त्याच्या सभोंवार होते. अटाहुआल्पाच्यापुढें पिझॅरोच्या वकिलानीं नम्रपणानें मुजरा करून आपली हकीकत सांगितली. परंतु त्यानें तिकडे विशेषसें लक्ष दिलें नाहीं. व त्यांनीं बरेच वेळां आपली हकीकत सांगितल्यानंतर मी उद्यां येऊन तुमचें काय म्हणणें आहे तें ऐकून घेईन, असा त्यांना अत्यंत तिरस्कारानें त्यानें जबाब दिला. तेव्हां बरेच निराश होऊन डी सोटो आणि हरनँडो हे कॅक्सामार्काच्या चौकामध्यें परत आले. आपण चालविलेल्या शिष्टाई-

चा कांहीं फारसा उपयोग होत नाहीं असें पाहून पिझॅरोलाही फार वाईट वाटलें, व आतां पुढें काय करावें याचा पिझॅरो आपल्या साथीदारांसह त्या रात्रीं खल करण्याकरितां बसला. बराच वेळ विचार केल्यानंतर अखेरीस त्यांनीं एक निश्चय कायम केला व त्याप्रमाणें सकाळीं उठल्याबरोबर ते सर्वजण आपापल्या तयारीला लागले. किल्ल्यावर ज्या तोफा ठेविल्या होत्या, त्यांचा रोख अटाहुआल्पाच्या छावणीवर होता. परंतु प्रसंग येईल तेव्हां कॅक्सामार्काच्या चौकावरही त्यांचा मारा व्हावा अशी योजना करण्यांत आली. डी सोटो आणि हरनँडो यांनीं घोडेस्वारांच्या दोन तुकड्या करून चौकाच्या पलीकडची बाजू रोखून धरली. पायदळांतील लोकही माऱ्याच्या जागा पाहून निरनिराळ्या ठिकाणीं घरांतून गुप्तपणें बसविण्यांत आले व सगळ्यांतील अगदीं निवडक असे वीस लोक पिझॅरोनें आपल्या हाताखालीं ठेविले. प्रत्येकाचीं हत्यारें बरोबर आहेत किंवा नाहींत, त्यांची माऱ्याची जागा ठीक आहे किंवा नाहीं, वगैरे सर्व लहान मोठ्या गोष्टींकडे खुद्द पिझॅरोनें पूर्ण लक्ष देऊन अटाहुआल्पाच्या आगतस्वागतासाठीं कडेकोट तयारी केली. पेरूव्हियन लोकांचा राजा अटाहुआल्पा हा सकाळींच शहराच्या चौकांत येईल असा अदमास होता, परंतु राजा निघण्याच्या तयारीची गडबड त्या पेरूव्हियन छावणीमध्यें सकाळच्या प्रहरीं कांहींच दृष्टीस पडेना. त्यामुळें राजाचें आदरातिथ्य करण्याकरितां टपून बसलेल्या ह्या स्पॅनियर्ड लोकांची बरीच निराशा झाली. परंतु अखेरीस तिसरे प्रहरीं राजाची स्वारी शहराकडे येण्याकरितां निघाली, परंतु शहराच्या तटाबाहेर येऊन तेथेंच स्वारी थांबली. त्यामुळें स्पॅनियर्ड लोक फारच त्रासून गेले. सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपल्या सावजाची वाट पाहत छपून बसणें, व आपली शिकार आतां येईल, घटकेनें येईल, असें वाटून फिरून प्रत्येक क्षणीं निराश होणें, अशा प्रकारची मनाची स्थिति किती त्रासदायक असते याची कल्पना ज्यांनीं तसलीं कामें कधीं केलीं नाहींत त्यांना बिलकुल करतां यावयाची नाहीं. शहराच्या बाहेर थांबून तेथून अटाहुआल्पा यानें पिझॅरोस असा उलट निरोप पाठविला कीं, मी आज येत नाहीं, उद्यां येईन. परंतु अशानें पिझॅरोच्या बेताची सगळीच घडी उसकटत होती. तेव्हां त्यानें तावडतोब असा निरोप पाठविला कीं, " आपण मेहेरबानी करून आतांच यावें. मीं आपल्याकरितां मेजवानीची तयारी केली आहे व संध्याकाळीं माझ्या येथें आपलें उच्छिष्ट

पडावें, अशी माझी इच्छा आहे, आपण माझे मित्र व बंधु आहां. तेव्हां आपण आतांच जरूर येण्याचें करावें.' असा निरोप गेल्यामुळें अखेरीस सूर्यास्ताच्या सुमारास बऱ्याच मोठ्या लवाजम्यानिशीं इंकानें शहराच्या चौकांत प्रवेश केला. इंका अटाहुआल्पा हा एका सोन्याच्या सिंहासनावर विराजमान झालेला होता. व तें सिंहासन आपल्या खांद्यावर घेऊन त्याचे वाहक चालले होते. त्याच्या अंगावरील वस्त्रें आणि अलंकार यांचें तेज चोहोंकडे पसरलें होतें, मोठाल्या आणि अतिशय तेजाच्या अशा इंद्रनील मण्यांची एक माळ त्याच्या गळ्यांत होती व आपल्या इकडे मुंडावळ्या बांधतात तशा प्रकारच्या मौल्यवान् रत्नांच्या माळा त्याच्या मस्तकावरून खालीं लटकत होत्या. सोनें, मोतीं, हिरें, माणिक, पोंवळीं, इंद्रनील, पाच, पुष्पराग, वगैरे सर्व प्रकारच्या मौल्यवान जिनसांनीं त्याच्या शरीरावर गर्दी करून सोडली होती. राजाप्रमाणेंच त्याच्या सभोंतालचे सरदार आणि मानकरी यांच्या अंगावर फार उंची प्रकारचे दागदागिने आणि पोशाख होते. राजाच्या स्वारीपुढें भालदार, चोपदार आणि हलकारे चालले होते, व मागून रत्नांच्या तेजानें प्रेक्षकांची दृष्टि दिपवून टाकणारी ही राजाची स्वारी चालली होती. अशा थाटानें इंका अटाहुआल्पा शहराच्या चौकांत येऊन दाखल झाला. परंतु तो चौक अगदीं शून्य असा त्याच्या दृष्टीस पडला. त्याचें आगतस्वागत करण्याकरतां उत्सुक झालेले स्पॅनियर्ड त्याला कोणीही तेथें दिसले नाहींत. किल्ल्यावर संत्री शिपाई मात्र पहारा करीत इकडे तिकडे फिरत होते.

पिझॅरोच्या सैन्याबरोबर व्हाल्व्हर्ड या नांवाचा एक ख्रिस्ती धर्मोपदेशक होता व फेलिपिलो या नांवाचा एक दुभाष्या होता. इंकाची स्वारी चौकांत येऊन दाखल झाल्यानंतर पिझॅरोनें ही जोडगोळी प्रथमतः पुढें सोडली. फादर व्हालवर्ड बाहेर येऊन त्यानें नम्रपणानें राजाला मुजरा केला व आपल्या अनुपम अशा ख्रिस्ती धर्मांतील मुख्य तत्त्वें त्याच्यापुढें मांडून तुम्ही धार्मिक बाबतींत पोपचा अधिकार मान्य करावा आणि राजकीय बाबतींत स्पेनचा राजा पांचवा चार्लस याचा अधिकार मान्य करावा, अशी सविनय प्रार्थना केली. फेलिपिलो या दुभाष्याच्या भाषांतरावरून इंकाची अशी समजूत झालेली होती कीं, ख्रिस्ती लोकांमध्यें ट्रिनिटी म्हणजे बाप, मुलगा, आणि होली घोस्ट, व पोप असे चार देव आहेत. या समजाला अनुलक्षून त्यानें फादर व्हालव्हर्ड याला असें

सांगितलें कीं, इतके चार देव घेऊन काय करावयाचें आहे? आम्ही या एका सूर्याची उपासना करतों, तीं आम्हांला पुरे आहे. तसेंच मी ह्या सगळ्या साम्राज्याचा अधिपति आहें. मी चार्ल्स वगैरे दुसरा कोणी ओळखीत नाहीं. असें म्हणून नंतर फादर व्हाल्व्हर्ड ज्या बायबलच्या पुस्तकांतून धर्मोपदेशाच्या गोष्टी सांगत होता तें पुस्तक इंकानें आपल्या हातांत घेतलें. तें एका पितळी कडीनें बंद केलेलें होतें म्हणून तें इंकाला उघडतां येईना. तेव्हां तें कसें उघडावयाचें हें दाखविण्याकरितां फादर व्हाल्व्हर्ड हा पुढें जात होता. इतक्यांत त्याला झिडकारून मागें सरण्याविषयीं सांगून इंकानें त्या बुकाचें कव्हर फाडलें आणि कांहीं पानें उलटून पाहून त्यानें तिरस्कारानें तें दूर फेंकून दिलें व तो असें म्हणाला कीं, "तुम्हीं माझ्या मुलखांत येऊन काय काय गोष्टी केल्या आहेत, या सगळ्यांची वर्दी तुम्हीं मला दिली पाहिजे. व तुम्ही येथें येऊन माझ्या राज्यांत जें कांहीं नुकसान केलें असेल तें सगळें भरून देई-पर्यंत मी येथून हलणार नाहीं." अशी त्यांना ताकीद देऊन तो आपल्या सरदार लोकांशीं बोलत बसला. इकडे फादर व्हाल्व्हर्ड यानें ते बायबलचें पुस्तक उचलून घेतलें आणि पिझॅरोजवळ जाऊन तो म्हणाला, "अरे पिझॅरो, तूं बघतोस काय? हा कुत्रा मोठा गर्विष्ठ आहे. याच्याशीं बोलत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपण ह्याच्याशीं फुकट बोलत बसलों आहों, तों तिकडे याच्या मदतीला येणाऱ्या इंडियन लोकांनीं हें सगळें मैदान भरून जात आहे. आतां तूं वाट किती वेळ पाहणार? हं! एकदम त्यांजवर हल्ला कर. तुझ्या हातून या कामीं जीं जीं पातकें घडतील त्या सगळ्या पातकांतून मीं तुला मुक्त केलें आहे. तूं बेलाशक यांच्यावर चालून जा!" अशा रीतीनें ख्रिस्तीधर्माच्या बळावर सर्व पापांपासून मुक्ततेची पावती अगाऊ पिझॅरोच्या हातांत पडतां-क्षणींच मग काय विचारतां? पिझॅरो एकदम पुढें आला व त्यानें आपल्या अंगावरील पांढरा शेला वर फेकून इशारत दिली. त्यावरोबर किल्ल्यावर ज्या तोफा डागलेल्या होत्या, त्यांच्यामधून भयंकर गर्जना होऊं लागल्या, व तेथून चौकांतील लोकांवर गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. इकडे तोफांना सरवत्ती मिळाल्याबरोबर चौकांतील घरांतून जे शिपाई दडून बसले होते ते हातांत नागव्या तलवारी आणि भाले घेऊन चौकांतील लोकांवर तुटून पडले. त्याचप्रमाणें डी सोटो आणि हरनँडो यांच्या हाताखालील घोडेस्वारांच्या

पलटणीही तेथें चालून आल्या व त्यांनीं तेथील लोकांची दाणादाण उडवून दिली. एकाएकीं जसें एखादें वादळ उद्‌भवतें, त्याप्रमाणें कांहीं मागमूस नसतां हा हल्ला झालेला पाहून इंकाच्या बरोबरचे लोक अगदीं घाबरून गेले व त्यांचा कांहीं उपाय चालेनासा झाला. पिझॅरो आपल्याबरोबर आपले निवडक वीस लोक घेऊन वाटेंतील इंडियन लोकांची कत्तल करीत अटाहुआल्पा याचा मेणा जेथें होता तेथपर्यंत गेला व तो मेणा ज्यांनीं उचलून धरला होता त्यांना कापून काढून त्यानें अटाहुआल्पाला जमिनीवर पाडलें. तो जमिनीवर पडल्यावर पिझॅरोनें त्याला आपला कैदी केलें. इंकाची अशा प्रकारची दशा झाल्यानंतर त्या इंडियन लोकांचें धैर्य अगदींच खचून गेलें व ते चोहोंकडे सैरावैरा पळत सुटले; परंतु त्यांपैकीं बहुतेकांची स्पॅनिअर्ड लोकांनीं तेथल्या तेथेंच कत्तल करून टाकली. ही सगळी लढाई अर्ध्या तासाच्या अंतरामध्येंच आटपली. परंतु तेवढ्या अवकाशांत स्पॅनिअर्ड लोकांनीं कॅक्सामार्काच्या चौकांत सुमारें दहा हजार पेरूव्हियन लोकांचीं डोकीं कापलीं. इतकें झालें तरी स्पॅनिअर्ड लोकांकडील एकही मनुष्य नुसता जखमी झाला नाहीं, आणि तीस मिनिटांच्या अवकाशांत पेरूव्हियन साम्राज्यासारखें विस्तृत आणि सुवर्णमय साम्राज्य आणि तेथील इंका अटाहुआल्पा हीं दोन्ही पिझॅरोच्या हातांत आलीं. शिवाजी! शिवाजी! तूं किती विश्वासघातकी! किती लबाड! किती खोटें बोलणार! अफझुलखानाला सलोख्याच्या भेटीसाठीं म्हणून प्रतापगडच्या डोंगरावर बोलाविलेंस! याच्यापेक्षां तेथील देवीच्या देवळांत त्याला मेजवानीला कां बोलावलें नाहींस! विश्वासघात करणें आणि एखाद्याचा गळा कापणें हें देवाच्या घरीं पातक आहे, हें तुझ्या कधीं स्वप्नींही कसें आलें नाहीं किंवा असल्या अघोर पातकाचे गुन्हे तुला माफ आहेत, असें तुला कोणी सर्टिफिकीट देईपर्यंत अफझुलखानाच्या सैन्याची कत्तल करण्याला तुझा हात वाहिला तरी कसा? चोरून हातांत वाघनखें घातलीं होतीस! आणि प्रतापगडच्या जंगलांत आपले मावळे दडवून ठेविले होतेस! त्याच्यापेक्षां लोकांच्या रिकाम्या घरांतून तूं आपले शिपाई कां बसविले नाहींस! शिव! शिव! विश्वासघातासारखें पातक नाहीं! आणि ख्रिस्तीधर्मासारखा धर्म नाहीं किंवा ख्रिस्ती लोकांसारखे लोक नाहींत!

पिझ्झेरोच्या तुरुंगांत अटाहुआल्पा जाऊन पडल्यानंतर आतां आपण पुढें काय करावें, हे त्या मूर्ख पेरूव्हियन लोकांपैकीं कोणालाही कळेना. व ते सर्व लोक मेंढरांप्रमाणें स्पॅनिश लोकांच्या कोंडवाड्यांत शिरले. फक्त अटाहुआल्पाचे प्रयत्न सुरू होते. अशा वेळीं आपला भाऊ हुआस्कर हा स्पॅनिश लोकांच्या हातीं लागला तर त्यापासून फार वाईट परिणाम होतील असें मनांत आणून अटाहुआल्पानें त्याचा खून करविला, व पिझ्झेरोच्या तुरुंगांतून सुटण्याचा त्यानें उपाय चालविला. स्पॅनिश लोकांना सोन्याची फार चटक आहे, हें अटाहुआल्पा याला कळून चुकलें होतें. व पेरूदेशामध्यें सोन्याला कांहीं तोटा नव्हता. तेव्हां जर मला बंधमुक्त कराल तर मला ज्या कोठडींत कोंडलें आहे, ती सगळी कोठडी माझ्या डोक्याइतकी उंच मी तुम्हांला सोन्यानें दोन महिन्यांच्या आंत भरून देईन, असें त्यानें बोलणें सुरू केलें. त्या खोलीची लांबी रुंदी आणि वर सांगितलेली उंची यांचें घनफळ सुमारें एकशें पंचवीस घनयार्ड इतकें होतें. इतकें खोलीभर सोनें आपल्याला मिळत आहे असें पाहून पिझ्झेरोच्या तोंडाला पाणी सुटलें, व उभयपक्षांमध्यें लेखी करारनामा झाल्यानंतर इंकानें आपल्या राज्यांतील सोन्यानें ती खोली भरून काढण्याचा हुकूम केला. तेव्हांपासून सोनें तेथें आणून टाकणाऱ्या इंडियन लोकांची एकसारखी रांग लागली. पेरू देशांतील लोकांना सोन्याचा विधिनिषेधच नव्हता, त्यामुळें त्यांना त्याचें कांहींच वाटलें नाहीं. परंतु युरोपांतून आलेल्या ह्या भुकेकंगाल ख्रिस्ती लोकांनीं बापजन्मींही इतकें सोनें कधीं पाहिलें नसल्यामुळें त्यांचे डोळे दिपून गेले व त्यांना मोठा आनंद झाला. त्या खोलींत जें सोनें आणून भरलें त्यांत कित्येक सोन्याच्या बनविलेल्या कारागिरीच्या जिनसाही होत्या. झाडें आणि प्राणी यांच्या सोन्याच्या प्रतिमा त्यांत होत्या. जेवण्याचीं सोन्याचीं ताटें आणि देवळें व राजवाडे ह्यांजवर घालावयाचीं सोन्याचीं कौलें, यांना तर गणतीच नव्हती. व जेथें सोन्यालाच इतका ऊत आलेला होता, तेथें चांदीला कोणीही विचारीत नव्हतें. ह्या सगळ्या मिळालेल्या सोन्यापैकीं पुष्कळसा भाग आपल्याला ठेवून बाकीचा पिझ्झेरोनें आपल्या शिपायांना वांटून टाकला, कारण पिझ्झेरो तरी एकटा इतकें सोनें घेऊन काय करणार होता ! या वेळीं ज्याच्या वांटणीला अगदीं थोडें सोनें आलें होतें त्यांना देखील तें जड झालें. व त्या सोन्याचें ओझें बाळगण्याची पंचाईत पडूं लागल्यामुळें पूर्वीं ज्यांचें देणें देणें होतें ते एकमेकांपाशीं तें मागेनासे झाले. ज्यांना दिलें

तर वाळगावें कसें, हेंच कोणाला कळेना. त्यामुळें धनको आणि रिणको हा संबंध तेथें नष्ट झाला. मनुष्यांना सोनें इतकें जड झाल्यामुळें साहजिकपणेंच तें जनावरांच्याही वांटणीस येऊं लागलें. घोडयांचे नाल सोन्याचे आणि चांदीचे झाले. व चांदी तर इतकी स्वस्त झाली कीं, तिच्यापेक्षां लोखंडाला जास्त किंमत पडूं लागली. अशा प्रकारची अतोनात संपत्ति स्पॅनिश लोकांच्या हातीं येऊन इंका अटाहुआल्पा यानें कबूल केलेली अट पुरी झाली; परंतु तिच्याबरोबर त्याच्या बंदीवासाची मुदत मात्र पुरी झाली नाहीं. थोडयाशा अवकाशांत जो इतकें सोनें जमा करूं शकतो तो मनुष्य आपण जिवंत बाहेर सोडला तर तो आपला केव्हां तरी घात केल्यावांचून राहणार नाहीं, अशी पिझॅरोला भीति पडली. व त्यासाठीं अटाहुआल्पानें अनेक गुन्हे केलेले आहेत, त्याबद्दल त्याची न्यायाच्या कोर्टांत चौकशी झाली पाहिजे, अशी ओरड आपल्या शिपायांच्या तोंडून उत्पन्न करवून आपण बनविलेल्या कोर्टापुढें अटाहुआल्पाच्या देशांत येऊन आणि अटाहुआल्पाचें राज्य बळकावून फिरून त्याचाच न्याय निवडण्याचा घाट पिझॅरोनें घातला. शिवाजी ! एखाद्याच्या पोटांत वाघनखें खुपसून त्याचा कोथळा बाहेर काढणें याच्यासारखें महत्पाप कोणतेंही नाहीं ! न्याय ! न्याय ! सर्व कांहीं न्यायानें झालें पाहिजे ! विश्वासघात म्हणजे अत्यंत निमकहरामपणाचें कृत्य होय !

पिझॅरोच्या कारस्थानाप्रमाणें सर्व गोष्टी जुळून इंका अटाहुआल्पा याची चौकशी सुरू झाली. त्याजवर बारा आरोप ठेवण्यांत आले होते. हे आरोप लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. इंकानें आपल्या भावापासून गादी बळजबरीनें हिसकावून घेतली हा त्यावर पहिला आरोप, आणि त्याची चौकशी इंकाची गादी ज्यांनीं बळकावून घेतली ते स्पेनचे लोक करणार ! इंकानें आपल्य भावाचा खून केला हा दुसरा आरोप, आणि त्याची चौकशी इंकाचे हजारों लोक ज्यांनीं विनाकारण मारले ते करणार ! स्पॅनिश लोक पेरू देशांत आल्यापासून इंकानें सार्वजनिक पैसा फार उधळला हा तिसरा आरोप, आणि त्याची चौकशी माशांनीं, तोळ्यांनीं, शेरांनीं नव्हे, तर घनफुटांनीं, घनयार्डांनीं आणि खोल्यांनीं मोजून सोनें इंकापासून उपटणारे स्पॅनिश लोक करणार ! तो मूर्तिपूजक आहे, व्यभिचारी आहे, एकाच वेळीं अनेक बायकांशीं लग्न लावणारा आहे, असेही त्याच्यावर आरोप होते. परंतु सगळ्यांत मुख्य आणि शेवटचा

आरोप असा होता कीं, तो स्पॅनिअर्ड लोकांच्या विरुद्ध बंड उत्पन्न करीत होता ! मूळचा कांहीं एक हक्क नसतां अन्यायानें पेरू देशांत शिरून आणि अत्यंत विश्वासघातकीपणानें इंकाला पकडून व त्याच्या लोकांची कत्तल करून ज्यांनीं पेरूव्हियन साम्राज्य दडपलें ते हा आरोप इंकावर करणार आणि ते ह्या आरोपाबद्दल इंकाची चौकशी करणार, ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे ! आतां कदाचित् हिंदुस्थानांतील वाचक असें म्हणतील कीं, असल्या गोष्टी आम्हांला शेंकडों ठाऊक आहेत, व असले आरोप, असल्या चौकश्या आणि असले न्याय आम्हीं पुष्कळ पाहिले आहेत. परंतु असलीं उदाहरणें त्यांच्या डोळ्याखालून पुष्कळ गेलेलीं असलीं तरी राजकीय आरोप आणि चौकशी यांची कायदेशीर वाढ कसकशी होत गेली, वगैरे शास्त्रीय प्रश्न समजण्याला वरील माहिती उपयोगी पडण्यासारखी असल्यामुळें तिचा थोडक्यांत उल्लेख केलेला आहे.

अशा रीतीनें एकंदर आरोप बनवून झाल्यानंतर त्या सर्व आरोपांची चौकशी करण्याकरितां अर्थातच न्यायाधीशही बनविण्यांत आले. त्यांच्यापैकींच कांहीं स्पॅनिश लोक खुर्चीवर बसले आणि न्यायाधीश झाले ! व त्यांच्यापुढें इंकाला आणून उभे करण्यांत आले आणि तो आरोपी झाला ! लागलीच चौकशी झाली आणि आटाहुआल्पा अपराधी ठरला. देहान्तशासनाची शिक्षा झाली. आणि न्यायाधीश टिफिनीकरितां उठून गेले ! इकडे गळ्याला फांस लागण्याची वेळ आली तरी आटाहुआल्पा "मीं काय केलें आहे, किंवा माझ्या मुलांनीं काय केलें आहे !" असें डोळ्यांत पाणी आणून विचारीतच होता; जणू काय शिक्षा होण्याला कांहीं करावेंच लागत असतें ! आटाहुआल्पा पिझॅरोकडे वळून म्हणाला, "पिझॅरो, तुला माझ्या लोकांनीं ममताळूपणानें वागविलें आणि मीं आपला सर्व खजिना तुझ्या चरणीं अर्पण केला, व माझ्यापासून उपकारांशिवाय तुला दुसरें कधीं कांहीं सहन करावेंच लागलें नाहीं; असें असून तुझ्या हातून मला ही शिक्षा मिळावी !" अशा त्यानें पुष्कळ विनवण्या केल्या, परंतु दगडाला पाझर फुटला नाहीं. आटाहुआल्पाची केविलवाणी भाषा ऐकून पिझॅरोनें आपल्या डोळ्यांतून पाणी काढून दाखविलें, परंतु अखेरीस जें करावयाचें त्याला तो चुकला नाहीं. शिवाजी ! शिवाजी ! तुझ्यासारखा कपटी कोणीही नसेल ! तुझ्या कपटाबद्दल कोण बोभाट ! असें कपट कधीं करूं नये !

१५३२ च्या मे महिन्यांत पेरू देशाला स्पॅनिश लोकांचे पाय लागले, आणि १५३३ च्या ऑगस्ट महिन्याच्या २९ व्या तारखेला तेथील इंकाची कायदेशीर चौकशी होऊन व देहान्तशासनाची शिक्षा ठरून सर्व बाटोळें झालें. सुमारें पंधरा महिन्यांच्या अवकाशांत सगळें पेरूव्हियन साम्राज्य रसातळाला जाऊन तेथील लोक स्पेनचे गुलाम झाले. इंकाची चौकशी सबंध दिवसभर चालू होती. व शिक्षा सांगितल्यावर ती बजाविण्यासाठीं सूर्यास्तानंतर दोन तासांनीं त्याला कॅक्सामार्काच्या चौकामध्यें नेलें. फांशीचे खांब मध्यभागीं पुरले होते व त्यांच्याभोंवती जंगी स्पॅनिश सैन्याचा गराडा होता. त्यांच्या पाठीमागें पेरूव्हियन लोक आपला राजा सुळावर चढत असतां बायकांसारखे मुळूमुळू रडत त्याच्याकडे पाहत होते. त्या वेळीं उजेडा-साठीं दिवट्या पेटविलेल्या होत्या त्यांच्या प्रकाशांतून हातापायांत बिड्या घालून इंकाला वधस्तंभाजवळ आणिलें. इंकाची इतकी जरी स्थिति झाली होती व त्याच्या सर्व अनुयायांनीं आणि ऐहिक वैभवांनीं जरी त्याला सोडिलें होतें, तरी फादर व्हालव्हर्ड हा त्याच्या जवळून हालला नाहीं ! त्यानें मरतांना ख्रिस्ती होऊन मरावें म्हणजे तो उत्तम गतीला जाईल, अशी सज्जनशिरोमणि फादर व्हालव्हर्ड यांची इच्छा होती. शिवाजी ! शिवाजी ! अशी धर्मश्रद्धा पाहिजे ! फादर व्हालव्हर्ड यांनीं त्याला बाटविण्याकरितां अनेक उपाय केले, परंतु तो ऐकेना. तेव्हां अत्यंत कृपाळु होऊन त्याला अखेरची आपल्या हातांतील जी मोठी कृपेची देणगी ती देण्याला ते तयार झाले. त्यांनीं त्याला सांगितलें कीं, 'वेड्या, तूं बाप्तिस्मा घेतला नाहींस तर तुला जिवंत जाळ-ण्यांत येईल. परंतु तूं जर बाटण्याला तयार होशील तर आम्ही तुझ्यावर मेहेरनदर करून तुला असें अभिवचन देतों कीं, आम्ही फक्त गळा दाबून तुझा जीव घेऊ.' हाय हाय ! शिवाजी केवढा क्रूर ! दुसऱ्याच्या पोटांत वाघनखें खुपसतो ! वाघनखांनीं काय काय वेदना होत असतील ! याच्या-पेक्षां गळा दाबण्याचा मृत्यु किती सुखकारक, मजेदार आणि गोड !

दुसरे कित्येक लोक दिलेलीं वचनें मोडतात त्याप्रमाणें आम्ही न मोडितां गळा दाबूनच तुझा जीव घेऊं, असें पिझॅरोनें शपथपूर्वक सांगितल्यावर आटाहुआल्पा कबूल झाला. नंतर त्याला ताबडतोब बाटविण्यांत आलें. व तो जॉन बाप्टिस्ट याचा दिवस असल्यामुळें त्या पवित्र दिवशीं बाटलेल्या आटाहुआल्पाचें

जॉन हेंच खिरश्चन नांव ठेवण्यांत आलें. अशा रीतीनें एका परधर्मी मनुष्याला स्वधर्मात घेऊन नंतर त्या खिरस्ती लोकांनीं आपल्या एका धर्मबांधवाचा गळा दाबून त्याला देहान्तशासन दिलें. व नंतर त्या जॉनच्या आत्म्याला शांति मिळविण्यासाठीं त्या सर्व स्पॅनिश खिरस्ती शिपायांनीं मनोभावानें व करुण-स्वरानें बायबलांतील स्तोत्रें गाऊन परमेश्वराची प्रार्थना केली ! त्या सैन्यांतील शिपाईसुद्धां धर्मशील ! शिवाजी, असल्या धर्मशीलपणाची तुझ्या अंतःकरणांत कल्पना तरी होती काय ? अरे, अफजुलखान हा मुसलमान होता आणि त्याला बाटविल्यावांचून तूं मारलेंस ! देवाच्या घरीं कांहीं न्याय आहे कीं नाहीं ! अफजुलखान तुला पारतंत्र्याची देणगी देण्याकरितां आलेला असून त्याच्यावर तूं हत्यार चालविलेंस, ह्याला काय म्हणावें ! त्यानें तुझा अपराध तरी काय केला होता ? त्यानें तुला आपलें साम्राज्य दिलें होतें, किंवा खोली भरून सोनें दिलें होतें ? त्या बापड्यानें केलें होतें तरी काय ? आणि न्यायावांचून वध म्हणजे शुद्ध खून होय. मेजवानीचें बोलावणें नाहीं, खंडोगणती सोनें नाहीं, न्यायाची चौकशी नाहीं, बाप्तिस्मा आणि उगीच एखाद्याचा खून, हा केवढा विश्वासघात !

( अफजुलखानासंबंधानें शिवाजीच्या वर्तनाच्या समर्थनाला पुष्कळ प्रमाणें समर्थ आहेतच. परंतु दुसऱ्याच्या खंडांत निव्वळ दरोडे घालून राज्याचे हक्कदार बनतात, असल्या खिरस्ती लोकांना श्रीशिवाजीमहाराजांसारख्या स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं स्वदेह झिजविणाऱ्या महात्म्याला निर्लज्जपणानें नांवें ठेवण्याला किती थोडा अधिकार आहे, हें दाखविण्याच्या कामीं वरील गोष्टीचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. )

---

मि. हर्बर्ट स्पेन्सर यांनीं दहाबारा वर्षांच्या पूर्वी जपानला जी एक कानगोष्ट सांगितली होती, ती आम्हीं गेल्याच्या मागील अंकीं दिलेलीच आहे. त्यांत स्पेन्सरसाहेबांनीं चव्हाटयावर आणलेली युरोपियन लोकांची लुच्चेगिरी हिंदुस्थान देशांतील लोकांना स्वानुभवावरून पूर्णपणें कळून चुकली असल्यामुळें त्यांना तिच्यांत कांहीं नवीन आहे असें नाहीं. तरी पण स्पेन्सरसाहेबांसारख्या हल्लींच्या काळांतील अत्यंत मान्य अशा तत्त्ववेत्त्याच्या तोंडून त्याच गोष्टीचा अनुवाद झाल्यामुळें तिला एक प्रकारचें विशेष महत्त्व आलेलें आहे. शिवाय स्पेन्सरसाहेब हे स्वतःही एक युरोपियनच असल्यामुळें त्यांच्या हातचें हें पत्र म्हणजे दुसऱ्यांच्या देशांवर दरोडे घालण्याचें आजपर्यंत काम करीत आलेल्या युरोपियन गुन्हेगारांचा हा एक कबुलीजबाबच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणखी स्पेन्सरसाहेबांचें हें पत्र लंडन टाइम्समध्यें प्रसिद्ध होऊन जरी बरेच दिवस लोटले आहेत, तरी त्याच्याविरुद्ध युरोपियन पक्षाभिमानी अशा कोणी वर्तमानपत्रांनीं युरोपियन लोकांची वकिली पतकरून फारसें कांहीं लिहिलेलें नाहीं. त्यामुळें गुन्हेगारांचा कबुली जबाब आणि बॅरिस्टरांचा मूकभाव ह्यावरून स्पेन्सरसाहेबांनीं उघडकीस आणलेला गुन्हा युरोपियन लोकांवर बहुतेक शाबीत झाल्यासारखाच झाला आहे.

परंतु अशा रीतीनें या युरोपियन गुन्हेगारांच्या तर्फेनें डिफेन्स देण्याकरितां मोठमोठे अॅडव्होकेट, बॅरिस्टर वगैरेपैकीं जरी कोणीही पुढें आलेले नाहींत, तरी त्यांच्या वतीनें भांडण्याला कोणीच नाहीं असें मात्र नव्हे. डिफेन्स देण्यासारखें कांहीं एक नसल्यामुळें जेथें चांगले कायदेपंडित माघार घेतात, तेथें एखादा भिकार वगल्या वकील ती केस हातांत घेतो. पोप नामक कवीनें

एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, जेथें शहाणे लोक पाऊल टाकण्याला धजावत नाहींत, तेथें शहाणपणा वांट्यास न आलेले लोक आंत घुसण्यासाठीं घाई करितात. प्रस्तुत युरोपियन लोकांचें ब्रीफ ज्ञानोदयानें घेतलें आहे! स्पेन्सर-साहेबांनीं जपानला उपदेश करितांना हिंदुस्थानचें उदाहरण दिलें आहे. त्या-संबंधानें ज्ञानोदयकारांचें असें म्हणणें आहे कीं, 'उदाहरण तर चोख आहे.' दिसण्यांत कांहीं कमी नाहीं. यांच्या बोलण्याप्रमाणें तंतोतंत तसेंच झालें आहे. या वाक्यांत युरोपियन लोकांच्यातर्फे डिफेन्स देण्याकरितां उठलेल्या वकिलांनीं आपल्या आरोपीवर आलेला आरोप सर्वस्वीं कबूल केला आहे. आतां ज्ञानोदय-कारांनीं हा आरोप कबूल केला म्हणजे त्यांत काय काय कबूल केलें, हें येथें प्रथमतः थोडक्यांत सांगून ठेवणें अवश्य आहे. इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थानांत व्यापाराच्या मिषानें प्रथमतः प्रवेश केला, आणि नंतर हिंदुस्थानांतील लोकांशीं कांहीं तरी खऱ्याखोट्या कुरापती काढून अन्यायानें, लबाडीनें आणि लुच्चे-गिरीनें त्यांनीं एकेक प्रदेश गिळंकृत केला. तसा प्रकार युरोपियनांनीं जपानांत करूं नये, म्हणून तुम्ही सावध असा, असा स्पेन्सरसाहेबांच्या बोलण्यांतील आशय आहे. व ह्या बोलण्याप्रमाणें "तंतोतंत तसेंच झालें आहे" असें खुद्द ज्ञानोदयकारांनीं आपल्याला सांगितलें आहे. आपण इंग्लिश लोकांना प्रामाणिकच समजत आहों. परंतु ज्ञानोदयसारख्या कडकडीत ख्रिस्तभक्तांनीं आणि सत्यप्रियांनीं, इंग्लिश लोक व्यापाराचें ढोंग करून हिंदुस्थानांत आले आणि लबाड्या करून हिंदुस्थानचे मालक झाले, असें सांगितल्यानंतर आपल्या राजनिष्ठेच्या मनोविकाराविरुद्धही क्षणभर आपल्याला तें खरें मानणें भाग पडत आहे, याबद्दल हिंदुस्थानांतील कोणत्याही मनुष्याला वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं.

परंतु आपण हिंदुस्थानांतील लोक पडलों अधर्मज्ञ! आम्हांला खरा धर्म नाहीं, किंवा खरा देव नाहीं. आमचे सगळे देव पडले लांकडाचे, दगडाचे नाहीं तर पितळेचे! असल्या धर्महीन लोकांना त्या जगन्नियंत्या परमे-श्वराच्या मनांत काय हेतु असतात, हें काय कळणार! ते कळण्याला ख्रिस्तीधर्मासारिखा धर्म लागतो! तसल्या धर्मांतला देव आणि तसल्या धर्माचे ख्रिस्ती लोक मिळाले म्हणजे ह्या सृष्टींतील अद्भुत रहस्यें व्यक्त होऊं लागतात! ख्रिस्ती लोकांनीं रविवारीं संध्याकाळीं आपल्या देवळांत डोळे

मिटले म्हणजे देव कोणत्या देशाबद्दल आपले काय हेतु आहेत याबद्दलची सगळी माहिती खिस्ती लोकांच्या कानांत सांगतो! तसल्या प्रकारची कांहीं तरी माहिती ज्ञानोदयाला निःसंशय मिळाली असली पाहिजे! असली देवाच्या हेतूविषयींची दिव्य माहिती स्पेन्सरसाहेबांनादेखील कळली नाहीं, ती तुम्हां-आम्हां धर्मनष्ट लोकांना कोठून कळणार! कारण ज्ञानोदयानें असें म्हटलें आहे कीं, "परंतु हा बोध करितांना स्पेन्सरसाहेब एक मूळ तत्त्व चुकले. परमेश्वर सर्व सृष्टीचा मालक आहे व त्याचा अधिकार जसा सर्व जगावर आहे तसा हिंदुस्थानवरही पूर्णपणें चालत आहे.......त्याच्या मनांत आलें कीं, हा देश परकीयांच्या ताब्यांत जावा, म्हणूनच तो आज ब्रिटनच्या अमलाखालीं आहे......हिंदुस्थानची सेवा ब्रिटनकडून घडावी व हिंदुस्थानचें अधिक कल्याण व्हावें, हा ईश्वरी संकेत उघड दिसत आहे. ब्रिटनकडून हिंदुस्थानला न्याय मिळावा, हा ईश्वरी संकेत आहे, आणि पूर्वी कोणत्याही प्रभूच्या राज्यांत हा देश इतका स्वस्थ नव्हता, अशी स्थिति त्याला प्राप्त झालेली आहे...... ह्या सर्वांवरून हिंदुस्थानचे कल्याणासाठीं हा परक्या लोकांच्या अधिकाराखालीं जाऊं दिला, हें उघड आहे. वरील लाभापेक्षांही अधिक महत्त्वाचा लाभ हिंदुस्थानला इंग्रजांकडून प्राप्त झाला आहे; तो हा कीं, या देशांत स्वदेशाभिमानाचें खरें वारें विलक्षण वाढत चाललें आहे. पूर्वी कधीं नव्हता इतका तो आतां जागृत दिसत आहे. या अभिमानाला चांगलें वळण मात्र लागावयाचें आहे. ह्या सर्व गोष्टी चांगल्या रीतीनें जमून आल्या म्हणजे हिंदुस्थानचें आणखी कल्याण काय राहिलें आहे? हिंदुस्थान आपला कारभार पाहण्यापुरता तयार झाला तर तोच परमेश्वर त्याला स्वतंत्रता देईल, यांत संशय नाहीं. इंग्रज लोकांस हिंदुस्थान देवानें विकला नाहीं, तर तो त्याच्याच कल्याणासाठीं कांहीं दिवस त्यांच्या सहवासांत दिला आहे." व्यापारासाठीं म्हणून येऊन हिंदुस्थानचें राज्य इंग्लिशांनीं लबाडया करून घेतलें असें जें स्पेन्सरसाहेबांचें म्हणणें आहे तें ज्ञानोदयालाही कबूल आहे. परंतु इंग्लिशांनीं अशा लबाडया कां केल्या, याचें तत्त्व स्पेन्सरसाहेबांना कांहीं एक कळलेलें नाहीं! त्यांतील कारण आतां असें बाहेर आलें आहे कीं, हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या ह्या लबाडयांमध्यें खुद्द परमेश्वराचेंही अंग होतें. एके दिवशीं त्याच्या मनांत आलें कीं, हा हिंदुस्थान देश परकीयांचे ताब्यांत

जावा ! व दुसरे एके दिवशीं सकाळीं चहा पीत असतांना त्याला असें वाटलें कीं, हा देश इंग्लिशांच्याच ताब्यांत जावा ! तेव्हां इंग्लिशांना अशी चिंता पडली कीं आपण पडलों प्रामाणिक, न्यायी आणि सत्यशील ! आपल्या हातून दुसऱ्याचा देश घेण्याचें काम व्हावें कसें ! असें वाटून त्यांनीं 'देवापाशीं' पुष्कळ रदबदली केली ! परंतु देव ऐकेनाच ! तेव्हां निरुपाय होऊन हिंदुस्थान आपल्या ताब्यांत घेण्याची देवाची आज्ञा त्यांना मान्य करणें भाग पडलें ! तरी पण त्यांनीं आपल्यां मनाचा समतोलपणा, न्यायीपणा आणि सत्यशीलपणा कधींही ढळूं दिला नाहीं, व केवळ परमेश्वरासाठीं त्यांनीं हिंदुस्थानांत लबाडया केल्या ! ईस्ट इंडिया कंपनीमधील पहिल्या अमदानींतील युरोपियन नोकर किती सरळ आणि किती सच्चे ! पण विचाऱ्यांना केवळ परमेश्वराच्या मुर्वतीसाठीं नेटिव लोकांना छळून त्यांच्यापासून लांच घेणें भाग पडलें ! क्लाइव्हसाहेबासारखा धर्मबुद्धीचा पुरुष लाखांत एक ! पण काय करणार ! त्या धर्मराजालाही केवळ देवाच्या भिडेसाठीं एक खरा व एक खोटा असे दोन दस्तऐवज करणें भाग पडलें ! हेस्टिंग्जसाहेबांची न्यायीपणामध्यें बरोबरी खरोखर फारच थोडयांना करितां येणार आहे ! पण या प्रसंगीं ते देखील विचारे या देवाच्या भिडेमुळेंच सर्वस्वीं नाडले गेले ! आणि केवळ असल्या लहरी परमेश्वराला खूष ठेवण्यासाठीं त्यांनीं अनाथ बेगमांवर जुलूम करून आपल्याला गबर करून घेतलें ! अशीं इंग्लिश महात्म्यांचीं एक-दोन म्हणून नांवें सांगावींत कीं काय ? हिंदुस्थानांत जो साहेब आला तो महात्माच आणि धर्मात्माच ! पण विचारे करतात काय ! देवाच्या इच्छेपुढें मनुष्याचें काय चालतें ! सबब सगळ्यांनीं केवळ देवाची मर्जी राखण्यासाठीं यथाशक्ति व यथाबुद्धि लबाडया केल्या ! परंतु पुढें देवाला असें वाटूं लागलें कीं, हिंदुस्थान देश फार अफाट आणि लबाडी करण्याच्या कामांत इंग्लिशांची बुद्धि अगदीं कोती ! तेव्हां आपल्या लोकांपैकीं प्रत्येकानें लहानलहान लबाडया करून हिंदुस्थान देश इंग्लिशांच्या ताब्यांत जाण्याला हजार वर्षेंदेखील पुरावयाचीं नाहींत ! तेव्हां हें कांहीं उपयोगी नाहीं. असा विचार मनांत आणून इ. स. १८४८ मध्यें देवानें लॉर्ड डलहौसी यांना हिंदुस्थानांत पाठविलें. तेही मूळचे पापभीरूंपैकींच ! पण केवळ देवाच्या हट्टासाठीं नागपूर, अयोध्या, वऱ्हाड, सिकीम, सातारा, झांशी, खैरपूर, अर्काट, तंजावर, संबळपूर वगैरे अनेक

लहानमोठीं राज्यें खालसा करण्याचें त्यांच्या कपाळीं आलें. अशा रीतीनें एकदांचा हिंदुस्थान देश देवानें इंग्लिशांच्या पदरांत घातला ! कोणी धर्मभ्रष्ट मनुष्य असा कुतर्क काढील कीं, इंग्लिशांना इतकीं अनन्वित कृत्यें करावयाला लावून हिंदुस्थान देश त्यांच्या घशांत कोंबण्याला देवाचें काय अडलें होतें ? परंतु असें नाहीं. देवाचा देखील त्यांत वाईट हेतु नाहीं. केवळ 'हिंदुस्थानची सेवा ब्रिटनकडून घडावी' हाच देवाचा हेतु, याशिवाय दुसरें कांहीं नाहीं ! अहाहा ! हिंदुस्थानचें केवढें भाग्य, कीं त्याची सेवा ब्रिटनकडून घडत आहे. कांहीं मूर्ख लोक म्हणतात कीं, हिंदुस्थान इंग्लिशांचें गुलाम बनलें आहे. पण हाय हाय ! खऱ्या वस्तुस्थितीविषयीं मूढ जनांत केवढें अज्ञान ! अज्ञ जनहो, हिंदुस्थान ब्रिटनचें गुलाम नाहीं. तर ब्रिटन हें हिंदुस्थानचें गुलाम आहे ! ब्रिटन हिंदुस्थानच्या सेवेसाठीं रात्रंदिवस राबत आहे ! इंग्लंड हिंदुस्थानसाठीं किती हालअपेष्टा सोशीत आहे याची कोणाला कल्पनाही नाहीं ! इंग्लंड हिंदुस्थानांतील मोठमोठ्या पगारांच्या सर्व जागांवर आपले लोक नेमण्याला केती श्रम घेत आहे ! हिंदुस्थानचा व्यापार अगदीं संकुचित, बेतावाताचा, टापटिपीचा, सुडसुडीत आणि व्यवस्थित करून ठेवण्याला इंग्लंडला किती शीण पडत आहे ! हिंदुस्थानांतून जवळ जवळ एक अब्ज रुपये निरनिराळ्या रूपांनीं स्वदेशी रवाना करून देण्याला इंग्लंडला किती शीण पडत असेल ! ह्याशिवाय हिंदुस्थानांतील शिक्षण नेमस्त करण्याला, लोकांच्या मनाची वाढ खुंटविण्याला, लोकांच्या वरील कर वाढविण्याला, व याचसारख्या दुसऱ्या अनेक राजकारस्थानाच्या गोष्टी करण्याला इंग्लंडला किती मेहनत पडत असेल हें कोणाच्या स्वप्नींही कधीं येत नसेल. आणि इतकें हें सगळें कशासाठीं ! तर फक्त देवासाठीं ! इंग्लंडनें हिंदुस्थान जिंकलें, देवासाठीं ! इंग्लंड हिंदुस्थानांतून अलोट पैसा नेत आहे, देवासाठीं ! इंग्लंडनें ब्रह्मदेश घेतला, देवासाठीं ! इंग्लंडनें हिंदुस्थाचे शिपाई कंदाहारच्या डोंगरांत नेऊन प्राणास मुकविले, देवासाठीं ! इंग्लंडनें मल्हाररावांना मद्रासेस ठेविलें, देवासाठीं ! आफ्रिडी लोकांपाशीं लढाई केली, देवासाठीं ! राजकुमार कॉलेजें, देवासाठीं ! सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा विलायतेंत, देवासाठीं ! काबूलच्या अमिराला हिंदुस्थानच्या पैशांतून खंडणी, देवासाठीं ! राज्यारोहणासाठीं विलायतेंत बोलाविलेल्या पाहुण्यांचा आणि दक्षिण आफ्रिकेंत ठेवावयाच्या

सैन्याचा खर्च हिंदुस्थानवर, देवासाठीं! दिल्ली दरबार, देवासाठीं! इराणी आखातांतील कर्झनसाहेबांचा प्रवास, देवासाठीं! तिबेटच्या लामावर आणि सोमालीलँडमधील मुल्लावर स्वारी, देवासाठीं! ऑफीशिअल सीक्रेट्स बिल आणि युनिव्हर्सिटी बिलही देवासाठींच! फार काय, युरोपियन लोक मनुष्यवधाचा अपराध करून थोडया शिक्षेवर सोडले जातात, हें सुद्धां केवळ देवासाठींच आहे! जगांतील लोकांनो, पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याही भागामध्यें इंग्लिशांनीं एखादें वाईट कृत्य केलें असतां त्यांना तुम्ही नांवें ठेवितांना फार सावध असा; कारण, तुम्ही तीं इंग्लिशांना नांवें ठेवीत नसून देवाला नांवें ठेवीत आहां; हें तुम्ही पक्कें समजा; आणि ह्या देवाविरुद्ध अपराधापासून दूर रहा. कारण, इंग्लिश लोकांनीं कांहींही केलें तरी ते स्वतःसाठीं त्यांपैकीं कांहींच करीत नाहींत. केवळ देवासाठीं तें तसें करीत असतात. त्यांनीं त्या गोष्टी कराव्या अशी देवाची इच्छा असते. आयर्लंड, ट्रान्सव्हाल, ऑरेंज फ्रीस्टेट, साउडन, सोमालीलँड, चीन, चित्रळ, तिबेट वगैरे ठिकाणीं त्यांनीं जें कांहीं केलें किंवा ते जें कांहीं करीत आहेत, तें केवळ त्या दयाघन परमेश्वरासाठीं होय!

देवानें हिंदुस्थान इंग्लिशांच्या ताब्यांत दिल्यापासून जे कांहीं फायदे झाले आहेत असें ज्ञानोदयाला वाटत आहे, त्यांतील एक असा आहे कीं, "या देशांत स्वदेशाभिमानाचें वारें विलक्षण रीतीनें वाढत चाललें आहे. पूर्वीं कधीं नव्हता इतका तो जागृत दिसत आहे." हिंदुस्थान देशांत अलीकडे स्वदेशाभिमानाचें वारें विलक्षण रीतीनें वाढत चाललें आहे हें खरें आहे; परंतु हा 'लाभ' हिंदुस्थानाला इंग्रजांकडून झाला आहे, हें म्हणणें बरोबर नाहीं. इंग्लिश लोकांपासून हिंदुस्थानांत स्वदेशाभिमान वाढलेला नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांत तो वाढावा अशी इंग्लिशांची इच्छा नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो वाढत असलेला पाहून भयभीत झालेल्या इंग्लिशांनीं तो जागच्याजागीं दाबून टाकण्याचेंसुद्धां प्रयत्न केले आहेत. शिवाजीचें नांव, शिवाजीचें चरित्र, शिवाजीचा धडा, शिवाजीची सावली असल्या क्षुद्र गोष्टींसंबंधानें सुद्धां इंग्लिश लोक अलीकडे जी दहशत बाळगीत आहे व तिच्या प्रतिकारासाठीं जे उपाय योजीत आहेत, त्यावरून इंग्रज लोक हिंदुस्थानांतील लोकांचा स्वदेशाभिमान वाढवीत आहेत किंवा कमी करीत आहेत, याची कल्पना कोणालाही करतां येईल. वस्तुस्थिति तर उघड उघड

अशी आहे. शिवाय इंग्लिश लोक हिंदुस्थानांतील लोकांचा देशाभिमान कसा वाढविणार ? इंग्रज लोक आणि ते हिंदुस्थानांतील लोकांचा स्वदेशाभिमान वाढविणार, हा अगदीं असंबद्ध शब्दप्रयोग आहे. तो कसा असंबद्ध आहे, हें समजण्याकरितां हिंदुस्थानांतील लोकांचा स्वदेशाभिमान म्हणजे काय, याचा अर्थ आपण प्रथमतः ठरवूं. हें ठरविण्याला आपण दुसऱ्या देशांतील लोकांच्या स्वदेशाभिमानाकडे पाहिलें, म्हणजे झालें. दुसऱ्यांचा स्वदेशाभिमान कसा आहे ? इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत स्पेनचें आरमार इंग्लंडवर चाल करून आलें होतें; तेव्हां इंग्लिश लोकांना फार स्वदेशाभिमान उत्पन्न झाला होता म्हणून म्हणतात. त्या वेळीं इंग्लिशांना काय वाटत होतें ? तर आपल्या देशावर परकीयांनीं स्वारी करूं नये, त्यांनीं आपल्याला जिंकूं नये, त्यांचे आपण गुलाम होऊं नये, आपली स्वतंत्रता आपण कायम राखावी, शत्रूचा पाडाव करावा आणि आपल्या देशाची कीर्ति उज्ज्वल ठेवावी, असें त्यांना त्या वेळीं वाटत असलें पाहिजे. व यालाच इंग्लिशांनीं स्वदेशाभिमान हें नांव दिलेलें आहे. १८७० सालीं फ्रँको-जर्मन वॉर झाली आणि प्रिन्स बिस्मार्कच्या सैन्यानें खुद्द पारीस शहराला वेढा घातला; त्या वेळीं फ्रेंच लोकांच्या अंगांत अतिशय देशाभिमान संचारला होता असें म्हणतात. त्या देशाभिमानाचें स्वरूप काय होतें ? आपला देश जर्मनीकडून जिंकला जाऊं नये, तसें झालें तर आपल्या देशाची अपकीर्ति होईल, आपल्या देशांत सुख उरणार नाहीं, लोकांच्या मनांतील हुरूप नाहींसा होईल, कारखानदारांचे व्यापार बसतील, शिपायांचें शौर्य नाहींसें होईल, कर देणाऱ्यांच्या माना ओझ्यानें मोडून जातील, गुलामगिरीच्या बिड्या पायांत जड होतील, स्वतंत्रतेचें स्वर्गसुख नष्ट होईल आणि आपण दुसऱ्यांचे दास बनूं, यासाठीं आपण आपला देश मरेपावेतों आपल्याच ताब्यांत ठेवूं, असें त्यांना त्या वेळीं वाटत असलें पाहिजे, आणि याच त्यांच्या वाटण्याला स्वदेशाभिमान हें तत्कालीन लेखकांनीं नांव दिलें आहें. इंग्लिशांनीं आफ्रिकेमध्यें नुकतीच लढाई केली तेव्हां ट्रान्सवाल आणि ऑरेंज फ्री स्टेट येथील बोअर लोकांनीं फार स्वदेशाभिमान दाखविला असें त्या वेळीं सर्व वर्तमानपत्रें म्हणत असत. बोअर लोकांनीं स्वदेशाभिमान दाखविला म्हणजे काय केलें ? त्यांनीं काय केलें हें इतकें ताजें आहे कीं, त्याची पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं. त्याचप्रमाणें चीन देशांत

निरनिराळे युरोपियन लोक घुसून ते तेथें आपलें प्राबल्य माजवीत आहेत असें दिसून आल्यावरून चीनमधील सर्व बॉक्सर लोक स्वदेशाभिमानानें प्रेरित झाले हें आपल्याला ठाऊक आहे, व त्यांच्या स्वदेशाभिमानाचें काय लक्षण आहे, याचीही आपल्याला थोडीबहुत कल्पना आहे. ह्या वर दिलेल्या उदाहरणांवरून स्वदेशाभिमानाबद्दल दुसऱ्यांची कल्पना काय असते हें आपल्या साधारणपणें लक्षांत आलेंच असेल. व स्वदेशाभिमान म्हटला म्हणजे तो जसा दुसऱ्यांचा तसाच तो हिंदुस्थानचाही असला पाहिजे, हें उघड आहे. इतर देशांकरितां स्वदेशाभिमानाचा अर्थ निराळा आणि हिंदुस्थानकरितां निराळा, असें कधींही होऊं शकणार नाहीं. तेव्हां इतर ठिकाणच्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील स्वदेशाभिमानाचा अर्थ घेतला असतां तसला स्वदेशाभिमान इंग्लिशांनीं हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत उत्पन्न केला हें म्हणणें कसें संभवतें हें फक्त असलीं वाक्यें उच्चारणाऱ्या मनुष्यालाच माहीत. स्वदेशाभिमानाचा वर दर्शविल्याप्रमाणें जोंपर्यंत अर्थ आहे, तोंपर्यंत इंग्लिश लोक हिंदुस्थानांत स्वदेशाभिमान वाढवितात म्हणजे काय? ते ज्या पायांवर उभे आहेत, ते पाय तोडून टाकण्याविषयीं हिंदुस्थानांतील लोकांची इच्छा वाढवीत आहेत? ते आपल्याच पायावर आपल्या हातानें धोंडा घालून घेत आहेत? किंवा भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य ह्या निर्मळ अंतःकरणाच्या योद्धयांप्रमाणें ते आपल्या नाशाची युक्ति आपल्या प्रतिपक्षांना सांगत आहेत? असें करणें हें जोंपर्यंत मानवी स्वभावाच्या विरुद्ध आहे, तोंपर्यंक इंग्लिशांनीं हिंदुस्थानांत स्वदेशाभिमान उत्पन्न केला आहे, असें कोणीही म्हणणें बरोबर नाहीं. परंतु दुसऱ्या एका अर्थानें मात्र वरील वाक्य बरोबर होऊं शकेल. परकीय इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थानांत येऊन तो देश बऱ्यावाईट मार्गानें जिंकला, ही गोष्ट समजून व त्याबद्दल वैषम्य वाटून आतां हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत स्वदेशाभिमान उत्पन्न करण्याला इंग्लिशच कारणीभूत झालेले आहेत. हिंदुस्थानांत आज सर्वत्र हिंदुपदपादशाही असती तर आज ज्या प्रकारचा स्वदेशाभिमान दिसत आहे, तसला कधींही उत्पन्न झाला नसता. तो फक्त इंग्लिशांनींच उत्पन्न केलेला आहे. अशा अर्थानें मात्र वरील वाक्य उत्पन्न होऊं शकेल. परंतु एरव्हीं इंग्लिशांपासून हिंदुस्थानांत स्वदेशाभिमान वाढत आहे असें म्हणणें म्हणजे खोटें बोलणें, वस्तुस्थितीचा विपर्यास करणें आणि लोकांना फसविण्यासाठीं निराधार आभास उत्पन्न करून देणें होय.

असो. कोणापासून का होईना, हिंदुस्थानांत स्वदेशाभिमान वाढत आहे, ही फार आनंदाची गोष्ट आहे. परंतु ज्ञानोदयाचें असें म्हणणें आहे कीं, 'या अभिमानाला चांगलें वळण मात्र लावावयाचें आहे,' हें चांगलें वळण म्हणजे कोणतें? इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, रशियन, अमेरिकन किंवा जपानी स्वदेशाभिमानाला जें वळण आहे त्याच वळणावर जर हिंदुस्थानचा स्वदेशाभिमान जात असला तर तें वळण चांगलें कीं वाईट? चांगलें वळण लागावयाचें आहे म्हणजे हल्लींचें वळण वाईट हें उघड होतें. पण ह्यांत वाईट काय आहे? आणि चांगलें वळण तें कोणतें? इंग्लिश लोक म्हणतील तितकें दडपून घ्यावें, ते नेतील तितका पैसा त्यांना हिंदुस्थानांतून स्वदेशीं नेऊं द्यावा, ते बळकावतील तितक्या मोठ्या जागा त्यांना घेऊं द्यावा, ते हिंदुस्थानच्या पैशांनीं हिंदुस्थानच्या बाहेर जितक्या लढाया करतील तितक्या त्यांना करूं द्याव्या, आपण त्यांच्या मर्जीचा कल पाहून बोलावें, त्यांची खुशामत करावी, ते देतील तें खावें, ते ठेवतील तसें राहावें, आणि ते सांगतील तो बोजा उठवावा, हें स्वदेशाभिमानाचें चांगलें वळण कीं काय? आणि तें हिंदुस्थानांतील स्वदेशाभिमानाला लागावयाला पाहिजे आहे? असें असेल तर त्यांत नवीन वळण तें काय लागावयाचें आहे? प्रख्यात डॉ. भांडारकर यांच्यासारख्या लोकनियुक्त प्रतिनिधींच्या कायदे कौन्सिलांतून आणि लोकांच्या कांग्रेसच्या बैठकींतून बहुतेक असल्याच प्रकारच्या वळणाचा स्वदेशाभिमान दृष्टीस पडत आहे. बहुतेक सर्व ठिकाणीं इंग्रजांच्या ताटाखालचीं मांजरेंच दृष्टीस पडतात. आतां हिंदुस्थानांतील स्वदेशाभिमानाला याहूनही जास्त चांगलें वळण लागावयाचें म्हणजे तो स्वदेशाभिमान अगदीं पूर्णपणें रसातळालाच नेऊन पोंहोचवावयाचा कीं काय?

अशा प्रकारच्या राजकीय प्रश्नांचा विचार करितां करितां ज्ञानोदयाची कल्पना बरीच भटकत जाऊन त्यानें एके ठिकाणीं "पुढें दिल्याप्रमाणें सात्त्विकपणाचे उद्गार काढले आहेतः— परंतु आज हिंदुस्थान स्वतंत्र झाला तर तो कोणास राजा करील? अमुक एक राजा हिंदुस्थानास मुळींच होऊं शकणार नाहीं. बरें, लोकसत्ताक राज्यासाठीं तरी हिंदुस्थान तयार आहे काय? असें झाल्यास अमुक एका जातीच्या हातीं कारभार जाऊन पुनः ते पूर्ववत् इतरांस आपल्या पायांखालीं तुडवितील." हिंदुस्थानांतील मोठमोठे राजे नामशेष करून टाकल्यानंतर आतां हिंदुस्थान आपला राजा कोणास करील, असा प्रश्न विचा-

रणें हें फार चांगलें आहे ! व हिंदुस्थान अमुक एक राजाला आपला राजा करूं शकत नाहीं, म्हणून इंग्लिशांनींच हिंदुस्थानचें राज्य करावें हा युक्तिवाद त्याच्याहूनही चांगला आहे ! जेव्हां इंग्रजांनीं हिंदुस्थान हळूहळू घेण्याला सुरवात केली, तेव्हां कांहीं हिंदुस्थान अराजक स्थितींत नव्हतें. मग तेव्हां इंग्लिश हिंदुस्थानचे राजे कशाला होऊं लागले? पण खरेंच ! त्यांनीं हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या ताब्यांत घ्यावा अशी देवाची इच्छा होती ! हल्लीं हिंदुस्थानांत हिंदुस्थानचा राजा होण्याला कोणी नाहीं आणि लोकसत्ताक राज्यासाठीं हिंदुस्थान आज तयार नाहीं, सबब इंग्लिशांनींच हिंदुस्थानावर आपला मंजुळ अंमल चेपला पाहिजे, हें अगदीं निर्विवाद सिद्ध होतें ! लोकसत्ताक राज्याला हिंदुस्थान अजून तयार नाहीं याचें गंभीर कारण असें आहे कीं, तसें झाल्यास एखाद्या विशिष्ट जातीच्या हातीं कारभार जाऊन त्या जातीचे लोक पूर्ववत् इतरांस आपल्या पायांखालीं तुडवितील ! जणूं काय इंग्रज म्हणजे ही कांहीं एक जात नव्हेच ! आणि जणूं काय ते नेटिवांना आपल्या पायांखालीं तुडवीत नाहींतच ! तुम्ही स्वतंत्र झाला तर तुमच्यांतील एखादी जात तुम्हांला आपल्या पायांखालीं तुडवील, तेव्हां त्यांच्यापेक्षां आम्हींच तुम्हांला आपल्या कोमल पायांखालीं तुडविलें असतां काय वाईट, असें म्हणण्यासारखेंच हें आहे, जणूं काय परकीय साहेबांच्या बुटांपेक्षां आपल्या देशांतीलच एखाद्या जातीच्या लोकांचा पादस्पर्श जास्त अपमानकारक आणि असह्य वाटतो ! परंतु हिंदुस्थानचा राजा होण्याला कोणी नाहीं, आणि एका जातीचे लोक दुसऱ्यांना पायांखालीं तुडवितील, एवढ्याचसाठीं उदार आणि कोंवळ्या अंतःकरणाच्या इंग्लिशांनीं आपला पाय हिंदुस्थानच्या बाहेर टाकण्याचें लांबणीवर टाकिलें असेल, तर हीं कारणें महत्त्वाची नाहींत. तशीच वेळ आली तर जर्मनींतल्याप्रमाणें हिंदुस्थानालाही कोणी तरी राजा मिळेल, किंवा अमेरिकेंतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील निरनिराळे लोक लोकसत्तात्मक राज्य स्थापन करून आपलें गाडें कसें तरी पुढें ढकलतील. या कामांत इंग्लिश लोकांना जितके वाटत आहेत, तितके हिंदुस्थानचे लोक अनभ्यस्त नाहींत.

असो. येथपर्यंत ज्ञानोदयांतील कित्येक खोट्या मतांचें खंडण झालें आहे व त्यांतील हेत्वाभास निरनिराळ्या रीतीनें व्यक्त करून दाखविण्यांत आले आहेत. देवाची इच्छा अशी होती, असला युक्तिवाद आतां इतका पोंचट

झालेला आहे कीं, तो ऐकून हिंदुस्थानांतील लहान मुलांना देखील हसूं येतें सबब असले शब्दजाल हिंदुस्थानांतील लोकांपुढें पसरणें अगदीं मूर्खपणाचें आहे. कारण, हिंदुस्थानांतील लोक इंग्रजांच्या कृपेनें जरी शस्त्ररहित झालेले असले तरी बुद्धिरहित झालेले नाहींत. त्यांना असल्या लबाडयांचा प्रतिकार करितां येत नाहीं, म्हणून त्यांना त्या समजत नाहींत, असें मात्र नाहीं. सबब असली देवाच्या इच्छेविषयींचीं विधानें कोणीही करितां कामा नयेत; परंतु त्यांतल्या त्यांत खऱ्या देवाची खरी वकिली करूं इच्छिणाऱ्या मिशनरी लोकांनीं तर असें कधींहि करितां कामा नये. असलें बोलणें त्यांच्या धर्मकल्पनांशीं अविसंगत आहे काय ? दुसऱ्यांच्या देशावर दरवडे घालावे, गरीब लोकांपासून लांच घ्यावे, खोटे दस्तऐवज करून लोकांना फसवावें, अनाथ अबलांच्या दाराशीं पहारे बसवून आणि त्यांच्यावर जुलूम करून त्यांच्यापासून बळजबरीनें त्यांची संपत्ति लुटून न्यावी, लोकांच्या राज्यांचीं अवदानें मारावीं, लढायांनीं मुलूख बेचिराख करावा, मनुष्यांच्या रक्ताचें शिंपणें पृथ्वीच्या अंगावर करावें, आणि त्यांच्या मुंडक्यांचे ढीग तिच्या छातीवर रचावे, असल्या जगांतील निंद्य गोष्टी खिरस्त्यांच्या देवाला प्रिय आहेत काय ? आपसांत कलह लावून लबाडया, लढाया, लुटी आणि रक्तपात यांचा भडका पेटवून द्यावा असें खिरस्त्यांच्या देवाचें मत आहे काय ? खिरस्त्यांचा देव खरोखर अशा मताचा असला, तरी ती गोष्ट त्याच्या भक्तांनीं झांकून ठेविली पाहिजे; मग तो तसा नसतांना त्याच्यावर असले भलतेच धर्म आरोपित करणें, हें राजकीय दृष्टयादेखील हिंदुस्थानांतील मिशनऱ्यांना गैर आहे. कारण, हिंदुस्थानांतील लोकांचा देव आणि धर्म वाईट म्हणून त्यांना चांगल्या देवाचा चांगला धर्म शिकविण्याकरितां आपण हिंदुस्थानांत आलों आहों असा मिशनरी लोक बाहेरून नेहमीं बहाणा करीत असतात. जे ममताळु देवाचा फैलाव करण्याकरितां आले त्यांच्याच तोंडून त्यांचा देव रक्तपात, खून, अपहार, खोटे दस्तऐवज, असत्य भाषण इत्यादि लहानमोठया दुर्गुणांना आणि गुन्ह्यांना उत्तेजन देणारा आहे असें इंडियन लोकांना कळून आलें तर त्यांची खिरस्ती धर्माबद्दल काय कल्पना होईल आणि त्याला कोण पूज्य मानील ! ज्या धर्मांतील खुद्द देव इतक्या अघोर आणि राक्षसी मतांचा, त्या धर्मांतील माणसें अत्यंत क्रूर आणि हिंस्र अशा पशूंपेक्षांही अधिक भयंकर असलीं पाहिजेत, असा जर कोणाच्या मनाचा

ग्रह झाला तर तो ख्रिस्ती लोकांच्या असल्या मतांचाच परिणाम नव्हे काय ? पुष्कळ तत्त्ववेत्त्यांचें असें मत आहे कीं, जसे लोक असतात तशा प्रकारचे ते आपल्यासाठीं देव बनवून घेतात. या न्यायाप्रमाणें ख्रिस्ती लोकांनीं आपल्या देवाचें प्रस्तुत प्रसंगीं जें स्वरूप दाखविलें आहे त्यावरून ते लोक कसे असले पाहिजेत हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

असो. अशा प्रकारचे अनेक दोष ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या वर दिलेल्या विधानांवर उत्पन्न होऊं लागतात. सबब त्यांनीं असलीं भलतींच विधानें करून आपल्याबरोबर आपल्या देवालाही आपला साथीदार म्हणून स्वर्गांतून बाहेरच्या वाटेकडे ओढूं नये हें चांगलें, आमच्या दृष्टीनें एकाचें राज्य दुसऱ्यानें लुबाडून घ्यावें असल्या इच्छा करणारा कोणताही देव नाहीं, व ख्रिस्त्यांचा देव तर विशेषतः तसा नाहीं. देव असल्या उठाठेवी करीत बसत नाहींत. ह्या सगळ्या मनुष्यांच्या लबाडया आहेत. आपल्या कृत्यांवर पांघरूण घालण्यासाठीं कावेबाज मनुष्य देवांच्या इच्छेचें ढोंग करीत असतात. परंतु सरळपणानें पाहिलें तर असल्या गोष्टींत ढोंग कशाला पाहिजे ? जशी वस्तुस्थिति असेल तशीच ती बोलली जावी ह्या सरळपणांत जास्त उदात्तपणा आहे. आम्ही बऱ्यावाईट कशा तरी रीतीनें येथील राज्य ताब्यांत घेतलें आहे आणि येथून आम्हांला कोणी घालवीपर्यंत आम्ही तें सोडणार नाहीं असें इंग्लिशांनीं स्पष्टपणें म्हटल्यास तें जास्त चांगलें. आम्हीं हिंदुस्थान घ्यावें अशी देवाची इच्छा होती म्हणून आम्हीं तें घेतलें; आणि हिंदुस्थानाला कोणी राजा मिळणार नाहीं किंवा लोकसत्ताक राज्य झालें तर एका जातीचे लोक दुसऱ्यांना पायाखालीं तुडवतील म्हणून आम्ही जात नाहीं, असले लपंडाव सांगण्यांत काय अर्थ आहे ? ज्यांच्यापाशीं हिंदुस्थानांत जवळ दोनअडीच लाख सैन्य आहे, त्यांनी असले लपंडाव न करितां जें खरें आहे तें खऱ्या शब्दांनीं स्पष्टपणें बोलून दाखविण्याला काय हरकत आहे ?

---

एकंदर चालू महर्गतेमुळें

## काळांतील निवडक निबंधांचीं पुस्तकें

जितक्या कमी किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती, तितक्या कमी किंमतींत देतां आलीं नाहींत. याकरितां काळांतील निवडक निबंधांचे पहिले भागांत एक सवलतीचें कुपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीही त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास, त्याचा फायदा घ्यावा.



व्यवस्थापक :

य. गो. जोशी-प्रकाशन,

सदाशिव, पुणें २.